कुमाऊँची कन्या
# माना

उत्तराखंडातलं कुमाऊँ असो की तिथली ही माना असो, वाचता वाचता वाटतं की इथंही कोकणात, विदर्भात, मराठवाड्यात थोड्याफार फरकानं हेच तर अनुभवाला येतं आहे! प्रदेश बदलला, निसर्ग बदलला, थोडे रीतरिवाज बदलले तरी साऱ्या भारतभर, मुलीबाबतची, स्त्रीबाबतची उपेक्षा आणि अनास्था आहेच! आज तर असं म्हणावंसं वाटतं की, आधी मुलींना जन्माला येण्याची संधी तर द्या आणि त्या जन्मू शकल्या तर त्यानं तर त्यांचं अस्तित्व टिकून उजळत राहाण्यासाठीची संधीही द्या! शहरांपासून दूरच्या अंतर्भागात, विशेषतः मुलींसाठी हा शिक्षणाचा प्रकाश पोचण्यात अनेक अडथळे येतात! असं असलं तरी, अनेकानेक अडसरांनी बंद असलेली जुनी दारं आता करकरत, कुरकुरत का होईना हळूहळू किलकिली होऊ लागली आहेत!

शिक्षणाच्या प्रकाशवाटेवरून चालताना, आत्मनिर्भर होत आत्मसन्मान जपणारी आणि इतर तमाम मुलींना या वाटेकडे घेऊन जाणारी माना आपल्याला ओळखीची वाटते. वेगळं असूनही आपलंसं वाटणं हे या लेखनाचं वैशिष्ट्य आहे. महाराष्ट्रातल्या सावित्रीच्या लेकींना 'माना' आपली मोठी बहीण वाटू शकेल, असं ही कादंबरी वाचताना माझ्या मनात आलं.

– विद्या बाळ

सकाळ प्रकाशन

# कुमाऊँची कन्या माना



राधाबहन भट्ट

अनुवाद
नीला शर्मा

आदरणीय अरविंद गुप्तासर,
आशीर्वादाच्या अपेक्षेत...
नीला शर्मा
२८ ऑक्टो. २०१२



# कुमाऊँची कन्या
# माना

लेखन
राधाबहन भट



अनुवाद : नीला शर्मा

# कुमाऊँची कन्या माना

लेखन : राधाबहन भट

अनुवाद : नीला शर्मा





Translated from the Hindi language version of "Mana - Himalaya ki Beti" written by Radha Bhatt, Chairperson, Gandhi Peace Foundation, 221-223 Deen Dayal Upadhyaya Marg, New Delhi - 110002. Tel: 011 23237491

Published by Sakal Papers Pvt. Ltd. by agreement with Smt. Radha Bhatt

**प्रथम आवृत्ती** : सप्टेंबर २०१३

**मुखपृष्ठ** : अमोल पवार

**मांडणी** : प्रदीप खेतमर (आर्ट ॲडव्हर्टायझिंग)

**अक्षरजुळणी** : विद्या खेतमर

**प्रकाशक** : सकाळ पेपर्स प्रा. लि. ५९५, बुधवार पेठ, पुणे २.

**मुद्रण** : सकाळ पेपर्स प्रा. लि., कोल्हापूर

**संपर्क** : पुस्तक प्रकाशन विभाग, सकाळ पेपर्स प्रा. लि.
८८८८८ ४९०५० / ०२०-२४४०५६७८
sakalprakashan@esakal.com

**किंमत** : ₹१५०/-






## प्रस्तावना

# मानाचं आत्मभान

भारतामधल्या उत्तराखंड राज्यातला कुमाऊँ हा एक भाग आहे. इथे राधाबहन भट या गांधीवादी कार्यकर्तीनं अनेक वर्षं काम केलं. त्यांच्या कामाची भूमी म्हणजे हिमालयाच्या नात्यातला डोंगराळ भाग. इथली जमीन, इथली पिकं-शेती, इथलं हवामान हे सगळंच महाराष्ट्राच्या तुलनेत अगदी वेगळ्या प्रकारच्या निसर्गाचं दर्शन आहे. इथल्या रहिवाशांची जीवनशैली निसर्गाच्या हातात हात घालून विसावली आहे. याच पार्श्वभूमीवर 'कुमाऊँची कन्या माना' ही कादंबरी राधाबहन भट यांनी लिहिली आहे. कामाच्या निमित्तानं याच भागात त्यांचं वास्तव्य असल्यामुळे, या कादंबरीत त्यांच्या जीवनानुभावाचं प्रतिबिंब पडलं असावं असं वाटतं.

कुमाऊँच्या अत्यंत दुर्गम अशा डोंगराळ भागात बालपण गेलेली या कादंबरीची नायिका माना ही आत्मभानाचं मूर्तिमंत उदाहरण आहे. आजी, आई आणि थोरल्या बहिणीच्या वाट्याला आलेलं खडतर जगणं बघत ती लहानाची मोठी होते.

माना डोंगराळ भागात तर राहतेच, त्याखेरीज समस्यांचे डोंगर डोक्यावर सतत वागवत त्यांच्याखाली पिचून नामशेष होणं तिला नको आहे. ते डोंगर फोडण्यासाठी तिचे वडील तिच्या हाती शिक्षणाचं हत्यार देतात. त्याला स्वतःच्या विचारांनी सतत धारदार ठेवत ती स्वतःची एक पाऊलवाट तयार करते.

मानाची शिक्षण घेण्याची प्रक्रियाही साधी, सोपी नाही. जिथं ग्रामीण भागात मुलग्यांचंही शिक्षण अवघड, तिथं मुलींच्या शिक्षणात किती अढसर येत असतील. त्यातून माना तर दुर्गम डोंगराळ भागात राहाते. तिला शिक्षणासाठी दुसऱ्या गावात जाणं, कालांतरानं वसतिगृहात जाऊन राहाणं वगैरे कित्येक अग्निदिव्यं पार पाडावी लागतात. त्यातला जाच, काच किंवा विरोध तिला रोखू शकत नाही. उलट त्यातून भविष्यकाळात घडणारं परिवर्तन तिला दिसत राहतं. ती भारल्यासारखी नानाविध गोष्टी शिकत राहते आणि समजूतदार होत जाते.

मानानं जसं तिच्या मैत्रिणींच्या सहवासात खूप काही जाणून घेतलं तसं ग्रामीण, शहरी व महानगरी पातळीवरच्या मुलींनीही जाणून घ्यायला हवं. कोण नुसतीच बोलते, करत काहीच नाही. कोण फारसं काही न बोलता बरंच काही करते. कोण विचारी आहे, कोण विचारांकडे पाठ फिरवणारी आहे आणि ती कशामुळे तशी झाली असावी हे तिचं समाजमानसशास्त्राचं शिक्षण सामूहिकतेच्या भावनेतून आपसूक घडत जातं.

माणसांची पारख, शिक्षकांच्या शिकवण्याच्या पद्धतीतून उचललेले काही मूलमंत्र, डोंगराळ व शहरी जीवनमानाची तुलना, खडतर व सुखवस्तू जीवनशैलीतील विरोधाभास अशा एक ना अनेक व्यावहारिक धड्यांमधून माना सजग, सतर्क होत जाते.

आत्मभिमुखतेप्रमाणेच समाजाभिमुखतेची वाटही फार संतुलितपणाने ती चालू लागते. संसाधनं हवीत पण ती किती व कशासाठी याबाबत तिच्या जाणीवा जशा प्रखर होत जातात, तशाच आजच्या व इथून पुढच्या काळातल्या प्रत्येक स्त्रीच्या होवोत. बाजारपेठ हा आपल्याला अडकवणारा पिंजरा आहे, शोषक आहे; हे भानही पुढच्या पिढ्यांमध्ये उत्तरोत्तर यायला हवं, तरच नवी पिढी आत्मनिर्भर होऊ शकेल, असं मानाच्या निमित्तानं वाटतं.

कादंबरीचं वैशिष्ट्य हे आहे की माना वेळोवेळी, तिच्या आईशी, बहिणीशी आणि आजीआजोबांशी बोलते आहे. सुट्टीवर येणाऱ्या वडिलांबरोबरही तिची देवघेव चालू आहे. त्यातूनच आपल्यासाठी, म्हणजे तिच्या मनातल्या शिक्षणाच्या स्वप्नासाठी, ती परिस्थितीतली अनुकूलता, प्रतिकूलता यांचा सतत कानोसा घेत आहे. आपलं शिक्षण, त्यानंतरच जगणं याचा मनोमन विचार करत, धिम्या गतीनं पण निश्चयपूर्वक वाट चालते आहे. या मानाचं हे चित्र कधीच फार भडक होत नाही; तिनं बंड केलं तरी दचकावं इतकं ते बंडखोर वाटत नाही. आपला स्तर उंचावत, ते सतत संथपणे पण नेटाने पुढे चालतं आहे. लेखिकेनं बाळगलेलं हे भान अतिशय परिणामकारक आहे. उत्तराखंडातलं कुमाऊँ असो की तिथली ही माना असो, वाचता वाचता वाटतं की इथंही कोकणात, विदर्भात, मराठवाड्यात थोड्याफार फरकानं हेच



तर अनुभवाला येतं आहे! शिक्षणाच्या प्रकाशवाटेवरून चालताना, आत्मनिर्भर होत आत्मसन्मान जपणारी आणि इतर तमाम मुलींना या वाटेकडे घेऊन जाणारी अशी माना आपल्याला ओळखीची वाटते. हे आपलंसं वाटणं; वेगळं असूनही आपलं वाटणं हे या लेखनाचं वैशिष्ट्य आहे.

'मिळून साऱ्याजणी' या मासिकात ही कादंबरी १९९६-९७ या काळात क्रमशः प्रसिद्ध झाली. त्यांनतर १४-१५ वर्षं उलटून गेली. त्यावेळी जे वाटलं तेच आजही वाटतं की, प्रदेश बदलला, निसर्ग बदलला, थोडे रीतरिवाज बदलले तरी साऱ्या भारतभर, एक गोष्ट अगदी ठळकपणे एकात्मतेचं दर्शन घडवते! ती गोष्ट म्हणजे मुलीबाबतची, स्त्रीबाबतची उपेक्षा आणि अनास्था! आज तर असं म्हणण्याची वेळ आली आहे की, आधी मुलींना जन्माला येण्याची संधी तर द्या आणि त्या जन्मू शकल्या तर त्यानं तर त्यांचं अस्तित्व टिकून उजळत राहाण्यासाठीची संधीही द्या! शहरांपासून दूरच्या अंतर्भागात शिक्षण पोचत नाही. विशेषतः मुलींसाठी हा शिक्षणाचा प्रकाश पोचण्यात अनेक अडथळे येतात! असं असलं तरी, अनेकानेक अडसरांनी बंद असलेली जुनी दारं आता करकरत, कुरकुरत का होईना हळूहळू किलकिली होऊ लागली आहेत!

डेन्मार्कच्या 'फोक स्कूल' (Folk School) या चळवळीशी राधाबहन संबंधित होत्या. त्यामुळेच माना ज्या आश्रमासारख्या शाळेत शिकली, त्या शैलीचं महत्त्व डेन्मार्कवासीयांना उमजलं. ही कादंबरी म्हणूनच, प्रथम डेन्मार्कला प्रसिद्ध झाली. कादंबरीतली ही शिक्षणशैलीही विचारात घेण्यासारखी आहे. महाराष्ट्रातल्या सावित्रीच्या लेकींना 'माना' आपली मोठी बहीण वाटू शकेल, असं ही कादंबरी वाचताना माझ्या मनात आलं.

कुमाऊँमधलं वातावरण, पर्यावरण आणि मानाच्या संदर्भात घडणाऱ्या घटना याचा अनुवाद अतिशय प्रवाही, ओघवता झाला आहे हे अनुवादक नीला शर्मा हिचं श्रेय आहे. त्यामुळे ही कादंबरी वाचकांना आनंदाने वाचावीशी वाटेल याचा विश्वास वाटतो. त्यासाठी शुभेच्छा!

**– विद्या बाळ**
१०१ नचिकेत सोसायटी, प्रभात रोड , ग. क्र. ४,
पुणे ४११००४
फोन ०२०- २५६७१३२१

## ■ ■ मनोगत

'कुमाऊँची माना' या कादंबरीच्या लेखन व अनुवादांचीही एक सुरम्य कथा आहे. लेखिका राधाबहन भट्ट या कुमाऊँमध्ये तर दीर्घकाळ सामाजिक परिवर्तनाचं कार्य करतच आलेल्या आहेत; पण डेन्मार्कमधल्या 'फोक हायस्कूल' या चळवळीशीही त्यांचा दाट संबंध आहे.

या कादंबरीचं कथानक त्यांनी तिथल्या मंडळींसमोर आधी मांडलं. त्यामुळे डॅनिश भाषेत सर्वप्रथम शब्दांकन केलं जाऊन ही कादंबरी आधी डेन्मार्कमध्ये प्रथम छापली गेली. नंतर इंग्लिश, मग हिंदी असं करत १९९६ मध्ये वसंत व रेणुताई पळशीकर या दांपत्यानं ही कादंबरी विद्याताई बाळ यांच्याकडे दिली. हेतू हाच होता, की ती त्यांच्या संपादनाखालील *'मिळून साऱ्याजणी'* मासिकात संक्षिप्त अनुवादित स्वरूपात यावी. त्याप्रमाणे १९९६च्या दिवाळी अंकापासून 'कुमाऊँची माना' मराठी वाचकांसाठी मे १९९७ पर्यंत क्रमशः येत राहिली.



या दरम्यान व नंतरच्याही काळात कादंबरी आवडल्याचा प्रतिसाद मोठ्या प्रमाणावर मिळू लागला. अजूनही काही जुने वाचक त्याची आठवण करून देतात. हा अनुवाद करण्याची जबाबदारी विद्याताईंनी माझ्यावर सोपवली, वेळोवेळी कौतुकही केलं, त्यामुळं उमेदीनं एक समाधान देणारं काम हातून घडलं. याबद्दल मी त्यांची शतशः आभारी आहे. कादंबरी उपलब्ध करून देणाऱ्या पळशीकर दांपत्याची भूमिकाही फार मोलाची असल्यानं मी त्यांचीही ऋणी आहे.

सकाळ प्रकाशनाच्या आशुतोष रामगीर यांनी ही पुस्तकरूपानं प्रसिद्ध करण्यासाठी स्वीकारली. त्यांच्या सहकारी दीपाली चौधरी यांनी संपादकीय हातभार लावला. प्रदीप खेतमर व त्यांच्या चमूनं अक्षरजुळणीची कामगिरी उत्साहानं केली. मुखपृष्ठासाठी अमोल पवार यांनी सुरेख चित्र रेखाटलं. या सर्वांची मी कृतज्ञ आहे.

**– नीला शर्मा**



या कादंबरीच्या लेखिका राधाबहन यांचा डेन्मार्कमधील 'फोक हायस्कूल' या शैक्षणिक चळवळीशी गेली काही वर्षे संबंध आहे. तिथेच त्यांचे हे अनुभवकथन प्रथम छापले गेले. हे अनुभव मराठीतून प्रथमच आपल्यापर्यंत पोहोचत आहेत. कुमाऊँमधील कस्तुरबा महिला उत्थान मंडल व कौसानी येथील आश्रमाशी राधाबहन गेली सुमारे पंचेचाळीस वर्षे संबंधित आहेत. याद्वारे त्यांनी कुमाऊँ भागात महिला संघटन, बालवाड्या व पर्यावरणाच्या क्षेत्रात भरीव कार्य केले आहे.

या कादंबरीची नायिका आहे मानवती. स्वतःच्या वाट्याला आलेल्या बेड्या तोडत सभोवतालच्या इतरही साऱ्याजणींसाठी मोकळ्या समाजजीवनाचा आग्रह धरणारी मानवती. कुमाऊँ भागातल्या मानवतीची ही अनुभवगाथा.





ऑक्टोबर महिना. उत्तराखंडातल्या कुमाऊँ भागातला परिसर. टेकड्यांमधून झुळझुळणाऱ्या शरयूच्या उपनद्या. त्यांच्या काठांवर लवथवणाऱ्या गव्हाच्या ओंब्या मिरवणारी शेतं. त्यामुळे सबंध दरीच जणू सोनेरी झालेली. बहुतांश वावरांमधील कापणी संपून पेंढ्या रचलेल्या. आता गंजी तेवढ्या रचल्या की बास!

काहींनी गंजी रचायला उत्साहानं सुरुवात केलेली. शेतात चटया अंथरून कुठं पुरुषमाणसं, तर कुठं बायका बसलेल्या. काही बायकांच्या हातात एवढ्या एवढ्याशा काठ्या. त्या काठ्यांनी ओंब्या बडवून मोठ्या लगबगीनं आणि नेमकेपणानं त्या दाणे काढण्यात गढल्या आहेत. मुलं उन्हात गंजीचा पसारा घालताहेत. काही कुटुंबांचं हे काम कधीच संपलं नि आता त्यांच्याकडल्या गंजी वाळल्यातसुद्धा. बायकापोरी वाळलेल्या गंजींचे मोठाले भारे डोक्यावरून घरी घेऊन निघालेल्या. ही वेळ भलतीच जिकिरीची. कापलेलं धान्य काळजीपूर्वक गोळा करून निगुतीनं सोयीच्या जागी जपून ठेवायचं म्हणजे अख्ख्या कुटुंबाला एकत्र येऊन पडतील ते कष्ट उचलावे लागतात. हिमालय पर्वताच्या या भागातल्या शेतकऱ्याच्या आयुष्यात दोनच गोष्टी वारेमाप महत्त्वाच्या. एक म्हणजे अफाट कष्ट नि दुसरं, वेळोवेळी परस्परांना मदतीचा हात. केवळ एकटंदुकटं कुटुंबच नव्हे, तर अख्खं गावच्या गाव किती तरी कामांसाठी एकत्र राबत असतं.

परुलीची माय पुन्हा एकदा गरोदर होती. दिवस भरले होते. मध्यरात्रीपासूनच तिला कळा सुरू झाल्या होत्या. तरीही भल्या पहाटेच उठून ती नित्याच्या कामाला

लागली होती. तिने आधी म्हशींना गोठ्यातून बाहेर काढलं नि दावणीला बांधलं. मग ती पाणी घेऊन आली. त्यानंतर तिने गायींना रानात चरायला सोडलं. इतकं सगळं आटोपल्यावर ती सासूला म्हणाली, "कळा खूपच वाढल्यायत. मी काही आता शेतावर येत नाही." सासू म्हणजे परुलीची आजी गोशाळेची साफसफाई करत होती. वाकल्या वाकल्याच ती बडबडली, "या पोरालाही आजच निपजायचं काही अडलं होतं का? पिकं कापणीसाठी आपली वाट बघत तिथं उभी आहेत! एक दिवस जरी उशीर झाला तरी उभं पीक स्वत:हून आडवं होऊन पडेल!" परुलीच्या मायनं वरमून मान खाली घातली. क्षणभर ती जागच्या जागी थांबली. मग पुढच्याच क्षणी कोयता हातात घेऊन ती शेताकडे निघाली.

आजी आता थकली असली तरी ती गुरांसाठी चारा कापायची, घरातल्या सगळ्यांसाठी स्वयंपाक करायची, गोठा साफ करायची. झालंच तर परुलीसोबत धाकट्या कमललाही सांभाळायची. ती म्हातारी असून जर एवढं सगळं करायची, तर परुलीची माय तर तरणीच होती. ती कशी सहजासहजी हार पत्करणार? त्यामुळे पायऱ्यापायऱ्यांच्या शेतांमधून मैलभर अंतराच्या पायवाटा तुडवत ती तिच्या शेतात येऊन दाखल झाली. येताना तिला एका नाल्यावरून उडी मारून यायला लागलं. शेताजवळ पोहोचत असतानाच तिच्या नाकात पिकाचा दरवळ शिरला. तयार झालेल्या पिकाचा सुगंध संपूर्ण दरीत पसरला होता. आत्ता कुठं तिला नेमकं उमगलं, अरेच्चा, तरीच सासूबाई कापणीसाठी एवढ्या उतावीळ झाल्या होत्या!

सूर्य डोंगरमाथ्यावर डोकावू लागला होता. त्याची कोवळी किरणं चीडच्या झावळ्यांमधून झिरपत जमिनीवर सांडत होती. नाही तर हां हां म्हणता उन्हं वाढली की तिला काही कामच करता आलं नसतं. तिनं साडी वर ओढली आणि कंबरेला घट्ट खोचली. तिला स्वच्छता नि टापटीप फार आवडायची. आठवड्यातून एकदा न विसरता ती डोक्यावरून न्हायची, रोजच्या रोज वेणीफणीही करायची; पण काही केल्या गेल्या दहा दिवसांत मात्र यांतलं काहीच जमलं नव्हतं. कामंच केवढाली होती! दिवस उगवल्यापासून मावळेपर्यंत तिला शेतावरच राहावं लागत होतं. त्यामुळे पसरलेल्या बटा आता तिच्या डोळ्यांवर येत होत्या. केसांचा तर एवढा गुंता झाला होता की, उभ्या जन्मात कधी तो सुटेल की नाही, अशी चुटपूटही तिला लागून राहिली होती.

कामाचा जेवढा म्हणून ती उरक पाडत होती तेवढ्याच तिच्या कळाही वाढत चालल्या होत्या; पण ती मात्र संपूर्ण शक्ती आणि वेगानिशी कामाचा डोंगर उपसत राहिली. निम्मं शेत कापून होता होता कळा एवढ्या असह्य झाल्या, की तिच्या डोळ्यांतून पाणी वाहायला लागलं. तेव्हा मात्र काम थांबवून तिला घराकडे परतणं



भाग पडलं. घरात आल्यावर ती खास बाळंतिणीसाठीच्या खोलीत शिरली, त्या वेळी कोणाचंही तिच्याकडे लक्ष नव्हतं.

परुली म्हशींना पाणी पाजायला आणि नित्याची अंघोळ घालायला नदीवर घेऊन गेली होती. म्हशीसारख्या भल्याथोरल्या प्राण्यासमोर सात वर्षं वयाची ही एवढीशी पोर किरकोळ जरी दिसत असली तरी म्हशींच्या अगडबंब देहाला रगडणं, इवल्या इवल्या ओंजळीतून त्यांच्यावर पाणी उडवणं आणि त्यांच्या खुरांना लागलेला चिखल-शेण धुवून साफ करणं, ही जबाबदारी परुलीचीच होती. तिचे लहानगे हात म्हशींच्या उंचच उंच कंबरेपर्यंत पोहोचत नसत. मग ती म्हशींना एखाद्या खडकापाशी आणायची आणि त्यावर उभं राहून मनोभावे आपलं काम संपवायची.

म्हशी धुण्याबरोबर घरातल्या सगळ्यांचं धुणं धुवायचं कामही परुलीकडेच होतं. रात्रभर एका विशिष्ट वनस्पतीच्या राखेच्या पाण्यात धुणं भिजत असायचं. रोजच्या धुण्याबाबतची ही कल्पना परुलीच्या आजीचीच होती. तिच्या मते ठेवणीतल्या व तलम कपड्यांसाठीच तेवढा साबण वापरावा. परुली उथळ पाण्यात उभ्याने समोरच्या दगडावर आपटून धुणं धूत होती. पाण्यात व्यवस्थित बुचकळून तिने सगळे कपडे नीट धुतले नि जवळच्या झाडीत पसरून वाळत घातले.

घराकडे लगबगीनं परतणाऱ्या मायकडे परुलीचं लक्ष गेलं. तिनं न्हायला सुरुवात केली होती; पण भराभरा त्या सगळ्याला आवर घालून लगेच घरी परतायचा निर्णय तिनं घेतला. घरी पोहोचल्यावर अजून आजीला स्वयंपाकात मदतही करायची होती. एका पानात काळजीपूर्वक गुंडाळून ठेवलेला साबण तिनं हातात घेतला. सैन्यात असलेल्या तिच्या बाबांनी मागच्या सुटीत घरी येताना अशा खूप साबणवड्या आणल्या होत्या. त्यातली एक आजीनं तिला न्हायला म्हणून दिली होती. एरवी साबणानं अंग खरखसून धुणं हे मूर्खपणाचंच लक्षण असल्याचं आजीचं मत होतं. न्हाण्यासाठी काही झाडांची सालं आणि चीकच ती वापरायची. कोणत्याही साबणापेक्षा ते झकास होतं.

परुलीनं तिचे लांबलचक केस ओणवून नदीच्या गार पाण्यात बुचकळले. त्यामुळे ते मुळांपर्यंत भिजले. त्यानंतर सावधपणे ती केसांमधून साबण फिरवू लागली. हातात साबण घट्ट धरलेला. त्याचा सुगंध तिला उत्फुल्ल करीत होता, आणि त्या सुगंधामुळे तिला वडिलांची आठवणही येत होती. शेवटी तिने साबण एका चपट्या दगडावर ठेवून दिला आणि ती केस घासू लागली. नंतर तिने केस स्वच्छ धुतले.

परुलीच्या अगदी जवळच म्हणजे फक्त काही पावलं अंतरावरच म्हशी पाण्यात डुंबलेल्या होत्या. त्यांचे फक्त डोळे आणि तोंडच तेवढं पाण्यावर तरंगताना दिसत होतं. मजेत पहुडलेल्या या म्हशींपैकी एकजण कूस बदलावी म्हणून काय ती हलली; पण तेवढ्यामुळे बचकभर पाणी उसळलं आणि साबण ठेवलेल्या दगडावर सांडलं.

पाहता पाहता परुलीचा साबण निसटून पाण्याच्या जोरकस लोंढ्यात हरवून गेला. परुलीच्या तोंडातून अस्फुटशी किंकाळी उमटली. साबण शोधायला ती निसरड्या खडकांवरून इकडे-तिकडे धावत होती. मात्र त्याचा काहीएक उपयोग नव्हता. साबण बापडा नदीच्या प्रवाहात कुठल्या कुठे वाहून गेला होता.

खिन्न होऊन ती म्हशींकडे वळली. आयुष्यात हीच काय ती अख्खी साबणवडी पूर्णपणे तिची एकटीची म्हणून तिला मिळाली होती. आता मायला कळलं तर ती काय म्हणेल? भरकन तिने हात-पाय धुतले, धुऊन वाळवलेला झगा पुन्हा अंगात घातला, वाळलेले सगळे कपडे गोळा करून गाठोडं डोक्यावर घेतलं आणि घराकडे म्हशी वळवल्या. झगा अजूनही थोडाफार ओलाच होता म्हणून पायाला चिकटत होता, पण परुलीच्या मनात मात्र हरवलेल्या साबणाचा विचार पिंगा घालत होता.

म्हशींना गोठ्यातल्या सावलीत नेऊन बांधत असताना वरच्या मजल्यावर झोपलेल्या मायचं कण्हणं ऐकून ती सैरभैर झाली. आजीनं अजून तिला औषधपाणी कसं दिलं नाही? निदान कोणाला तिनं बोलावून तरी घ्यावं की नाही? उदास झालेली परुली सशाच्या काळजानं पायऱ्या चढू लागली. साबणाची हकीगतही मायच्या कानावर घालायची होती. ते ऐकून घेतल्यावर मायनं तिचा हात हळूच हातात घेतला आणि म्हणाली, "जाऊ दे." परुली मायसाठी काही तरी खायला आणावं म्हणून निघाली, तर तिनं फक्त मान हलवून 'नको' म्हणून सांगितलं. जराशानं आजी कढत दूध आणि गूळ घेऊन आली. तेवढंच मायनं घेतलं.

परुलीचे आजोबाही आता घरी परतले होते. नांगर आणि कुदळ दुरुस्त करायला ते लोहाराकडे जाऊन आले होते. कारण या कापणीनंतर पुन्हा पेरणीच्या वेळी नांगर लागणार होता. आजोबा त्याच उठाठेवीत होते. जेवल्यावर त्यांनी गुडगुडीत पाणी, तंबाखू, विस्तव असा जामानिमा यथावकाश केला. गुडगुडी हातात घेऊन घरापुढेच एका झाडाखाली बारदानावर त्यांनी बैठक जमवली. त्यांना आता निवांत बसायचं होतं. गुडगुडी ओढत ते परुलीहून धाकटी कमला आणि अंगणातल्या वाळवणावर लक्ष ठेवून होते.

वर पाहिलं तर ढग जमू लागले होते. म्हणता म्हणता सगळं आभाळ ढगांनी भरून गेलं. ते पाहून आजीच्या काळजात गलबललं. ती नुकतीच जेवायला बसली होती. तिने कसेबसे दोन घास पोटात ढकलले नि ती स्वयंपाकघरातून बाहेर आली. परुलीला सोबतीला घेऊन भराभर ती शेताकडे निघाली. कारण पाऊस यायच्या अगोदर उरलेली कापणी संपवायला हवी होती. न थांबता, डोकं अजिबात वर न करता दोघींनी दुपारभर काम केलं. या दोघी कामसू स्त्रियांपैकी एकजण वयोवृद्ध अन् दुसरी अगदीच लहान होती. तिला फारसा अनुभव नव्हता. त्यामुळे प्रयत्नांची पराकाष्ठा करूनही त्यांची



कापणी संपेस्तोवर दिवस मावळायला आला होता. अंधारून आलं त्या वेळी इकडं परुली शेवटच्या पेंढ्या रचत होती नि तिकडं ढग बरसल्याविनाच आकाशातून पसार होत होते.

गायी परतायची वेळ झाली होती. बायका चीडच्या वाळलेल्या पाचोळ्याचे भारे डोक्यावर ठेवून घरी परतत होत्या. हा पाचोळा म्हणजे म्हशींचं अंथरूण. अंगणात दावणीला बांधलेल्या गुरांना माशा आणि डासांचा उपद्रव होऊ नये म्हणून जवळच केर कचऱ्याचा जाळ केलेला होता. त्यामुळे आसमंतात धुराची जणू चादर पसरलेली होती. गावातल्या वाटांवर इकडं-तिकडं पोरं खेळत होती. दुरून कुठून तरी बासरीचे सूर ऐकू येत होते.

आजोबांनी शेगडी पेटवली. किटलीत पाणी भरून ती विस्तवावर ठेवली. गावातले काहीजण अजूनही शेतावरच होते.

मायचं दुखणं आता आणखी जास्त होत चाललं होतं. दुपारनंतर आजोबांनी सुईणीला बोलावून घेतलं होतं. ती आता मायकडे लक्ष देत होती. गावातल्याच काहीजणी घराभोवती शांतपणे बसलेल्या होत्या. या सगळ्यांना बाळ आपोआप बाहेर यावं, असंच मनापासून वाटायचं. त्याच्यासाठी कृत्रिम प्रयत्न करायला त्यांना आवडत नसे. तरी या क्षणी त्यांच्या मनात विचार होता तो हाच, की त्या सर्वांच्या तिथं असण्यानं मायला बरं वाटेल.

देवळात संध्याकाळच्या घंटा वाजल्या नि त्याच वेळी मायनं फोडलेल्या एका किंकाळीसोबतच बाळ जन्माला आलं. ती मुलगी होती. कुटुंबातली तिसरी लेक. आजी, माय अन् आजोबा, तिघांना ढीग वाटत होतं, की या वेळेला मुलगाच होणार नक्की! पण तिसरी मुलगी झाली आणि सारं वातावरण नासलं. बहुतेकांना वाटलं, की पोरगी मेलेलीच जलमली असती तर झ्याक झालं असतं. "लेक म्हणजे परक्याचं धन. मुलगा कसा वंशाचा दिवा असतो, घराण्याला पुढे नेतो, म्हातारपणी आई-बापाच्या उपयोगी पडतो तो मुलगाच," अशी किती तरी मनोगतं एकामागून एक लोकांच्या तोंडून बाहेर पडली.

"माझ्या पोरानं तीन-तीन कार्ट्यांची लग्नं लावायला पैका कुठनं आणायचा?" आजी संतापानं बरळत होती. "माझ्यावर नक्कीच कोणाचा तरी कोप झालाय." माय पुटपुटत होती. तिला बापडीला काय माहीत, की मुलगा-मुलगी होणं बापावरच अवलंबून असतंय. बाळाच्या आईचा त्याच्यात काहीच दोष नसतो.

परुलीला तिच्या घरातल्या वडीलधाऱ्यांच्या मनातली खंत काही केल्या कळत नव्हती. अचानक घरातल्यांचा जो नूर पालटला त्याने ती धास्तावली होती. कारण ती स्वतःही मुलगीच होती. 'मुलाऐवजी मुलगी झाली असती तर तिला एवढं तुच्छ

मानतात? माझा जन्म झाला असतानाही अशीच माझ्या मरणाची इच्छा धरली असेल का सर्वांनी?'- अशा कोड्यांमध्ये अडकलेली परुली घराच्या मागच्या बाजूस निघून गेली. तिथं जाऊन म्हशीच्या गोठ्यात ती दडून बसली.

आजोबा शेकोटीजवळ बसून विचारात हरवून गुडगुडी ओढत बसले. घरात नवीन बाळाचं स्वागत अशा पद्धतीनं होणं काही बरोबर नाही. देव कोपला तर? न राहवून आजोबा म्हणाले,''आता एकदाची ही रडारड थांबवा! दिवसाची रात होतानाच्या वेळी पोर जन्माला आलीय. ही देवाची वेळ आहे, हे लक्षात ठेवा. देव या वेळेला त्याची शक्ती दाखवत असतो. त्यामुळे ही पोर म्हणजे देवाची आपल्यावर झालेली कृपा असं आपण समजायला पाहिजे.''

हे ऐकून अंगणात, व्हरांड्यात अन् मायच्या खोलीत बसलेले सर्व जण शांत झाले. जराशाने आजी ठेवणीतल्या ताटात तांदूळ, कुंकू नि गूळ घेऊन आली. काही झालं तरी घरात नवीन बाळ जन्माला आलं होतं. असं असताना आलेल्यांना टिळा लावून तोंड गोड केल्याशिवाय परत कसं पाठवायचं?

गोडधोड खाऊ घालायच्या या बारीकशा समारंभानंतर गावातल्या बायका घरोघरी निघताना म्हणाल्या,''देवाची कृपा! बाळंतिणीचा जीव त्यानंच वाचवला!''

कुमाऊँ भागातले शेतकरी ऑक्टोबर-नोव्हेंबरच्या काळात एवढे कामात असतात, की त्यांना अंगावरचे कपडे धुवायचीही फुरसद होत नाही. प्रत्येक माणूस शेतावर दिवसभर हजर राहिला पाहिजे. अशा वेळी आजारी पडणं म्हणजे संकटच. शिवाय आजाऱ्याबरोबर दुसरं एक माणूस परवडत नसताना घरी ठेवायचं म्हणजे आली का पंचाईत! म्हणून तर बाळंतपणासारख्या अवघड परीक्षेतून बाहेर पडल्यावरही मायच्या नशिबी विश्रांती नव्हतीच. दोन-तीन दिवसांनंतर लगेचच ती कामाला लागली. अंगणापलीकडच्या शेतावर, म्हणजे अगदी जवळच जायला लागलं म्हणून काय झालं? काम ते कामच! पोरगी रडली की आजोबा मायला हाक मारायचे. पोरीनं शी-शू केली असेल तर तिला नीट स्वच्छ करून माय पुन्हा कोरड्या दुपट्यावर टाकायची नि निघून जायची. दिवस मावळल्यावर अंधारून आल्यानं काम ज्या वेळी अजिबात शक्य नसायचं तेव्हा कुठे माय विश्रांती घ्यायला मोकळी व्हायची. कारण जुन्या रीतिरिवाजांप्रमाणे बाळंतीण काही दिवसांपर्यंत अपवित्रच असायची. त्यामुळे तिला घरातल्या कामातून सुटी मिळायची. म्हणून मग स्वयंपाक किंवा पाण्याला जाणं यापैकी काहीच मायच्या वाट्याला येत नसे. माय या रीतिरिवाजांबद्दल देवाचे आभार मानायची. कारण त्यामुळेच तर सकाळ-संध्याकाळ ती बाळाबरोबर निवांतपणे आराम करू शकायची. केवळ तेवढ्यामुळेच तर उन्हं डोक्यावर आल्यानंतर शेतावर जायची



तिला मुभा मिळायची.

बाळाच्या जन्मानंतर बारा दिवसांनी त्याचं 'बारसं' होणार होतं. भल्या पहाटेच आजोबांनी त्यांच्या नेहमीच्या भटजीबुवांना बोलावणं धाडलं. भटजीबुवाही स्वतःच्या शेतीत गढले होते म्हणून त्यांना थोडा वेळ लागला. मायची मात्र आज खास अंघोळ आणि इतर स्वच्छता आवश्यक होती. म्हणून पहाटे थंडीचा जोर जास्त असल्यानं आजीनं आज तिला घरातलंच काम कर म्हणून सांगितलं. मायनं तिची खोली नीट झाडून चिकणमाती आणि शेणानं सुबकपणे सारवली. आजीनं उंबरठ्यावर तांदूळ आणि फुलं टाकली. परुली उदबत्ती लावून खोलीत ठेवून गेली. त्या वेळी उन्हंही येऊ लागली होती. मायनं तिच्या बाळंतपणात वापरलेलं अंथरूण, पांघरूण, उशांचे अभ्रे, चादरी, अंगावरचे-कपडे सगळं एकत्र केलं. ते गाठोडं घेऊन ती झऱ्याकडे गेली. या झऱ्याचं पाणी फक्त अंघोळ व धुण्यासाठीच वापरलं जात असे. प्यायचं पाणी आणायला वेगळी जागा होती. तिथं जाऊन माय तिचे अस्वच्छ कपडे धुऊ शकणार नव्हती. पाणी चांगलं होतं. उन्हामुळे ऊबही पसरली होती. पण मायच्या नाजूक देहाला एवढे मोठमोठाले कपडे धुवून शिणायला झालं. परुलीनं वाळलेल्या गवतावर धुणं वाळत घालायला तर मदत केलीच, शिवाय गोमूत्रही आणून दिलं. जवळच्या झाडावरची एक विशिष्ट प्रकारची औषधी डहाळी खुडून परुलीनं ती गोमूत्रात बुडवून ते कपड्यांवर शिंपडलं. कपडे शुद्ध म्हणजे जंतुरहित करण्याची ही पारंपरिक पद्धत होती. आता दिवसभर वाळून कोरडे झाल्यावर हे कपडे घरात न्यायचे. थोडी झबली दुपटी घेऊन परुली नि माय घरी आल्या तेव्हा आजीनं झटपट मायच्या हातात गरम चहाचा पेला ठेवला. सोबत बाळंतपणानंतर काही आठवड्यांपर्यंत द्यायचा खुराकही दिला.

आजी म्हणाली, ''हे घे खाऊन. अंगात थंडी शिरली असली तर यानं बरं वाटेल.'' सकाळी सारवलेली मायची खोली चांगली वाळली होती. गोमूत्र शिंपडण्याचा कार्यक्रम इथंही झाला. आता माय अशुद्ध राहिली नव्हती, पवित्र झाली होती. ती आता स्वयंपाकघर, देऊळ, पाणवठा कुठंही बिनघोरपणे जाऊ शकणार. आता दुसरं कोणी बसलेल्या चटईवर ती खुशाल बसू शकणार.

भटजीबुवा दुपारनंतर पिवळ्या फडक्यात गुंडाळलेली पोथी, पांढरं स्वच्छ धोतर-सदरा आणि पायांत कॅनव्हासचे बूट घालून आले. त्यांची शेंडी मानेपर्यंत लोंबत होती. चंदनाच्या तीन समांतर रेषा भटजीबुवांचं कपाळ व्यापून होत्या. उंबरठ्याच्या आत पाऊल ठेवता ठेवताच त्यांनी संस्कृतमध्ये पुटपुटत दोन-चार श्लोक वातावरणात सोडले. भटजीबुवांचं वय पन्नाशीच्या वर असावं. ते काशीला जाऊन संस्कृत ग्रंथ शिकून आलेले होते.

माय तिची सर्वांत सुरेख साडी नेसून बसली होती. रंगीत ओढणीही तिनं खांद्यावर

घेतली होती. तिच्या फिकट पिवळ्या चेहऱ्यावर लाल कुंकू उठून दिसत होतं. हातांत चांदीची कंकणं नि गळ्यात मंगळसूत्रासोबत सोन्याचा एक हारसुद्धा तिनं घातला होता. नाकात नथ नि पायांत तोरड्या होत्याच. माय जेव्हा भटजीबुवांनी सांगितल्यावर बाळाला घेऊन बारशाच्या पूजेसाठी येऊन बसली तेव्हा तिच्याकडे पाहून परुलीला वाटलं, एवढे सगळे कष्ट सोसूनही आपल्या मायचा चेहरा किती सुंदर दिसतोय! तिकडे मायच्या मनात मात्र घालमेल चालली होती, की बारशाच्या पूजेसाठी तिचे यजमान तिच्या शेजारी बसले असते तर ती याहून जास्त नटूनथटून पूजेला बसली असती. मात्र, पूजाविधी पार पाडायला रीत म्हणून कोणी तरी हवं यासाठी मायचा चुलत दीर त्या आसनावर बसला होता. गेरूनं आखलेल्या नि तांदळाच्या ओल्या पिठीनं रेखाटलेल्या भूमीवर शंख, घंटा, धूप, अगरबत्ती, फुलं, पानं, दूर्वा, चंदन, कुंकू, तांदूळ, नारळ, बत्तासे या सर्व वस्तू जिथल्या तिथे नीट मांडून ठेवलेल्या होत्या. भटजीबुवा अस्खलितपणे संस्कृत मंत्र म्हणत होते. अवघं घर स्वच्छ, सुगंधित झालं होतं. आलेल्या माणसांनी गजबजून गेलं होतं.

बाळाचं नाव ठरवण्यासाठी नि बाळाचं भविष्य नीट सांगता यावं म्हणून भटजीबुवांनी बाळाच्या जन्माची नेमकी वेळ विचारली.

आजोबा उत्तरले, "दिवस अन् रात जेव्हा एकमेकांना भेटतात, नेमका त्या वेळी पोरीचा जन्म झाला." माय म्हणाली, "सूर्य संपून मावळल्यावर पूर्वेला गुरूची चांदणी दिसायच्या अगोदर' पश्चिमेच्या क्षितिजावर शुक्राची चांदणी लुकलुकायला लागते ना, तेव्हा पोरीचा जन्म झाला होता." माय पुढे म्हणाली, "मी घड्याळसुद्धा पाहिलं होतं. त्या वेळी ६.४५ वाजले होते." भटजीबुवा पोथीची पानं उलगडत म्हणाले, "बरं, असू दे. मी बघतो काय ते." मग भटजीबुवा त्यांच्या गणितात गढले. सगळं कुटुंबच्या कुटुंब शांतपणे त्यांच्याकडे डोळे लावून होतं.

एकदाचं मौन संपवून भटजीबुवांनी कथन केलं, "ही मुलगी या संपूर्ण कुटुंबासाठी सुख-संपत्तीचं द्वार आहे. हिचे ग्रह सांगतात त्याप्रमाणे हिच्या पाठोपाठ एका पुत्ररत्नाचा लाभ होईल." या वाक्यानं समस्तांचे डोळे आनंदानं चमकायला लागले. आजीला तर अस्मान ठेंगणं झालं होतं. आता तीच या कारणामुळं लहान पोरीचे गोडवे गायला लागली म्हटल्यावर इतर जण तरी कसे मागे राहणार? परुलीलाही काही तरी खूप चांगली घटना घडल्यासारखं जाणवत होतं. मायचा दंड धरत ती आरडाओरडा करायला लागली, "धाकटीला माझ्या हातात दे. मला दुसऱ्या मुलांना ती दाखवायची आहे. तू तर म्हणाली होतीस ना, बारशाच्या दिवशी हिला बाहेर उन्हात न्यायचं? मग दे नं माय, तिला माझ्या हातात दे."

"अगं, जरा थांब परुली. असं करू नकोस." माय म्हणाली, "आधी भटजीबुवांना मंत्रपठण संपवू दे. होमाचा अग्नी पेटू दे. त्याआधी धाकटीला बाहेर नेलं तर आंधळी व्हायची भीती आहे."



मागचा-पुढचा कोणताच विचार न करता आपण वेडावाकडा हट्ट धरला की काय, असं मनात येऊन परुली गांगरली. एकीकडे निराशही झाली, कारण शेजारची किती तरी मुलं तिच्या धाकट्या बहिणीला बघण्यासाठी आतुरतेनं बाहेर उभी होती. तिचा हात हातात घेऊन माय हलकेच कुजबुजली, "थोडं थांब परुली. आपण त्या सगळ्या बालगोपाळांना टिळा लावू. आजीने केलेला गोडधोड खाऊ वाटू."

पवित्र अग्नीचा होम पेटवण्यात आला. भटजींनी मंत्रोच्चारासह फुलं, तांदूळ आणि कुंकवाची आहुती दिली. माय तर नटलेली होतीच, पण गावातल्या आणखी कोण कोण बायकाही बारशासाठी रंगीबेरंगी सुरेख साड्या नेसून आल्या होत्या.

माय धाकटीला घेऊन होमाजवळ तिच्यासाठी मांडलेल्या आसनावर जाऊन बसली. या प्रसंगासाठी नवरा हजर नाही याची खंत चेहऱ्यावर दिसू नये याचा ती आटोकाट प्रयत्न करीत होती. पूजेनंतर मायनं हळूच बाळाच्या चेहऱ्यावरचं वस्त्र बाजूला सारलं नि सूर्यकिरणांचं प्रथम दर्शन घडवलं. भगभगीत उजेड धाकटीच्या तोंडावर आल्याबरोबर ती भरभर पापण्यांची उघडझाप करायला लागली.

पोरीचं नाव सर्वांत आधी स्वतः तिच्या कानात सांगायला हवं होतं म्हणून भटजीबुवांनी तिच्या कानाभोवती ओंजळीचा आडोसा केला नि हळूच पुटपुटून तिला तिचं नाव सांगितलं. मग बाकींच्याकडे वळून मोठ्याने म्हणाले, "मुलीचं नाव मानवती."

आजी म्हणाली, "मानवती... मानवती म्हणजे आम्ही तिला 'मानुली' म्हटलं तरी चालेल." परुली लगेच तिच्या सवंगड्यांना हे नाव सांगण्यासाठी बाहेर धावली. "मानवती, माना, मानुली..."

बारशाचा समारंभ दिवसभर चालणार होता. शेतातली कापणी नुकतीच संपलेली असली आणि शेतात-खळ्यात भरपूर कामांचा ढीग साठून असला तरी बारशासारखा समारंभ साजरा करायला म्हणून सर्वजण इथंच मनापासून थांबले होते. काही तरुणांनी बाहेर चुली मांडल्या होत्या. त्यावर वरण-भात, भाज्या, शिरा असं काहीबाही रांधलं जात होतं. काही बायका आत स्वयंपाकघरात वडे, पुऱ्या, रायतं, दही, चटणी या सगळ्यांची सिद्धता करत आजीला हातभार लावत होत्या. कुणी वाढत होतं तर कुणी प्यायचं पाणी भरून आणत होतं. हे काम फक्त या एकट्या कुटुंबाचं नसून अख्ख्या गावाचंच जणू होतं.

आधी पुरुषमाणसं जेवून व्हरांड्यात जाऊन बसली. तिथे गुडगुडी, विड्या, सिगारेटी सर्व काही ठेवलं होतं. बायका मागाहून जेवल्या. त्यांनी स्वयंपाकाची सगळी

भांडी नि वाट्या-पेले काही तरुणांच्या मदतीने झऱ्यावर नेऊन घासून-धुऊन आणून ठेवले. ही सगळी भांडी अंगणातल्या कठड्यावर उपडी करून नंतर वाळायला ठेवली. आता मानुलीला सगळ्यांनी कुंकवाचा टिळा लावायला सुरुवात झाली. सगळ्यांनी तिला टिळा लावून पैसे, कडं असं काय काय भेट म्हणून दिलं.

सांजच्याला सर्व बायकामाणसं आपापली भांडीकुंडी घेऊन हसत-बोलत आपापली पुढची कामं आटपायला निघाली. पुरुष मात्र आणखी थोडा वेळ विडी-सिगारेट ओढत गप्पागोष्टी करत थांबून होते.

मानाच्या जन्माला आता पाच वर्षं होऊन गेली होती. दरम्यानच्या काळात मायला एक मुलगाही झाला होता. वंशाचा दिवा. त्याचं श्रेय मानालाच मिळत होतं, कारण तो तिच्याच पाठीवर झाला होता ना! त्यामुळे माना आता सगळ्यांची लाडकी झाली होती. आजोबांनी तिच्यासाठी पैंजणं घेतली होती. ती घालून ती जिथं जायची तिथं माना येतेय अशी वर्दी तिची घुंगरं आधीच द्यायची. आजीनं शंकराच्या देवळाजवळच्या बाजारातून तिच्यासाठी लाल-पिवळ्या रंगांच्या बांगड्या आणल्या होत्या. बाबांनी मागच्या वेळी सुटीत घरी येताना मानासाठी एक गोलाकार लहानशी टोपी नि एक सुंदर रंगीत, नक्षीदार पोषाख आणला होता. कुटुंबात आजवर सर्व मुलींना गडद रंगाचे टिकाऊ असे सुती नि जाडेभरडे कपडेच मिळायचे. डोक्यावरून घेण्यासाठी पट्ट्यापट्ट्यांचीच शाल फक्त मिळायची... पण परुलीची मात्र चैन होती. परुली तिची साधीसुधी शाल फारच जपून ठेवायची. बाजाराला जातानाच काय ती तेवढी बाहेर काढायची. परुलीलाही वाटायचं, की कुटुंबाला सुखाचे दिवस दिसलेत ते मानाच्याच पायगुणामुळे. म्हणून मानासारखं आपल्याला ऐटबाजपणे राहता येत नाही, याचं दुःखही तिला व्हायचं नाही.

एके दिवशी माय खालच्या दरीत खूप लांबपर्यंत दळणासाठी निघाली होती. मानुलीन तिच्यासोबत जायचा हट्ट धरला. मायनं तिची समजूत काढली. 'अग, तू कशी येणार? तुझी पावलं बघ किती छोटी छोटी आहेत! तू कशी एवढी चालणार' असं तिला सांगितलं. त्यावर मानानं "नाहीच मुळी. माझी पावलं मोठीच आहेत," असं म्हणत दाणकन् आपलं पाऊल मायसमोर आपटलं. तिच्या पायांतली घुंगरंही त्यामुळे रुणझुणली. मायनंही तिच्या पावलाजवळ स्वतःचं पाऊल ठेवलं. पाऊल मानाच्या पावलापुढे तिचं मजबूत दिसत होतं; पण रखरखीत कातडी अन् थंडीमुळे तळपायाला भेगा पडलेल्या. शेतात दवामुळे सर्वत्र ओलंचिंब झालेलं असतानाही बूट मिळाले नाहीत म्हणून न थांबता या पावलाने हवाई चपलांवरसुद्धा काम भागवून नेलं होतं. ते पाऊल दाखवत माय म्हणाली, "पाणचक्कीपर्यंत जायला हे असलं पाऊल हवं बरं का माना! एवढंच नाही, तर वाटेतली जोरात वाहणारी खोल खोल नदी पण ओलांडावी लागते." मायला वाटत होतं, की असलं काही तरी ऐकल्यावर पोरगी माघार घेईल... पण मग ती माना कसली? पाणचक्कीला भेट द्यायचा तिचा निर्णय ठाम होता.

"परुली तुझ्याबरोबर पाणचक्कीपर्यंत जाऊन आलेली आहे आणि तिचं पाऊलसुद्धा तुझ्या पावलापेक्षा खूप लहान आहेच की!" असं रागानं सांगता सांगता मानुलीच्या डोळ्यांत पाणी तरळलं होतं.

मायनं पदराच्या शेवात बांधलेले तीळ-तांदूळ तिला दिले. घराजवळ लावलेल्या भाजीपाल्याजवळ वाढलेला ऊसही काढून कोयत्यानं तिने त्याचे करवे करून मानाला दिले. आता तरी तिचा हट्ट थांबेल असं वाटलं. मग "आज नको मानू. पुन्हा केव्हा तरी," असंही सांगून पाहिलं. गव्हाच्या पिशवीचं ओझं पेलत ती निघाली.

"पुन्हा केव्हा?" मानाला पुरतं ठाऊक होतं, की 'पुन्हा केव्हा' या म्हणण्याला तसा काहीच अर्थ नसतो. उसाचा करवा हातात धरलेली माना आता रडायला लागली.

मायनं शेवटी निकाल लावला. "अग, तुझ्या धाकट्या भावाला पण तुला बघावं लागणार आहे की नाही? आजोबा बाजाराला गेलेत." आता तर मानानं रडण्याऐवजी ओरडणं सुरू केलं. तेवढ्यात आजोबाही अंगणात दिसले. त्यांना लहान मुलांना रडू दिलेलं आवडायचं नाही. एकूण परिस्थितीचा अंदाज घेत त्यांनी फर्मान काढलं, "सूनबाई, पोरीला कशापाई रडवतेस? घेऊन जा तिला सोबत." परिणामी, जराशानं मानुली मायबरोबर पाणचक्कीच्या वाटेवर निघाली. मायशी बोलत बोलत ती तिच्या मागोमाग चालत होती. "ती शेतं पण आपलीच का ग माय?" "ती झाडं कसली ग?" "माय, ती बघ शेरडं. किती छान आहेत, नाही का ग?" मध्येच माना एका मेंढराच्या पाठीवर थोपटावं म्हणून रेंगाळली. माय मात्र पुढं पुढंच निघाली होती. डोईवरच्या ओझ्यामुळे तिची मान, पाठ आता दुखायला लागली होती. मानुलीचा कानोसा घ्यायला तिनं मागे वळून पाहिलं, तर मानुली किती तरी मागं राहिलेली, मेंढराशी खेळण्यात रमलेली तिला दिसली. मायला संताप आला. "माना, येतेस का नाही? नाही आलीस तर मी तुला इथंच सोडून जाणार आहे! इथं एक मोठ्ठा वाघ आहे. तो मग तुझा चट्टामट्टा करेल!"

मानुलीनं वाघ कधीच पाहिलेला नव्हता, त्याच्याबद्दल ऐकलं मात्र भरपूर होतं. त्यामुळे कल्पित वाघोबाच्या भीतीनं ती घाबरली. बाणासारखी धावत मायपाशी येऊन म्हणाली, "आता नाही मी मागं राहायची. वाघानं मला गुपचूप मागनं येऊन धरलं तर?" पुढच्या काही क्षणांत तिला वाघोबाचा विसरही पडला. पूर्वीसारखीच मजेत ती काहीबाही बोलू लागली, "माय ग, देवानं इतके भयंकर प्राणी का बरं जन्माला घातले? वाघोबा खरंच मुलांचा चट्टामट्टा करत असतो का ग?"

थोडा वेळपर्यंत माय ही सगळी चिवचिव मुकाट्यानं ऐकून घेत होती. नंतर मात्र न राहवून ती रागावली. "गप्! नीट चल! ही वाट अरुंद तर आहेच, शिवाय दगडधोंड्यांनी भरलेली. पावलोपावली ठेचकाळायला होतं." ज्याच्याबद्दल माय जपून राहावं म्हणून सांगत होती ते ऐकता ऐकताच घडूनही गेलं. मानाचा तोल गेला आणि तिचं पाऊल एका अणकुचीदार दगडावर आदळून अंगठा सोलला गेला.

"माय ग माय... माझा अंगठा तुटला बघ! आता काय होईल? मी मरीन का ग माय?" अशा शंका उपस्थित करत माना किंचाळू लागली. तिच्या पावलाचा अंगठा रक्तबंबाळ झाला होता. मायनं गव्हाची पिशवी डोक्यावरून खाली घेऊन कडेला ठेवली. मानुलीपाशी येऊन मायनं तो अंगठा जोरात दाबून धरला. रक्त वाहायचं थांबलं. मग ती म्हणाली, "या जखमेवर तू आता मुती कर." मानुलीनं तसंच केलं. जराशानं अंगठा दुखायचा कमी झाला. "आज पहाटे माझ्यावर कोणाची तरी वाईट नजर पडली असावी!" असं म्हणत मानुली हसली नि पुन्हा मजेत चालू लागली.

"अग, तू काय बोलतेस ते तुला तरी कळतंय का?" असं मायनं तिला विचारलं, तोवर मानुली बरीच पुढं निघून गेली होती. तिला दूर कुठं तरी नदीच्या वेगवान प्रवाहाचा ध्वनी ऐकू आला. पाणचक्कीला जाण्याआधी ओलांडावी लागणारी हीच ती नदी. काठाशी पोहोचल्यावर मायनं मानुलीला तिथेच थांबवलं. स्वतः मात्र गव्हाची पिशवी पलीकडं नेण्याच्या तयारीनं पुढे झाली. तिनं साडी गुडघ्यापर्यंत वर धरली आणि जपून पावलं टाकत ती नदी ओलांडू लागली.

मानुली या निरंतर वाहणाऱ्या पाण्याच्या प्रवाहाच्या दर्शनानं मंत्रमुग्ध झाली होती. मध्ये मध्ये दगडांवर पाणी आदळल्यानं बुडबुडे भिरभिरत होते. काठाजवळचं पाणी मात्र संथ होतं. तिथं मानुलीला मासोळ्याही दिसल्या. पाण्याच्या जवळ जाण्याचं मात्र तिला काही केल्या धाडस होत नव्हतं. एका दगडावर मग ती निवांत बसली नि मायला पलीकडं जाताना कुतूहलानं बघत राहिली.

पाणचक्कीजवळ दोघी पोहोचल्या तेव्हा तिथं चिटपाखरूही नव्हतं. चक्की बंदच होती. चक्कीच्या मागच्या बाजूला उंच काही तरी होतं. त्यावरून पाणी वाहत होतं. त्या पाण्याला रोखण्यासाठी ठेवलेला रुंद दगड मायनं बाजूला केल्याबरोबर धो धो पाणी वाहू लागलं. ते एका पन्हळीतून वाहत पाणचक्कीच्या खोलीतल्या तळमजल्यावरील मोठ्या रहाटावर पडू लागलं. त्यामुळं घुर्रर घुर्रर असा मोठा आवाज करत पाणचक्की जोरात फिरू लागली. पाणचक्कीच्या वरच्या खोलीतली जात्याची पातीही त्यामुळं वेगात फिरू लागली. मायनं गव्हाची पिशवी आत आणली. फिरणाऱ्या जात्याच्या मध्यभागी बरोबर वर मोठं टोपलं लोंबत होतं. त्यात तिनं गहू ओतले. टोपल्याच्या



तळाशी असलेल्या भोकातून गहू खाली गळू लागताच मायनं मानुलीला हाक मारली. त्या भोकापाशी हात ठेवून "खूप गहू एकदम पडू देऊ नकोस" असं बजावलं. मायचं हे चातुर्य बघून मानुली थक्कच झाली होती. त्या वेळी घरघरणाऱ्या जात्याच्या एवढ्या जवळ उभं राहण्याची तिला धास्तीही वाटत होती. पण कुठलीही नवी गोष्ट जवळून पाहण्याचं धाडसही मानुलीत तेवढंच होतं. मानुलीनं हात बाजूला करताच गव्हाचे दाणे जात्याच्या छिद्रात सरसर पडू लागले. टोपलं नि घरघरणारं जातं यांच्यात एक लाकडी फळी होती. जात्यामुळे तीही हलायची नि त्यामुळे टोपलं हलायचं. त्यामुळे गव्हाचे दाणे अखंडपणे खाली पडू शकत होते. बघता बघता गहू भरडले जाऊन जात्यातून शुभ्र पीठ गळू लागलं. मानुलीला ते दृश्य बघून परम आश्चर्य वाटलं.

ती बघतच राहिली. ज्या कणकेची पोळी ती रोज खाते, ती अशा तऱ्हेनं तयार होते हे तिला आज, आत्ता, या क्षणी नव्यानं कळलं.

तेवढ्यात मायनं हाक मारली, "मानुली, बाहेर ये. चक्की सुरळीत चाललीये. आपण आता बाहेर आक्रोडाच्या झाडाखाली सावलीत बसू." पण मानुली मात्र आतल्या चमत्कारानं चकित झाली होती. तिचा तिथून पाय निघत नव्हता. मायनं तिला उचलून कडेवर घेतलं नि ती झाडाखाली येऊन बसली. मनावरचा प्रभाव ओसरेपर्यंत मानुली जेमतेम शांत बसली. नंतर मात्र ती मायच्या कडेवरून खाली उतरली. मग दोघी मायलेकींनी आक्रोड आणि घरून आणलेल्या तिळाचा आस्वाद घेतला. बराच वेळ बसून राहिल्यावर माय उठली नि समोरच्या भातशेतातलं तण काढू लागली. मानुलीनं न राहवून विचारलं, "माय ग, तू दुसऱ्यांच्या शेतातलं काम कशासाठी करतेयस?"

"हेसुद्धा आपलंच शेत आहे बरं का, मानू. आजोबांकडून खूप वर्षांपूर्वी एका गरीब माणसानं पैसे उधार घेतले होते. ते तो परत करू शकला नाही. त्याऐवजी त्याचं हे शेत त्यानं आपल्याला दिलं. किती दिवसांत इथलं तणच काढायला कोणाला जमलं नाहीये बघ." एवढं बोलून झाल्यावर माय जणू मानूलाच विसरली नि रोपांशी काय ते बोलू लागली.

थोडा वेळ मानुली मायकडे एकटक बघत राहिली. नंतर कंटाळली. आता तिनं नदीकडे आपला मोर्चा वळवला. नदीशेजारी तिला अप्रतिम दृश्य दिसलं. तिथं दाट झाडी होती. त्यांची मुळं निम्मी मातीत तर निम्मी पाण्यात होती. लांब लांब फांद्या पाण्यात पसरून नदीत खेळत होत्या. "अहा! या फांद्या मला धरता येतील का?" असा विचार लखकन् मानुलीच्या मनात आला.

पुढच्याच क्षणी एका किंकाळीनं भानावर आलेल्या मायच्या मनात पहिला प्रश्न

आला, "मानुली कुठं गेली?" ती नदीकडे धावली तर शेवाळलेल्या दगडांवर घसरणारी मानू हातात फांद्या घट्ट धरून वर चढायची झटापट करताना तिला दिसली. जंग जंग पछाडूनही वर चढण्याऐवजी ती पाण्यातच घसरून येत होती. या फांद्यांचा आसरा नसता तर एव्हाना ती पाण्याच्या जोरदार प्रवाहाबरोबर वाहूनही गेली असती.

दोन-तीन मिनिटांतच उड्या टाकत माय तिच्यापर्यंत पोहोचली. तिनं मानूला पाण्यातून बाहेर ओढून काढलं. चिंब भिजलेली मानू अगदीच भेदरली होती. चेहरा पांढुरका झाला होता. ती जिवंत हाती लागली म्हणून मायनं सुटकेचा निःश्वास टाकला. लगोलग तिनं मानूचे ओले कपडे तिच्या अंगावरून उतरवून आपला पदर तिच्याभोवती पांघरला. मानूला कडेवर घेऊन माय फिरून चक्कीकडे वळली.

चक्कीपाशी पोहोचल्यावर मायनं मानूचे ओले कपडे वाळत घातले नि तिला स्वतःच्या गुडघ्यांवर बसवलं. तिला उन्हाची ऊब देणं हाच उपाय मायला सुचत होता. थोड्या वेळातच मानुली झोपी गेली. मायनं पाचोळ्यावर रिकामं पोतं टाकून त्यावर मानूला झोपवलं नि ती स्वतः चक्कीकडे गेली. गहू नीट दळले जाताहेत हे पाहून माय बाहेर आली, तर तिला झाडाखाली कोणी तरी एक बाई बसलेली दिसली. तिच्याजवळचा कोयता आणि दोरखंड पाहून ती सरपण आणायला निघाली असेल असं वाटत होतं.

ती बाई मायला म्हणाली, "तुझी लेक खूपच देखणी आहे. सरळ नाक, गुलाबी गाल, चाफ्याच्या फुलासारखं अंग, लांबसडक नि मऊशार केस. हिला नक्कीच खूप चांगला नवरा मिळणार."

"तू एवढं चांगलं बोललीस, ते ऐकून जिवाला बरं वाटलं बाई. पुढचं कोणी पाहिलंय? ज्योतिष्यानं आधीच सांगितलंय, हिच्या भाग्यात खूप अडचणी आहेत म्हणून. हिच्या पायगुणानं आमच्या घराचं गोकुळ झालं एवढं मात्र अगदी खरं," मायनं त्या बाईला असं सांगितलं.

ती बाई तिच्या गावात नुकतंच एक लग्न थाटामाटात कसं पार पडलं त्याबद्दल सांगत होती. त्यातला हुंडा केवढा, किती माणसं आलेली, वऱ्हाडांमधली कोण कोण माणसं, काय नि काय! नवरीचं सौंदर्य, तिचे कपडे, दागिने असं आणखी काय काय तिनं भरभरून सांगितलं.

मानुली स्वतःच्या नावाच्या उल्लेखामुळे मघाशीच जागी झालेली होती. लग्नाच्या सविस्तर वर्णनानं ती कंटाळली. मायला म्हणाली, "आपण चक्कीजवळ जायचं का माय? मला थंडी वाजतेय." ती बाई हसून तिला म्हणाली, "लग्नाच्या गोष्टींची माहिती तुझ्यासारख्या मुलींनी नीट करून घ्यायला हवी!"

"मी मुळी लग्नच करणार नाही!" मानूचं असं ताडकन् रागावलेलं उत्तर अनपेक्षितच होतं. ती बाईही एकदम उठून म्हणाली, "मला आता सरपणासाठी निघायलाच हवं, नाही तर सासू रागावेल. ती तर मला श्वास घ्यायचीही मोकळीक देत नाही. केसांना फणी लावायलाही मला वेळ होत नाही बघ. माझं नशीबच तसं! पण तुझं मात्र परमेश्वर अगदी कल्याण करो बाई!" असं म्हणत ती निघाली.

मायनं मानुलीला पाठुंगळीला घेतलं. तिचे ओले कपडे नि रिकामं पोतं घेऊन माय चक्कीकडे निघाली. चक्कीच्या खोलीच्या दाराशी एक म्हातारा गुराखी बसला होता. वाळलेल्या काटक्या जमवून त्या पेटवण्यासाठी तो दगड आणि लोखंडाचा तुकडा एकमेकांवर घासत ठिणगी उडवायचा प्रयत्न करत होता. शेकोटी पेटल्यावर त्यानं त्यात आक्रोडही भाजून घेतले.

"ये ताई, इथं बैस. लेक किती भिजलीय ग?" त्यानं असं म्हणताच माय त्याला सारी हकीगत सांगू लागली-

"तुझ्या लेकीला धक्का बसला असेल बहुतेक. ती दुबळी आहे तोवर तिला दुष्ट आत्मे त्रास देऊ शकतात. मी तिच्यासाठी अंगारा देतो." तो मायला असं म्हणाल्यावर ती आनंदाने 'हो' म्हणाली. आणखी थोड्या वाळक्या काटक्या जमवायला तिनं त्याला मदत केली. मग त्या गुराख्यानं हातात राख उचलून कुठलेसे मंत्र पुटपुटले नि मानूच्या कपाळाला अंगारा लावला. शेकोटीच्या उबेनं मानुलीला खूप बरं वाटलं. तिचे कपडेही एव्हाना वाळले होते. माय तिला घेऊन घरी परतायच्या तयारीला लागली.

"सूर्य आता पश्चिमेकडल्या त्या टेकड्यांच्या फक्त हातभर उंच राहिलाय. आपल्याला इथं जास्त थांबून चालणार नाही." माय तिला म्हणाली. तिला तान्ह्या बाळाचीही काळजी आता वाटत होती. त्याला पाजायची वेळ झालीच होती. गुराख्याचे आभार मानून ती कणिक गोळा करू लागली. थोडीशी कणिक तिने तिथंच ठेवलेल्या एका भांड्यात घातलं. तो चक्कीवाल्याचा मोबदला होता. तो तिथं नसला तरी तिने त्याचे आभार मानले. एवढंच नव्हे; तर देव, पाणी नि जात्याचेही आभार मायनं आधी मानले. मग मानुलीलाही तसंच करायला सांगितलं अन् दोघी घराकडे निघाल्या.

नदी ओलांडायलाच काय तो वेळ लागला. त्यानंतर त्यांनी वेग वाढवला. मध्येच मानुलीनं विचारलं, "माय, आपण पाणी अन् दगडांना काय म्हणून नमस्कार केला?"

"तेही देवाचंच रूप." मायनं असं उत्तर देताच मानुलीचा पुढचा प्रश्न होता, "तू रोपांशी काय म्हणून बोलत होतीस? त्यांना ऐकायला येतं?"

"येतं. मला तरी असं वाटतं की त्यांना आपण बोललेलं सारं समजतं. आपण कौतुक केलं तर रोपं डोलतात. आपण पायदळी तुडवलं तर ती रडतात. आपण पाणी दिलं की ती आनंदानं झुलतात." मायनं सांगितलेलं हे सूत्र मानुलीला दीर्घकाळपर्यंत स्मरणात राहिलं.

माय अन् मानुली घरी पोहोचल्या तेव्हा काळू कुत्रा पायऱ्यांखाली झोपलेला होता,

तो चाहुलीनं जागा झाला. आनंदानं तो त्यांच्या भोवती भोवती घुटमळू लागला.

व्हरांड्यात गावातले पुरुष-बायका, सर्व जमलेले. माय दळण घेऊन पटकन् स्वयंपाकघरात गडप झाली. तिथं विस्तव पेटलेलाच होता. चहूकडे धूरच धूर भरलेला. मोठ्या किटलीत चहाचं आधण दिसलं. म्हणजे आजीनं बऱ्याच माणसांसाठी चहाची तयारी चालवलेली होती. वर्षानुवर्षं या धुराच्या साम्राज्यात राहिल्यानं आजीला मोतीबिंदूचा त्रास अलीकडे सुरू झाला होता. मायला कोणी तरी सांगितलं होतं, की अजिबात धूर होऊ न देणाऱ्या चुलीही दगड-मातीच्या आधारे घडवता येतात. म्हणून मायनं तशी चूल घडवायचं पक्क ठरवलंही होतं.

आपल्या घरात या क्षणी नेमकं काय नवीन घडतंय् याचं कुतूहल मानुलीच्या मनात असल्यानं सभोवती खेळणाऱ्या बरोबरीच्या मुलांकडे दुर्लक्ष करून ती पायऱ्या चढून वर आली. गर्दीतून वाट काढत पुढं आल्यावर तिला तिथं खाकी कपडे घालून बसलेला सैन्यातला एक माणूस दिसला.

"मानू, माझी बाळ!" असं म्हणत म्हणत गणवेशातल्या तिच्या वडिलांनी तिला उचलून घेतलं. मानुलीला अवघडल्यासारखं वाटतच होतं, पण भीतीही वाटत होती. मागं केव्हा तरी तिचे बाबा घरी आले तेव्हा ती तीन वर्षांची होती, असं म्हणतात. तिला तिच्या बाबांचा चेहरा काही आठवत नव्हता. परुली आणि कमल मात्र वडिलांच्या डाव्या-उजव्या बाजूस बसून होत्या. छोटं बाळही वडिलांच्या हातात होतं. ते सगळं पाहून मग हळूहळू तिचीही भीड चेपली.

आजीही व्हरांड्यात होती. मुलगा घरी आल्यामुळं तिला खूप आनंद झाला होता. त्यानं आणलेल्या वस्तू शेजाऱ्यांमध्ये जाऊन ती वाटत सुटली होती. त्यात मुलाबाळांसाठी मिठाई होती, तरुणांसाठी सिगारेटी नि म्हाताऱ्याकोताऱ्यांसाठी तंबाखू होती.

आजोबांचा आनंदही विचारूच नका. ते हसले की त्यांच्या तोंडाचं बोळकं खोलवर दिसायचं. आपला मुलगा सुखरूप, धडधाकट तर आहेच; शिवाय तो बढती मिळाल्यावर घरी भेटायला आला आहे, या भावनेनं त्यांची कळी खुलली होती. मानुलीला प्रश्न पडला होता, की माय का बरं इतरांसारखी बाबांचं स्वागत करायला बाहेर आली नाही? मानुली अजून खूपच लहान होती. त्यामुळे सासू-सासरे जिवंत असेस्तोवर बाईनं नवऱ्याला उघड उघड भेटायचं नसतं, ही रीत तिला कुठली ठाऊक असायला? त्यातून मायला आता चार-पाच मुलं झालेली असल्यानं तिनं स्वतःही नवऱ्यासमोर फार घुटमळून चालणार नव्हतं.

गावकरी चहाचे घोट घेत सैन्य, लडाख नि तिथल्या हिमवर्षावाबद्दल यथेच्छ गप्पा झोडत होते. मानुलीचे बाबा लडाखहूनच आले होते ना! रोज संध्याकाळी चहाच्या टपरीवर किंवा कोणाकोणाच्या घरी बसून गप्पा छाटत वेळकाढूपणा करायची मुळातच गावकऱ्यांना सवय होती. मानुलीचे बाबा घरी आल्यामुळे बाहेरच्या जगातले नवीन नवीन विषय चघळायला मिळत होते.



बायका थोडा वेळ थांबून घरी गेल्या. त्यांना अजून पाणी आणायचं होतं, भाजीचं बघायचं होतं, झालंच तर गाई-म्हशींची धार काढायची होती.

नदीवरची घटना आजोबांना सांगायची संधी एकदाची मायला सापडली. "ही पाण्यात पडल्यानंतर कोणी झपाटलं-बिपाटलं असू शकतं. माझ्या बाजूनं मी चक्की सोडायच्या आधीच तिला अंगारा लावला, पण तरीसुद्धा तुम्ही तुमच्या हातानं एकदा लावा म्हणजे झालं," माय आजोबांना सांगत होती.

"बिचारी पोर! बरं केलंस सूनबाई, मला सर्व सांगितलंस ते. चक्कीपाशी स्मशानसुद्धा आहे. तिथं लोकांना अग्नी देतात. अशा जागेच्या जवळपास लहान मुलांना भूत लागू शकतं. आजोबा म्हणाले."

"'ते काही नाही. तिच्या मायचीच चुकी आहे. एवढ्या लांब न्यायचंच कशाला एवढ्याशा पोरीला? ती बुडाली नाही हे नशीब!" बाबा रागावले.

"'अरे, तिची काहीच चूक नाहीये. मीच म्हणालो होतो, घेऊन जा सोबत म्हणून. काळजीचं काहीच कारण नाही. मानुलीला काहीसुद्धा झालेलं नाही. भूत लागू नये म्हणून मी तिला अंगारा लावीन. माझा अंगारा लावला की काहीच घोर नसतो हे तुलासुद्धा माहीतच आहे की." आजोबा बाबांची समजूत काढत होते.

आजोबांनी चुलीतली थंड झालेली चिमूटभर राख घेतली. बोटांत धरून काही मंत्र पुटपुटत तो अंगारा म्हणून मानुलीच्या कपाळी लावला. हे सर्व केल्याक्षणी ते खूप मोठ्ठ्यानं ओरडले. त्यामुळं मानुली नि सभोवतालचे सगळेच एकदम दचकले. पण आसमंतात चुकून एखादं भूतखेत असेल तर त्याला घाबरवून पळवून लावण्यासाठीच त्यांनी हा उपाय केला होता.

अंगारा लावून झाल्यावर आजोबा नि बाबा व्हरांड्यात थांबलेल्या गावकऱ्यांमध्ये पुन्हा जाऊन मिसळले. घरोघरची लेकरं आपापल्या बाबांना "जेवायला घरी चला," म्हणत बोलवायला येईस्तोवर गप्पा चाललेल्याच होत्या.

मुनली चुलीपाशी बसल्या बसल्या जागच्या जागी झोपी गेली होती. माय मात्र रात्रीचा स्वयंपाक करण्यात गढलेली होती. मायने मानुलीला अंथरुणावर नेऊन झोपवावं म्हणून उठवलं, तेव्हा ती कोल्हे, भुतंखेतं असलं काहीबाही रडत बडबडू लागली. मायने तिच्या शेजारी झोपून किती तरी वेळ तिच्या केसांमधून बोटं फिरवली तेव्हा कुठे मानाबाईला झोप लागली. दिवसभराच्या कामाच्या रगाड्यानं दमलेली मायसुद्धा मानुलीला झोपवता झोपवता स्वतःही केव्हा तरी झोपून गेली.

बाबा सैन्यातून महिन्याभराची सुटी काढून घरी आले ते दिवस जणू मानुलीला दिवाळीचे वाटले. ती येऊन-जाऊन सतत बाबांना धरून असायची. तिच्या थोरल्या बहिणी, परुली अन् कमल घराचं नि ढोरांचं बघायच्या. बाबांनी ही सगळी सुटी घरातल्या सगळ्यांसाठी गरजेच्या वस्तू खरेदी करण्यात घालवली. आजोबांनाही त्यामुळे नाही म्हटलं तरी थोडी विश्रांती मिळाली. हा फावला वेळ त्यांनी चरख्यावर लोकर कातण्यामध्ये घालवला. गेल्या वर्षीच्या हिवाळ्यात दक्षिणेकडे जाणाऱ्या गुराख्यांकडून आजोबांनी ही लोकर विकत घेतली होती.

भाताच्या शेतात बांधाचे दगड ज्या ज्या ठिकाणी निसटले होते तेही बाबांनी नीट लावले. बाबांनी छपरासाठी नवीन लाकूडही आणलं. मिस्त्र्याकडून त्यावर दगडी फरशा लावण्याचं कामही उरकून घेतलं. दिवसभर बाबा सारखे कामांमध्ये असायचे. संध्याकाळी मात्र त्यांना वेळ असायचा. त्या वेळी ते शेजाऱ्यापाजाऱ्यांकडे गप्पा मारायला जायचे. माना अर्थातच त्या वेळी त्यांच्यासोबत असायची.

एके दिवशी बाबा त्यांच्या सासुरवाडीला जायला निघाले. ते गाव तसं लांबच होतं. बाबांना परतायला आठवडा लागला. माना आपली रोज वाट बघायची. कारण बाबा लडाखला परत निघून जायची वेळही जवळ येत चालली असल्याचं मानुलीला ऐकून कळलं होतं.

परत जायच्या दिवशी बाबांनी गणवेष चढवला. माय रडत होती. तिनं रडत रडतच बाबांच्या हातावर दही नि गूळ ठेवला. आजीनं प्रवासाला निघायच्या आधी आशीर्वाद म्हणून बाबांच्या भाळी टिळा लावला. मानासुद्धा बाबांच्या पायांना विळखा घालून रडत होती. बाबा आता गेले, की तब्बल दोन वर्षांपर्यंत काही दिसायचे नाहीत हे सगळ्यांनाच माहीत होतं.

आजोबा धाकट्याला घेऊन सावलीला बसले होते. त्यांनी बायामाणसांना 'रडू नका, शांत व्हा' असं सांगितलं. ते स्वतःच्या भावनाही प्रयत्नपूर्वक आवरत होते. शेवटी बाबा भाताच्या शेतातून खालच्या बाजूला उतरू लागले, तेव्हा मात्र आजोबांच्या डोळ्यांमधलं पाणी गालांवरून वाहू लागलं.

मध्ये आणखी दोन हिवाळे नि उन्हाळे आले तसे गेले. मानुली सहा वर्षांची होत आली होती. परुली चौदा, कमल अकरा नि धाकटा तीन वर्षांचा झालेला होता. घरातल्यांची दैनंदिन कामं नित्याच्या वेगानं चालूच होती. वेळोवेळी अफवा कानी पडायच्या, की उत्तर सीमेवर युद्ध पेटलंय. सगळे कासावीस व्हायचे; पण सुटीला घराकडे परतणाऱ्या सैनिकांकडून बाबांची खुशाली कळायची. एका पावसाळी संध्याकाळी संपूर्ण कुटुंब अंगणात बसलेलं होतं नि लांबून बाबा येताना दिसले.



त्यांचं सामान वाहून आणणारे दोघं हमालही सोबत होते.

मध्यंतरीच्या काळात बाबा लांब तिबेटाच्या सीमेजवळ होते. सैनिकांना तिथं कित्येक प्रकारच्या अडचणींना तोंड द्यावं लागे; पण तेही संकटाचे दिवस आता सरले होते. बाबांना घरी आपल्या माणसांमध्ये आल्यावर खूपच छान वाटत होतं. या वेळी तर त्यांनी एक रेडिओ ट्रांझिस्टरदेखील सोबत आणला होता. त्यावर ते सीमेवरच्या नि दुसऱ्या कसल्या कसल्या बातम्या ऐकायचे. गाण्यांचे तर केवढे तरी कार्यक्रम सतत चालत असत. तिघी मुलींना सतत ट्रांझिस्टरपाशीच बसून राहावंसच वाटे. परुली हुशारच म्हणायची. थोड्या दिवसांतच ती ऐकलेली गाणी स्वतः म्हणायला लागली.

घरातच ट्रांझिस्टर असल्यामुळे आता या मुलींना दुसऱ्यांच्या घरात जाऊन रेडिओ ऐकण्याची गरजच उरली नव्हती. बाबांनी टी.व्ही.बद्दलसुद्धा माहिती सांगितली. या गावात अजून तो प्रकार पोहोचू शकलेला नव्हता. रात्री उशिरापर्यंत आजोबा नि बाबा बरंच काही बोलत राहिले. पहाटे उठून बाबा आजीला म्हणाले, "घरातल्या सर्वांच्या कल्याणासाठी मी यंदा एक ठरवलं आहे." आजोबा मात्र गुडगुडी ओढत गालातल्या गालात हसत होते. बाबांनी आजोबांना आधीच त्यांची कल्पना सांगून ठेवली होती. आता आजोबाही फक्त आजीच्याच होकाराची वाट बघत होते.

आजी जनावरांचा गोठा स्वच्छ करत होती. घरात दोन गायी नि दोन म्हशी होत्या. आजी शेण नि ओलं फडकं घेऊन बाहेरच्या खताच्या ढिगाऱ्यावर टाकायला गेली.

बाबांचं बोलणं ऐकताच आजी सरळ उभी राहिली. शेणाच्या हातांनीच पुढे आलेले केस मागे सारत तिनं बाबांना विचारलं, "परुलीच्या लग्नाचा विचार करतो आहेस की काय?" आजोबा अन् बाबा मोठ्यानं हसले म्हणून बावचळून भुवया आक्रसत तिनं विचारलं, "झालं तरी काय?"

"परुलीचं कुठे लग्नाचं वय झालंय? बघू तीन-चार वर्षांनंतर." बाबांनी उत्तर दिलं.

आजीला काही ते आवडलं नाही. ती कडाडली,"या नवीन विचारांनी तुम्ही घात करणार! माझं वय लग्नाच्या वेळी आठच वर्षांचं होतं. तुझं लगीन झालं तेव्हा तुझी बायकोही चौदाचीच होती. परुलीला यंदा चौदावं सरलंय. या महिन्यातच तिला पंधरावं लागतंय अन् तू म्हणतोस, ती अजून लहान आहे म्हणून?"

"पण तुला ठाऊक आहे नवीन कायदा झाला आहे तो? अठराच्या आत मुलीचं आता लग्न करता येत नाही." बाबा आजीची समजूत घालत होते.

"मला नको सांगूस तुझा कायदा! आपल्या शास्त्रात सांगितलंय, की पोरीचं लग्न न्हाती-धुती व्हायच्या आधीच करून टाकायला हवं, नाही तर तिच्या वडिलांना पुढल्या जन्मात भोग भोगावे लागतात. पण आता माझं मेलीचं ऐकतंय कोण?" आजी

खिन्न होऊन सांगत होती.

बाबांना तो वाद तिथंच थांबवायचा होता, म्हणून ते मध्येच म्हणाले, "हो ग माय, तू बरोबर बोलतेस. मी आता पारूच्या लग्नाचा विचार लवकरात लवकर करीन. पण आता मला तुझ्याशी बोलायचंय ते वेगळंच आहे. मानाला शाळेत धाडायचा विचार करतोय मी. परुली अन् कमल दोघींना काही आपण शिकवू शकलो नाही; पण त्या आता मोठ्याही झाल्या आहेत. मानाचं वय मात्र शाळेत जाण्याचं आहे... आणि हरकत तरी काय? आपल्या गावातल्या किती तरी मुलींना आता त्यांचे आईवडील शाळेत घालायला लागलेच आहेत. शहरात तर मुली कॉलेजसुद्धा शिकतात.'

आजीच्या तोंडचं पाणी पळालं. "शिकून काय करतील या पोरी? कोयता घेऊन शेतात जाणं, निंदणी, कापणी करणं, रानातनं सरपण अन् चारा आणणं ही त्यांची सगळी कामं बंद करायचीत की काय? यातलं काहीच त्यांनी केलं नाही तर त्यांच्याशी लग्न तरी कोण लावणार? मग त्या काय स्वतःचं पोट स्वतःच भरतील होय?"

"असंच असतंय ग माँ. आता डोंगरात राहणाऱ्या बायकासुद्धा ऑफिसात, शाळेत, दवाखान्यात सर्वदूर काम करतात. अग, सरकार चालवणाऱ्यांमध्येसुद्धा हल्ली बायका असतात." बाबा थोडे नाराजीनं सांगत होते. "अगदी घरी जरी राहायचं असलं तरी पोरी शिकलेल्या बऱ्या आणि शिकल्यासवरल्या म्हणून काय त्यांची सर्व कामंधामं एकदम सुटतात थोडीच? परुलीची आईसुद्धा लग्नाआधी तिसरी-चौथीपर्यंत शाळा शिकलीच होती ना? आपल्याकडे आल्यावर कामाच्या डोंगराखाली दबून ती शिकलेलं सर्व विसरूनही गेलीय. मी तर म्हणतो; की परुली, कमल आणि त्यांची आई या तिघींनाही रात्रीच्या शाळेत घालायला हवं. सध्याच्या काळात पावलोपावली शिक्षण लागतंय. आधीच आपला भाग हा एवढा मागासलेला. त्यातून आपलं गावही आडबाजूला. रस्त्यापेक्षा किती तरी मैल अलीकडे. असं नसतं तर आपल्या गावातल्याही मुलांइतक्याच मुलीही शाळेत जाताना दिसल्या असता."

आजोबांनीही बाबांचीच री ओढीत म्हटलं, "काळाप्रमाणे बदलावंच लागतं. आपल्या वेळेसारखं आता राहिलेलं नाही बाई! नवीन पिढी आहे ही. त्यांना त्यांच्या पद्धतीनेच वागू दिलं तर ते सुखात राहतील."

"ठीक आहे. तुम्हीसुद्धा तेच सांगताय म्हणजे बरोबरच असेल." आजी म्हणाली खरी; पण तिला मनातल्या मनात डाचतच राहिलं.

दुसऱ्या दिवशी बाबांनी एका लाकडी फळीतून एक छोटा तुकडा कापून काढला. त्याला काळा रंग दिला. ही मानुलीची पाटी होती. पांढरी माती पाण्यात कालवून बाबांनी ती एका डबीत ठेवली. बोरूला टोक केलं. आता पाटीवर अक्षरं रेखाटायचा सर्व सरंजाम तयार झालेला होता. मानुलीनं नवे कपडे घातले. सगळ्यांनी तिला जवळ



घेतलं. तिच्या कपाळावर टिळा लावला आणि मानुली बाबांबरोबर शाळेच्या नवीन विश्वाकडे रवाना झाली.

शाळा दीड किलोमीटर लांब अंतरावर होती. पंचायतीत सगळ्यात जास्त लोकसंख्या असलेल्या गावात शाळा होती. याच गावाच्या नावानं पंचायत ओळखली जायची. मानुलीच्या गावासारख्या आणखी दोन-तीन गावांची मिळून ही पंचायत होती. शाळा, आरोग्यकेंद्रांसारख्या सोयी प्रत्येक गावात उपलब्ध होणं दुरापास्तच होतं. बिकट पायवाटेवर एक किलोमीटरभर गेलं, की एक ओढा लागायचा. त्यातलं पाणी डोंगरावरून वाहत आल्यानं आधीच वेगात असायचं. त्यात पावसाच्या दिवसांत तर जिवाला धोकाच होऊन बसायचा. या ओढ्याच्या अडथळ्यामुळेच मानुलीच्या गावातली मुलं गेल्या वर्षापर्यंत शिक्षणापासून वंचित राहिली. बाबा मानुलीला सांगत होते, "या ओढ्यामुळेच परुली अन् कमल शाळेला येऊ शकल्या नाहीत." मानुली मनातल्या मनात म्हणाली, "बाबा, मी खरंच भाग्याची. माझ्या शिकायच्या वेळेला या ओढ्यावर पूल बांधला गेला हे किती बरं झालं!"

तिच्या गावातली अजून आठ-दहा मुलं झुंडीनं त्यांच्या मागं-पुढं चालत होती. मात्र ते सर्वजण मुलगेच होते. त्यात मुलगी फक्त मानुलीच.

मानुली बाबांसोबत शाळेच्या आवारात पोहोचली तेव्हा मैदानात निरनिराळे खेळ चाललेले होते. सगळी मुलं आनंदात होती. फक्त एकच काय तो रडत होता. कारण दुसऱ्या मुलानं त्याच्या थोबाडीत मारली होती. तेवढ्यात गुरुजी तिथं आले. सर्व मुलांनी त्यांना हात जोडून 'नमस्कार' म्हटलं.

"नमस्ते गुरुजी" असं बाबाही आदराने मस्तक झुकवत म्हणाले. बाबांनी मानुलीलाही नमस्कार करायला सांगितलं. तिनं हात जोडले खरे, पण तिला काय बोलावं हेच कळेना. गुरुजी मनमिळाऊ होते. त्यांनी प्रत्युत्तर देत म्हटलं, "या, बसा. तुमच्या लेकीला आमच्या शाळेत शिकायला आणलं, हे तुम्ही फारच छान केलंत."

"आभारी आहे." बाबा म्हणाले, "तिला खरं तर ही शाळा खूप लांब पडणार आहे. आम्ही डोंगराच्या त्या बाजूला दरीत राहतो. तुम्ही जर सुरुवातीला तिच्याकडे थोडं जास्त लक्ष दिलंत तर ती दररोज शाळेत येऊ शकेल. अजून ती सात वर्षांची आहे."

गुरुजी म्हणाले, "तुम्ही काळजी करू नका. हिच्याएवढीच माझीही मुलगी शाळेत येणार आहे. मी या दोघींची ओळख करून देईन. त्या एकमेकींसोबतच बसतील. नाही म्हटलं तरी आमच्या शाळेत मुलींची संख्या म्हणावी तशी नाही. इकडच्या लोकांची अजूनही मुलींना गुरं चारायला पाठवायची सवय काही जात नाही. इथून दहा किलोमीटर पुढं गेलात, की दक्षिणेकडं मुलींचं शाळेत जायचं प्रमाण वाढलं आहे."

"तुमचं बरोबर आहे; पण शेती नि गोठ्याभोवती आयुष्य असणाऱ्या कुटुंबांमध्ये कामं संपवायला अडचण आली की, चटकन मुलींच्याच शिक्षणावर गदा येते. माझ्या मुलीच्या बाबतीतही काय घडतंय ते आता बघायचं." बाबा सांगत होते.

तेवढ्यात घंटा वाजली नि मुलं आपापली पाटी-दप्तरं सांभाळत वर्गात पळाली. त्यांच्यात धक्काबुक्की चालली होती, गिल्ला चालला होता. मानुलीला उद्यापासून या मुलांसोबतत राहावं लागेल याची जरा भीतीच वाटली. मुलं आपापल्या जागेवर जाऊन बसायला वेळच लागला. ती रांगेत बसली होती. लहान मुलं पुढं. एक मदतनीस गुरुजी हातात छडी घेऊन अवतरले. त्यांनी गर्जना केली, "शांत व्हा!" मग मुलांनी प्रार्थना म्हटली. बाबा, मुख्याध्यापक आणि मानुलीनंही प्रार्थनेत भाग घेतला. त्यानंतर हजेरी झाली. हजेरीबुकात आणखी एक नाव वाढलं, "मानवती".

इयत्तेनुसार मुलं तीन वर्गांमध्ये बसली होती. बसायला सतरंज्या असल्या तरी त्या सर्वांना पुरत नव्हत्या. मानुलीलाही सतरंजीचा कोपरा बसायला मिळाला, पण तो अपुराच होता. त्यामुळे नवीन कपडे खराब होतील अशी तिला काळजी वाटायला लागली.

गुरुजींनी तिच्यापाशी येऊन तिच्या पाटीवर काही अक्षरं काढली आणि तिला तस्संच्या तस्सं बघून लिहायला सांगितलं. मानुलीला शाळेत मिळालेला हा पहिला धडा होता.

मुख्याध्यापक बाहेर मोठ्या व्हरांड्यात बसून तिन्ही वर्गांवर लक्ष ठेवून होते. बाबाही त्यांच्याजवळच बसलेले होते. बाबांनी विचारलं, "किती मुलं आहेत तुमच्या शाळेत?"

"पटावर १२५ विद्यार्थी असले तरी रोज ११५ च्या जवळपास मुलं येतात. आम्ही दोघंच शिक्षक. एक शिक्षिकाही लवकरच येतील. थोड्या दिवसांपूर्वी त्या बाईंचा भाऊ गावात येऊन, त्या ज्यांच्याकडे राहणार आहेत त्यांच्याशी बोलून गेला. भावाची परवानगी मिळाली तर येत्या पंधरवड्याभरात त्या शिकवायला सुरुवात करतील."

बाबांनी दुजोरा देत म्हटलं, "शिकलेल्या मुली कामावर जातात त्या वेळी त्यांच्या घरच्यांनी त्यांची सर्व प्रकारची काळजी घेतलेलीच बरी."

शाळा संपल्यावर मानुली बाबांसोबत घरी परत आली. ती तिची पाटी, दौत अन् दप्तर मोठ्या रुबाबात घेऊन चालत होती. पाटीवरचा काळा रंग तिच्या कपड्यांनाही लागला होता. तिनं बाबांना विचारलं, "मी उद्या पण शाळेला जायचं?"

"हो तर!" बाबा म्हणाले, "रविवारची सुटी सोडली तर रोज शाळा असते."

"पण मी घरी नसले तर आजोबांसाठी झऱ्यावरून पाणी कोण आणणार? भोरी



(म्हशीची बछडी)साठी गवत कोण आणणार? तिला अंघोळ कोण घालणार? आणि धाकट्याकडे लक्ष द्यायला आजोबांना कोण मदत करणार?' मानुलीनं एकामागोमाग एक प्रश्न विचारले.

तिच्या प्रश्नांमुळे घरातल्या कामांच्या जबाबदारीची तिला जाणीव आहे हे बाबांच्या लक्षात येऊन त्यांना बरं वाटलं. ते तिचे प्रश्न सोडवत म्हणाले, "यापैकी काही कामं तू शाळेला जायच्या आधी आणि उरलेली परतल्यावर करत जा. चालेल?"

बाबा व मानुली घरी पोहोचले तर त्यांना अंगणात अंथरलेल्या कांबळ्यावर एक नवीन माणूस बसलेला दिसला. आजोबा त्याच्याशी बोलत होते. त्याच्याजवळ लाकडापासून विशेष पद्धतीनं तयार केलेलं दह्याचं भांडं होतं. हातानं विणलेल्या शिंकाळ्यात ते ठेवलेलं होतं. त्यावर ताजी पालकाची पानं ठेवलेली होती. लग्नाची बोलणी करायला जाताना हे सर्व घेऊन जायचा या भागात प्रघात आहे. तो माणूसही अशाच प्रथा पाळणाऱ्या एखाद्या गावातून आलेला असावा.

बाबांनी त्याला हात जोडून नमस्कार केला. मानुली अनोळखी चेहरा बघून लाजली अन् बाबांच्या मागं जाऊन लपली. तिथूनच ती कान देऊन सर्व ऐकू लागली.

तो माणूस बाबांना म्हणाला, "माझ्याकडे दोन एकर जमीन आहे. तिच्यात मी भात अन् गव्हाचं पीक घेतो. आणखीसुद्धा जमीन मी विकत घेतली आहे. तिथं मी आडू, खूबानी अन् संत्र्याची झाडं लावली आहेत. आमच्या घरी तीन गायी, दोन म्हशी, दोन बैल नि काही शेळ्या आहेत. रान गावालगतच असल्यानं बायकांना सरपण आणि चाऱ्यासाठी फार लांब जावं लागत नाही. पाणी तर घराजवळ नळातूनच येतं. माझ्या थोरल्या मुलाचं लग्न झालेलं आहे. गेल्या वर्षीच माझी बायको मेली. तेव्हापासून एकट्या सूनबाईवरच सगळं काम पडतं. म्हणून माझ्या धाकट्या पोराचं लग्न मला लवकरात लवकर करायचं आहे. घरचं काम मन लावून करणारी मुलगी सून म्हणून मला पाहिजे आहे. तुमची मुलगी खूप कामसू नि गुणाची आहे असं कोणाकडून तरी ऐकलं म्हणून लगोलग तुमच्याशी बोलणी करायला आलो. तुम्हाला पसंत आहे का? बोला!"

आजोबा हे सर्व ऐकून आनंदलेच होते. त्या माणसानं चांगले कपडे घातलेले होते. बंद गळ्याचा लोकरीचा कोट त्याच्या अंगावर होता. डोक्यावर सुती टोपी होती. पायांत कॅनव्हासचे बूट होते. कपडे नवीन नसले तरी स्वच्छ होते, उंची होते. त्याच्याकडे बघून त्याच्या खाऊन-पिऊन सुखी अवस्थेचा अंदाज बांधता येत होता.

तो माणूस म्हणाला, "हवं तर आपण आज रात्री पुन्हा यावर चर्चा करू. तोवर मी शेजारच्या गावात जाऊन माझ्या एका मित्राला भेटून येतो. त्यानंच तर मला

तुमच्याबद्दलची सर्व माहिती दिली होती.''

आजी, माय, परुली आणि कमल दिवसभराच्या रामरगाड्यानं दमून उशिरा घरी परतल्या. त्या सर्वजणी दमलेल्या होत्या. घरी पोहोचल्यावर चुलीवर किटली ठेवलेली असली तर बरं. दोन घोट गरम गरम चहा तरी घशात ओतता येईल, अशी मनोराज्यं करीत या चौघी घरी पोहोचून डोक्यावरले भारे उतरवून जमिनीवर ठेवत नाहीत तोच मानुली धावत येऊन म्हणाली, ''आजी आजी, एक माणूस खूप लांबच्या गावाहून आलाय.''

''कोण आलंय?'' आजीने दमलेल्या आवाजात विचारलं.

''त्याने दही अन् ताज्या पालकाची भाजी आणलीय. मिठाईचा डबासुद्धा!'' मानुली मोठ्याच उत्साहाने सांगत होती.

आजीचा थकवा अगदी कुठल्या कुठे पळाला. तिनं घाईघाईने विचारलं, ''कुठे आहे तो?''

''तो गेलाय, पण रात्री परत येणार आहे. बाबांनी त्याच्यासाठी चहा केला. त्याला गुडगुडीसुद्धा ओढायला दिली... आणि हो ते दोघे परुलीच्या लग्नाचं बोलत होते.'' बोलता बोलता मानुली मध्येच थांबली. अनोळखी माणूस मिठाई घेऊन आला इथपर्यंत सारं आलबेल होतं; पण लग्नानंतर परुली दुसऱ्याच्या घरी जाणार त्याचं काय? मानुलीचा चेहरा उतरला.

आजीच्या चेहऱ्यावर मात्र तकाकी आली. तिनं मायला हाक मारली. तिच्या डोक्यात विचारांची नुसती गर्दीच उसळली होती. ''पाहुण्याला जेवायला काय करावं याचा विचार करायला हवा. खीर, शिरा, पुरी, दोन भाज्या नि दही हा बेत कसा वाटतो? पहिल्यांदाच आपल्या घरात मुलीला मागणी घालायला कोणी आलंय.''

माय म्हणाली, ''अगदी बरोबर आहे तुम्ही म्हणताय ते. आपण सर्व प्रयत्न करायला हवेत. मी बागेतनं ताजा पावटा, मुळा, वांगी अन् बटाटे घेऊन येते. परुली तोवर दूध काढून आणील.''

''परमेश्वरा, तुझी कृपा रे बाप्पा. घरात दूध, दही, साखर, कणीक, तांदूळ सर्व काही हवं तेवढं आहे ते!'' आजी पुटपुटत होती.

पाहुणा परतल्यावर तो, आजोबा आणि बाबा एका बंद खोलीत जाऊन बोलत बसले. परुलीनं समोर येऊन चालणार नव्हतं. त्यामुळे आजोबांनीही नेहमीसारखं तिला चहा घेऊन बोलावलं नाही. परुलीला मोठमोठ्यानं हसायलाही परवानगी नव्हती. कमल तिची थट्टा करत होती, ''पारू, तुझा सासरा तिकडे बसलाय बघ!'' परुलीला लाजल्यासारखं होत असलं तरी ती कुठली गप्प राहणार? तिनं लगेच प्रत्युत्तर दिलं, ''गप बस, गधडे! आधीच मला इतका राग येतो आहे! त्यामुळे कोणाशीही बोलायची किंवा हसायची सोयच नाही. हा पाहुणा आता जेवढ्या लवकर टळेल तेवढं बरं!''



आजी हे सर्व ऐकून संतापलीच. ओरडली,''गप बसा गुमान! आपलं नशीब मोठं म्हणून ते आज आपल्या घरी अशा कारणासाठी आले. त्यांचा मान राखायला पाहिजे.''

''मुलींना या गोष्टी समजत नाहीत सासूबाई. त्यांना कुठं माहितीये, की मुलींच्या लग्नामुळे आई-बाप, आजी-आजोबा या सगळ्यांना पुण्य मिळतं, त्यांची पापं धुऊन निघतात. पोरीच्या बापानं शालीन असायला हवं. जावयाची सेवा करायला हवी.'' माय चुलीच्या धुरातून चेहरा बाहेर काढत म्हणत होती.

आजीनं शेकोटीत निखारे घातले. खोलीत ऊब असायला हवी होती. तिनं फरशीवर तीन पाट मांडले. त्यावर बसून आता आजोबा, बाबा आणि तो अनोळखी माणूस भोजन करणार. घरातले चांगल्यात चांगले कप, पेले आणि ताटं या पाटांसमोर ठेवले. आज सगळीच भांडी लखलखत होती. आता भोजनासाठी पाहुण्यांना बोलवायचं होतं. परुली घरामागच्या व्हरांड्यात जाऊन बसली.

स्वयंपाकघरासमोर कमल ऊन ऊन पाणी घेऊन तयार होती. सर्वांच्या हाता-पायांवर ऊन पाणी ओतल्यावर तिनं त्यांच्या पेल्यांमध्ये गार पाणी ओतलं. आजी वाढण्यात दंग होती. कमलच्या लक्षात एक गोष्ट आली ती अशी, की पाहुण्याचं एकटक तिच्याकडे लक्ष होतं. मायच्याही ते लक्षात आलं होतं आणि तिला वाटलं, कमलकडे बघून परुलीही सुंदर आहे, की काय याचाच अंदाज तो पाहुणा घेत असणार.

पाहुण्याला स्वयंपाक आवडलेला दिसत होता. तो म्हणाला, ''तुमच्याकडलं दही आणि तूप आमच्यापेक्षा चवदार आहे. तुमच्याकडे मसालेसुद्धा चांगले दिसताहेत अन् तुमच्या शेतातही वेगवेगळ्या भाज्या आहेत.''

जेवून झाल्यावर ते तिघंही पुन्हा त्या बंद खोलीत जाऊन बसले. आजीनं त्यांना शेकोटी नेऊन दिली. त्यानंतर तीही त्यांच्या चर्चेत सामील झाली. इकडे या सगळ्याजणी जेवल्या नि धाकटा झोपला तेव्हा ताट-वाट्या, इतर भांडी घासायला त्या परसदारी गेल्या. मायनं पाणी गरम करून आणलं होतं. खूपच अंधार होता म्हणून त्यांनी एक छोटीशी मशालही पेटवली होती. त्या उजेडात भांडी घासून मानुलीसोबत माय, परुली, कमल सर्वजणी खोलीत येऊन चटईवर बसल्या.

मानुली आणि कमलही आजीजवळ जाऊन बसल्यावर परुलीनं धाडस करून मायला विचारलं, ''तू मला खरंच एवढ्या लांब पाठवशील माय?'' हा प्रश्न परुलीच्या मनात एकसारखा खदखदत होता.

मायनं उत्तर दिलं, ''याचा निर्णय आम्ही घेऊ शकत नाही पारू. मुलीच्या जातीला जन्माला येतानाच ते ललाटी लिहिलेलं असतं. तसे तुझे बाबा लग्नानंतर लगेच

एक-दोन वर्षांपर्यंत तरी तुला पाठवणार नाहीत सासरी. त्यांचं असं म्हणणं आहे, की लवकर लग्न केल्यामुळे मुलीच्या तब्येतीवर परिणाम होतो अन् लहान वयात सासरी मुलीवर कामाचा वाजवीपेक्षा जास्त बोजाही पडतो. कारण सासरची माणसं तिच्याकडून डोंगराएवढ्या कामांची अपेक्षा करतात. मला विचारशील, तर मी तुला इथंच ठेवायचा आग्रह धरीन; पण फक्त आपलाच फायदा बघून तरी कसं चालेल? तुझ्याही भवितव्याचा प्रश्न आहे हा, नाही का?''

आजीनं कमल आणि मानुलीला राजकन्येची गोष्ट सांगायला सुरुवात केली. मानुली मात्र बरीच दमली होती. तिच्या आयुष्यात आज सबंध दिवसभरात किती तरी नवनवीन घडामोडी घडल्या होत्या. शेवटी तिला गाढ झोपेनं फसवलंच. आजीनं तिचं डोकं मांडीवर ठेवलं.

''आजी, तू गोष्ट थांबवू नकोस.'' कमल म्हणत होती. ''त्या जादुगारणीच्या कैदेतून सुटल्यावर शेवटी राजकन्येचं काय झालं?''

''तिला कैदेतून सोडवणाऱ्या त्या देखण्या राजपुत्राबरोबर तिचं लग्न लागलं. मग ते सुखानं नांदू लागले. परमेश्वर तुलाही त्या राजकन्येसारखंच सुखी ठेवो!'' आजी गोष्ट संपवून उठता उठता म्हणाली.

''मी लग्नच करणार नाही! राजपुत्राशीही नाही!'' मानुली अर्धवट झोपेतच बडबडली आणि पुन्हा झोपी गेली.

त्या रात्री महत्त्वाचा निर्णय झाला तो असा, की वर्षभरातच पारूचं लग्न पार पाडावं. त्याआधी बाबांना तो मुलगा एकदा स्वतः बघायचा होता. तो अल्मोडा शहरातल्या कॉलेजात शिकत होता, म्हणून बाबांनी नोकरीवर रुजू होण्यासाठी अल्मोडामार्गे जायचा विचार केला.

मानुलीला शाळेत जायला लागून दोन वर्षं होत आली होती. अभ्यासात ती खूपच हुशार होती. ती सर्वांच्या पुढे असायची म्हणून दोनच वर्षांत तिला चौथीच्या वर्गात बसायची परवानगी मिळाली. आता तिचं वय नऊ झालं होतं. सध्या शाळेला हिवाळ्याची सुटी लागली होती. हिम पडणारसं लक्षण दिसत होतं. प्रचंड वाऱ्यामुळे झाडं गदागदा हलत होती. पाऊस कोसळायच्या आधी माय आणि आजीनं गवताच्या गंजीतून मोठमोठाले भारे उचलून आणून गोठ्याच्या रिकाम्या भागात रचले. गायींना कोरडा चाराही मिळावा अन् ऊबही मिळावी अशी दुहेरी योजना त्यामागे होती. परुली व कमलने स्वयंपाकघरात सरपणाचा ढीग रचला होता; नाही तर पावसानं सगळंच सरपण पार भिजलं असतं. आजोबांची तब्येत बरी नव्हती. ते जेव्हा जेव्हा म्हणून डोंगरावर औषधी वनस्पती, मुळ्या वगैरे घ्यायला जात असत; त्या त्या वेळी त्यांना पायांत खूप अशक्तपणा जाणवायचा. त्यांना आता त्रास द्यायचा नाही म्हणून आजीनं बाजारातून मीठ अन् साखर मागवायला शेजारच्या कोणाची तरी मदत घेतली.



या मोसमातला पहिला पाऊस पडत होता. सगळेजण शेकोटीभोवती बसले होते. खोलीत धूर भरून राहिला होता, पण तो सगळ्यांच्या सवयीचा होता. मुलं काळ्या सोयाबीनचे भाजलेले दाणे, गूळ, शेंगदाणे खात होती. मोठी माणसं चहा पीत होती. अधूनमधून माय गाई-म्हशींकडे जाऊन बघून येत होती. तिनं गोठ्याची बाहेरची दारं बंद करून आतली वरून खाली येणाऱ्या वाटेवरची दारं उघडली होती. गायींना ऊब मिळावी म्हणूनच ही काळजी होती. दोनदा परुली अन् मायनं गायींसाठी पाणी आणलं. हवाई चप्पलमधली जवळपास उघडीच म्हणावी अशी त्या मायलेकींची पावलं गारठून पार निळसर झाली होती. धाकट्याची काळजी घेत मानुली बसली होती. आजी-आजोबांचा संवाद तिच्या कानावर पडला. आजोबांना कोणतीच व्याधी नव्हती. मात्र ते दिवसेंदिवस थकत चालले होते. त्यामुळे आजीच्या जिवाला घोर लागला होता.

''मला आता आणखी जगायची इच्छा नाहीये.'' आजोबा सांगत होते, ''उद्यापासून सूर्य उत्तरेकडे जाऊ लागणार म्हणजे उत्तरायण होणार. या सुमारास मरणारा भाग्यवानच म्हणायचा. त्याला पुनर्जन्मही प्राप्त होतो.''

''असलं काही तरी बोलू नका.'' आजी त्यांना मध्येच थांबवीत म्हणाली, ''अजून तर तुम्हाला परुलीच्या लग्नाची तयारी करायची आहे. वेळ थोडा आहे आणि मुलगा घरी यायच्या आधी लग्नाची सर्व तयारी पूर्ण व्हायला हवी. एवढंच नाही, तर या संबंध दरीत झाडपाल्याचं औषध कळणारे तुम्ही एकटेच आहात.''

''तू म्हणतेस ते बरोबर आहे.'' मोठा श्वास घेत आजोबा म्हणाले, ''परुलीच्या लग्नापर्यंत तर मला जगायलाच हवं. इतर कामांचं मात्र सांगू नकोस. माणूस गेला तरी त्याच्यावाचून काही कोणाचं अडत नाही.''

आजीनं विषय बदलला. ''परुलीच्या लग्नासाठी हुंडा, दागदागिने या सगळ्याची व्यवस्था झालीय हे एक बरं झालं. भटजीबुवांनी जन्मपत्रिकाही ताडून पाहिल्या आहेत. आता पारू चांगल्या घरी पडणार.''

मानुलीला आजीचं फारच आश्चर्य वाटत होतं. परुलीला एखाद्या संपूर्णपणे अनोळखी कुटुंबात पाठवण्यात कसला तो आनंद? तिला उमगत नव्हतं; पण आजीला अजून बरंच काही सांगायचं होतं.

''परुली साधी-सरळ आहे. कष्टाळूही आहे. तिला कोणत्याही घरात काहीच अडचण येणार नाही. मला चिंता वाटतेय ती मानुलीची. प्रत्येक गोष्टीत तिचं स्वतःचं काही तरी असतं. मुलीच्या जातीला असं योग्य नाही. तिला शाळेत घातलं हे चुकलंच आपलं. शाळेमुळे तर तिला जणू शिंगंच फुटली आहेत! तिच्यासाठी नवरा मुलगा

शोधायला खूप अडचणी येणार, तुम्हाला सांगून ठेवते!'' आजी बोलतच होती.

मानुलीला हे सर्व फार वेळपर्यंत ऐकणं असह्य होणार हे अटळ होतं. म्हणून ती उठून खिडकीपाशी जाऊन उभी राहिली. तिथून तिने हाक मारली, ''आजी, हिम पडतंय ग!''

खिडकीशी येऊन आजीनं हिमाच्या स्वागतासाठी हात जोडले. ''हे हिम म्हणजे पीक आणि प्राण्यांसाठी देवानं पाठवलेलं वरदान असतं.'' आजी म्हणाली.

मानुलीनं लगेच विचारलं, ''तू म्हणतेस की हिम ही देवाची देणगी आहे; पण आमच्या शाळेच्या पुस्तकात तर वेगळंच लिहिलेलं आहे.''

''पुस्तकात दगडधोंडे असतात!'' आजी भलत्याच आत्मविश्वासानं सांगत होती. 'मी आता काही औषधी वनस्पती घेऊन गावात जाते. तिथं एका म्हाताऱ्या बाईला बरं वाटत नाहीय. तिला मदत करायला हवी. तुला यायचंय का माझ्यासोबत?''

''हो तर!'' मानुलीला आवडलंच. ''आपण भाकरी आणि तूपही घेऊन जायला हवंय. कारण त्या बापडीच्या शिकल्यासवरल्या सुनेनं तिचे अगदी हाल हाल चालवले आहेत. तिला पोटभर जेवायलाही देत नाही ती.'' आजी शिकलेल्या मुलींवर संधी मिळेल तिथं टीकास्त्र चालवून घ्यायची.

मानुली गप्पच राहिली. दोघी हिमातून निघाल्या. आजीनं आज हवाई चपला घातल्या होत्या. एरवी ती अनवाणीच असायची. मानुलीनं मात्र बूट घातले होते. त्या परतल्या तेव्हा चंद्र माथ्यावर आलेला होता. कमल बाहेर हिमात खेळत होती. मानुलीही हिमाचा पुतळा उभारायला तिला हातभार लावत होती. धाकटा भाऊही जराशाने बाहेर आला. तोही याच कामाला लागला. मानुलीनं गमतीनं हिमाचा गोळा त्याला फेकून मारला, तो त्याच्या नाकावर आपटला. मग काय! त्याचा आरडाओरडा सुरू. मायनं ते ऐकलं आणि मुलींवर ओरडून त्याला ती आत घेऊन गेली.

मुली जरा वेळ गप्प झाल्या, पण पुन्हा हिमात खेळू लागल्या. एवढ्या खेळल्या की, थोड्या वेळानंतर त्यांचे हातपाय गारठायला लागले. मग त्या शेकोटीपाशी धावल्या... हातापायांची बोटं एव्हाना ठणकायला लागली होती. न राहवून डोळ्यांतनं पाणी यायला लागलं. मायला अजिबात कळवळा वाटला नाही. आजी तेवढी त्यांना 'उगी' करत होती. ती रात्र मात्र खरोखरच चंदेरी होती.

पहाटे मानुली उठली तेव्हा माय एका मोठ्या पितळी पातेल्यात पाणी तापवताना दिसली. ती आणि आजी दोघींची अंघोळ कधीच झाली होती. आता मुलींच्या अंघोळीची तयारी चालली होती. खोली थंड असली तरी दुलईत दडल्यामुळे मानाला ऊब जाणवत होती. खिडकीतून बाहेर पाहिलं तर हिमात न्हालेली झाडं इतकी मजेशीर वाटली की सांगता सोय नाही.



आजोबा खोकत होते. आजीनं त्यांना अंघोळीसाठी मदत केली. पवित्र माघ महिन्यातला आज पहिला दिवस. आजपासून सूर्य पुन्हा मकर वृत्तावरून उत्तरेकडे जाणार. म्हणून या संक्रांतीचं नाव मकर संक्रांत असं झालं. आजच्या स्नानाला धार्मिक महत्त्व होतं. किती तरी लोक नद्यांच्या पवित्र संगमांच्या ठिकाणी स्नानाला जातात. मानुलीच्या शेजारचेही बागेश्वरला शरयू-गोमतीच्या संगमावर स्नानाला गेले होते.





"मानुली, ऊठ आता." माय हाक मारत होती. "आवर चटदिशी. तुझ्यानंतर धाकट्यालाही अंघोळ करायचीय." मायनं एक भली थोरली पितळी घरात विस्तवापाशी ठेवली होती. पाणी कढतच होतं, पण मानुलीला मात्र पाठीमागच्या दारातून येणाऱ्या गार वाऱ्याच्या झोतामुळे थंडी वाजत होती. मायनं तिचे कपडे विस्तवापाशी गरम होण्यासाठी ठेवले होते. तिच्यानंतर धाकट्याची अंघोळ झाली, पण कमल आणि परुलीला मात्र गोठ्यातच अंघोळ उरकावी लागली.

मायनं शेणामातीनं घर सारवलं. मानू फुलं वेचून घरी आली. ती फुलं ओलसर तांदळासह उंबऱ्याला अर्पण केली. आजीनं सगळ्यांना टिळा लावल्यावर आजोबा सोडून सगळ्यांनी तिला वाकून नमस्कार केला. मानुली खिडकीत बसून शेतं न्याहाळत होती. बर्फामुळे शेतं अगदी ढवळ्या रंगाच्या पायऱ्यांसारखी वाटत होती. झाडंही छत्र्यांची रांग धरल्यासारखी वाटत होती. एक रंगीत पाखरू दिसल्या क्षणी मानाला आजीच्या गोष्टी आठवू लागल्या. त्यापैकी एका गोष्टीतल्या राजकन्येचं राज्य होतं हिमालय पर्वतात.

मायनं बरंच काय काय गोडधोड केलं. सगळ्यांनी त्याचा आस्वाद घेतला. त्यानंतर स्वतःच्या शेतात पिकवलेल्या गव्हाच्या पिठात साखरेचा पाक घालून सगळेजण 'घुघुले' करण्यात रमले. मुलांना यात मज्जाच मज्जा वाटायची; पण माय आणि आजी मात्र ते करण्याआधी सर्व मुलांचे हात नीट स्वच्छ धुतले आहेत की नाहीत ते काळजीपूर्वक बघत असत. धाकट्यानं त्या पिठाची तलवार केली.



कोणीतरी डाळिंबाचं फूल आणि आणखीन कोणी तरी चक्र बनवलं. मानुलीला मात्र या सगळ्यांपेक्षा वेगळं काही तरी तयार करायचं होतं. म्हणजे खरं तर पुस्तक; पण ते कसं तयार करायचं ते मात्र काही केल्या उमगत नव्हतं. तिकडे आजी नि माय तर 'लवकर आवरा, लवकर आवरा'चा धोशा धरून होत्या.

संध्याकाळी आजीनं घुघुले तुपात तळले. आधी कावळ्यांना बोलावून खाऊ घातल्याशिवाय कोणी त्याचा घास घ्यायचा नाही, अशी रीत होती.

दुसऱ्या दिवशी सकाळी जरा जास्तच थंडी वाजत होती, कारण आधीच हिमावर्षाव, धुकं दाटलं होतं. जरा फटफटल्यापासूनच चहुबाजूंनी मुलांच्या हाका घुमत होत्या, 'काळ्या कावळ्या, काळ्या कावळ्या...' मानुली जागी असली तरी दुलईतनं बाहेर यावंसं वाटत नव्हतं. या हाका ऐकताच तिनं क्षणात दुलई भिरकावली नि उडी घेत ती चूळ भरायला धावली. मायनं वेगवेगळ्या भांड्यांमध्ये मानुली, कमल आणि धाकट्यासाठी घुघुले भरून ठेवले होते. ते त्यांना कावळ्यांना द्यायचे होते. बूट पायांत चढवून आपापलं भांडं घेऊन तिघंही अंगणातल्या भिंतीवर चढून उभी राहिली अन् सामूहिकपणे हाकारू लागली, "काळ्या कावळ्या, काळ्या कावळ्या, ही घे पुरी. ही घे कावळ्या, घुघुली." बुटांतूनही थंडी आत शिरत असल्यानं पाय गारठत होते, तरी मुलांना या सगळ्या कार्यक्रमाची मोठी मौज वाटत होती. गावात चार-दोनच कावळे वस्तीला होते. ते उडत उडत येत, घुघुले उचलून गवताच्या गंजीत दडवून ठेवत. पुन्हा दुसऱ्या घरी जाऊन तेच करत. मुलं हे सगळं बघत उभी होती. शेवटी एकदाचा एक कावळा मानुलीच्या घरीही आला. त्यानं दोन-तीन फेऱ्या मारून सगळे घुघुले नि पुऱ्या उचलून नेल्या. 'बाप रे! केवढी थंडी?' म्हणत म्हणत मुलं घरात शिरली. न्याहारीत त्यांनी घुघुल्यांचा समाचार घेतला.

आज मायला बरं नव्हतं. बहुतेक पडसं झालं होतं. पण रोजचं काम संपवल्यावाचून गत्यंतरही नव्हतं. दुपारी तिच्या लक्षात आलं, की घरात तांदूळ अजिबात शिल्लक नाहीत. तिला वाटलं की आजी म्हणेल, "काय ही सून! तिला घरातली कुठली वस्तू संपलीय नि कुठली शिल्लक आहे एवढंही लक्षात येऊ नये?" पण करणार काय? बाहेर भात वाळवायला ऊन नव्हतं म्हणून मायनं चुलीच्या वर ठेवलेलं घमेलं काढलं. ते मुळी याच कामासाठी असतं. त्यात भाताचे दाणे घालून विस्तवावर ठेवून तिनं वाळवले. उखळही हिमात बुडालं असल्यानं मग ती गावच्या उखळावर जाऊन भात सडू लागली. गावाच्या मधोमध एके ठिकाणी उंच छपराखाली सहा-सात उखळांची व्यवस्था होती. हिम किंवा पाऊस पडल्यावर गावकऱ्यांना घरातल्या उखळांवर काम करता येईनासं झालं की ते इथेच येत. धान्य सडून किंवा जे कांडायचं ते कांडून घेऊन जात. मानुलीही मायसोबत आली होती. मायच्या पायांत हवाई चपलाच होत्या.

लोकरीचा स्वेटर नि जाड घागरा घातलेला असूनही ती थंडीनं थरथरत होती.

"मला ताप आलाय बहुतेक." माय उखळ स्वच्छ करत म्हणाली.

"खरंच. माय, पण तू बूट का घालत नाहीस पायांत? गावातल्या सगळ्याजणींनी बूट घालायला कधीच सुरुवात केलीय बघ." मानुली जणू सुचवत होती.

"मला काही ते बूट घालायला आवडत नाही ग. कसंसंच वाटतं. खरं तर ते पोरीबाळी घालतात." मायन तिची बाजू मांडली.

"तुला तर कधीच काही नवं करायला नको असतं." मानुली नाराजी व्यक्त करत होती. "या वेळी बाबा घरी आले, की मी नव्या पद्धतीचे कपडे मागणार आहे. मला टेरिलिनचा पंजाबी ड्रेस हवाय. इतर मुलींकडे आहे तस्साच!"

"तुझ्या बाबांनी एवढाले पैसे आणायचे तरी कुठून?" माय निःश्वास सोडत म्हणाली, "परुलीच्या लग्नालाच केवढा तरी पैसा लागणार आहे. तुला कळायचं तरी कधी?"

मानुलीला रागच आला. "जे करायचं ते फक्त लग्न डोळ्यासमोर ठेवूनच. असं का करता तुम्ही सारेचजण? शिवाय लग्नात नवऱ्यामुलीला मुलगी म्हणून समजून घेण्याऐवजी म्हशीसारखं वागवता ते वेगळंच!" आपल्याला शाळेत जायची परवानगी असल्याचा तिला आनंद होत होता. तिला वाटत होतं, की शाळेच्या निमित्ताने तरी लग्नाच्या जंजाळापासून आपण दूर राहू शकू.

मायनं थोडंफार कांडण केलं नाही तोच ताप वाढला. मग मानुलीनं मुसळ हातात घेऊन काम संपवायचा प्रयत्न केला. काम झालंय असं वाटल्यावर ती म्हणाली, "चला, निघू या."

एवढ्या हिमाच्या ढिगाऱ्यांमधून मायला घरापर्यंत कसं बरं न्यायचं, हा यक्षप्रश्न मानुलीपुढं उभा ठाकून होता. अंधारूनही आलं होतं नि हिमवर्षाव पुन्हा नव्यानं सुरू झाला होता. वाटेत कोणी भेटायचीही या वेळी तरी सुतराम शक्यता नव्हती.

मानुलीनं एका सुरेख लिंपलेल्या टोपलीत भात गोळा केला. टोपली डोईवर ठेवून मायचा हात धरला. तिला चटका बसला. वाट नेहमीपेक्षा बरीच मोठी वाटायला लागली. माय कितीदा तरी ठेचकाळली. घरात शिरताच ती अंथरुणावर आडवी झाली.

"तिला ताप उतरवायची मुळी दे, नाही तर कढत दुधात चिमूटभर हळद टाकून दे नि तिच्या पायांना सरसूच्या तेलानं चोळ जरा." आजोबांनी सांगितलं. थोडे दिवस माय अंथरुणावरच होती. बाहेर खूप थंडी असायची. पहाटे हिमानं भुई पांढरी झालेली दिसायची. तिचा ताप त्या मानानं लवकर गेला, पण शौचाला थंडीत लांब जावं लागायचं, त्यामुळे खोकला पाठ सोडत नव्हता. आजीही सर्वतोपरी काळजी घेत होती; परंतु मायचा खोकला बरा व्हायला पुष्कळ दिवस लागले.



परुलीचं लग्न अगदी थोड्याच दिवसांवर येऊन ठेपलं होतं. ऋतूही बदलला होता. शेतात जिकडंतिकडं पिवळी फुलं दिसत होती. लाल फुलंही एवढी उमलली होती, की टेकडी जणू नव्या नवरीसारखी नटूनथटून बसल्यासारखी दिसत होती. उष्ण प्रदेशातले स्थलांतरित पक्षी मानुलीच्या गावाभोवती वस्तीला आले होते. वेगवेगळ्या पक्ष्यांच्या आवाजांमुळे आसमंतात आनंदीआनंदाचं वातावरण होतं. सदाबहार झाडांची पानगळ नि नवी पालवी दोन्ही एकाच वेळी दिसत होतं. कोवळ्या पानांचा चारा गुरांसाठी आणायला म्हणून मानुली नि परुली रानात निघाल्या होत्या. परुली अलीकडे काहीशी उदासच असायची. मानुलीही तिला हसवू शकत नव्हती.

एके दिवशी मानुलीने तिला विचारलं, "तू एवढी उदास का असतेस?"

"तुला ठाऊक नाही, काय म्हणून उदास असते ते?" परुलीने उत्तरादाखल पुन्हा प्रश्नच विचारला. "आईला किती दिवसांपासून बरं नाहीय अन् कित्येक दिवसांत बाबांचं साधं पत्र नाही. वाईटात वाईट म्हणजे यंदाच्या हिवाळ्यात आजोबांचा अशक्तपणाही केवढा वाढलाय! ते आता पहिल्यासारखे राहिले नाहीत."

"बाबांनी पत्र पाठवलं नाही यामागं काय बरं कारण असावं?" मानूनं विचारलं.

"हिवाळ्यातल्या पावसानंतर रस्त्यांची परिस्थिती बिकट होते. बस घसरण्याची भीती असते नि बस घसरली तर काय काय होऊ शकतं ते ठाऊकाय का तुला?" परुली उत्तरली.

मागं एकदा मानुलीनं विदीर्ण अवस्थेतले बसचे अवशेष पाहिले होते. ते डोळ्यांसमोर येताच तिच्या अंगावर एकदम काटाच उभा राहिला.

"बाबा आले की मला अगदी पूर्णपणे अनोळखी कुटुंबात जावं लागेल." परुली तिचं मन मोकळं करत होती. "त्या कुटुंबातल्या माणसांना मी अजिबात ओळखत नाही ग. त्या घरातल्या माझ्या वयाच्या मुली कशा असतील तेही मला माहीत नाही. मला दोन धाकट्या नणंदा आहेत असं ऐकतेय.'

"पण तुझ्या लग्नानंतरच्या आयुष्याबद्दल तुझ्या मनात काहीच येत नाही?" मानू गंभीरपणे विचारत होती,"आजोबा म्हणत होते की तुझा होऊ घातलेला नवरा शिकला-सवरलेला आहे. बाबांसारखा तोही डोंगरापलीकडे कामाला आहे. कुणी सांगावं, त्याच्यासोबत तू शहरातही जाशील!"

"ते नेमके कसे आहेत ते मला तरी कसं ठाऊक असणार? मी अजून त्यांना पाहिलं तरी आहे का? तुला माहीत आहे हे सगळं." परुली बोलत होती. "मला एकच गोष्ट कळते, की जुन्या परंपरेनुसार सुरुवातीच्या काळात तरी नवऱ्यानं वडीलधाऱ्यांदेखत

त्याच्या बायकोशी बोलायचं नसतं. त्यामुळे दिवसदिवस मला अगदी कामाच्या रगाड्यात बुडून राहावं लागेल हे नक्की. हो, आता हिवाळ्याच्या दिवसांत फारसं काम नसतं. तेव्हा कदाचित मला नवऱ्यासोबत जाऊ दिलं तर देतील."

"तिकडे तुला नीट वागवलं नाही तर तू सरळ इकडे निघून ये हं!" मानुलीनं सुचवलं.

"मी असलं काही करू शकणार नाही हेही तुला माहीत आहे, मानुली. त्यांच्यापैकी कोणी मला इकडे सोडायला येईल तेव्हाच मी येऊ शकेन... पण ते माझ्या मनाचा विचार करतीलच याचा काय भरवसा? ते स्वतःचीच सोय बघणार ना?" परुली दुःखी अंतःकरणाने सारं सांगत होती.

मानुलीच्या मनातला लग्न न करण्याचा निर्धार या सर्व बोलण्यामुळे आणखीच बळकट झाला. रानात त्या खूप दूरवर निघून आल्या होत्या. परुली एका झाडावर खूप उंचापर्यंत सरसर गेली नि कोयत्यानं कोवळ्या पानांच्या डहाळ्या तोडू लागली. मानूच्या पायांभोवती या पानांची रास झाली. परुली एकाएकी झाडावरून म्हणाली, "माझ्या मनात मात्र नवीन कपडे नि दागिन्यांचा विचार राहून राहून येतो, मानुली. ते तर काही मला मिळाल्यावाचून राहत नाही."

परुली नि मानुलीच्या कानाला, नाकाला डूल आणि नथ घालण्यासाठी भोकं होतीच. मध्यंतरी परुलीनं नाकातली बारीक काडी काढून जरा जाडसर काडी त्या भोकात घातली होती. आपल्याला मोठी नथ मिळणार याची तिला पुरेपूर खात्री होती. ही नथ घातली की हनुवटीपर्यंत लोंबणार. मग ती सुरेख दोऱ्यात बांधून कानाच्या आधारानं केसांत तो दोरा गुंफून घेणार.

मानूनं उत्सुकतेपोटी विचारलं, "तुझ्या होऊ घातलेल्या नवऱ्याचं तुझ्यावर खूप प्रेम जडलंय असं तुला वाटतं का?"

"होय बहुतेक!" परुली लाजत म्हणाली. "तरी मला असं वाटतं, की मीही इतर मुलींसारखीच चांगली आहे अन् त्यांच्याशी कसं वागावं याचीसुद्धा मला जाणीव आहे."

घरी परतायची वेळ झालीच होती. दोघींनी दोन भारे केले नि एकमेकींच्या मदतीनं ते दोरीनं बांधून घेतले. आजचे भारे अंमळ मोठेच झाले होते, त्यामुळे घरी पोचेस्तोवरे कंबरा भरून आल्या. वाटेत मात्र आपल्या मागोमाग कोणी येत असेल याचा दोघींनाही अजिबात पत्ता लागला नाही. त्यांचे बाबा आणि त्यांच्या मागोमाग दोन हमाल येत होते. ते दिसताक्षणी दोघीही आनंदल्या. आजी पोराला पोटाशी घेण्यासाठी स्वयंपाकघरातून बाहेर धावत आली.

"देवाचीच कृपा म्हणायची! अशा वाईट हवेतही तू सुखरूप घरी पोहोचलास,



लेकरा!" आजी गदगदलेल्या आवाजात म्हणाली. बाबांनी तिच्या पायांना हात लावून नमस्कार केला. मग ते आजोबांकडे वळले. आजोबा पोराच्या भेटीनं इतके खूष झाले होते, की ते एकदम उठून उभे राहिले. बाबांनी त्यांच्याही पायांना हात लावून नमस्कार केला.

मुलं घरात जमली आणि त्यांनी बाबांना वाकून नमस्कार केला. बाबा धाकट्याचं वागणं बघून आनंदले. त्याच्या केसांतून त्यांनी प्रेमानं बोटं फिरवली. पुढे ते म्हणाले, "हमालांना बिडी द्या, चहा द्या. मी त्यांच्यासाठी पैसे घेऊन आलोच." आजीला वाटत होतं, की या हमालांना टिळा लावून पाच-पाच रुपये जास्त द्यायला हवेत. त्यांनी परुलीच्या लग्नासाठीचं सामान वाहून आणलं होतं ना!

दुसऱ्या दिवशी मायही टुणटुणीत दिसत होती. आजारपणाचा मागमूसही तिच्या चेहऱ्यावर किंवा वागण्यातून जाणवत नव्हता. आजीनं आतापर्यंत झालेल्या लग्नाच्या तयारीबद्दल बाबांना सांगितलं. गावकऱ्यांनी येऊन सडून दिलेल्या तांदळाच्या गोणी, कणकेनं भरलेल्या लाकडी पेट्या नि डाळींनी भरलेल्या पाट्या दाखवल्या. गावकऱ्यांनी सामूहिकपणे लग्नकार्यासाठी जमवलेले सरपणाचे ढीगही तिनं बाबांना दाखवले.

घरात झाडझूड, रंगवणं, सारवणं सारं झालं होतं. धुरानं काळवंडलेलं स्वयंपाकघरही नव्या रंगानं उजळलं होतं. काही दारं आणि सज्जाच्या कठड्यांना तेवढा रंग लावायचा राहिला होता. फडताळात तुपाचे डबे रांगेनं ठेवलेले होते. माय नि परुलीच्या स्वतःच्या कष्टांतून हे सर्व साकारलं होतं.

"केव्हापासून लागलोय आम्ही या लग्नाच्या तयारीला!" आजी अभिमानाने बोलत होती.

"सगळी तयारी व्यवस्थित झालीय असं मलाही वाटतंय. मी येताना सरसूचं तेल, साखर, मसाले, नारळ, मिठाया, सिगारेटी नि हो, लाकडांना रंगवायचा पेंट आणलाय!" बाबांनी माहिती दिली.

चहा पिऊन झाल्यावर बाबांनी सगळ्या वस्तू पेट्यांमधून काढायला सुरुवात केली, बंडलं उघडली. आजोबा बसल्या जागेवरून सर्व पाहत होते नि आजी या सर्व वस्तू ठरलेल्या जागी ठेवून येत होती. पलंगासाठी लागणारे चार लाकडी पाय, नवार अशा वस्तूही बाबांनी आणल्या होत्या. परुलीला हुंड्यात पलंगही द्यायचा होता. एका पोत्यातून त्यांनी तांबं, पितळ, स्टीलची वेगवेगळी भांडी काढली. ताटं, कप, चमचे, चहाची भांडी वगैरे वगैरे. हेही सगळं हुंड्यात द्यायचं होतं. तेवढ्यात माय आत आली. तिनंही सामान काढायला सुरुवात केली. एका गुंडाळीत साड्या, ब्लाऊज, चपला असं सामान होतं. यातलं बरंचसं सामान परुलीसाठीच असलं, तरीही कुटुंबातली इतर मंडळी म्हणजे काकू, माम्या, आत्या वगैरेंच्यासाठीही सुरेख साड्या, ब्लाऊज

असं काय काय आणलेलं होतं. एवढंच नव्हे, तर घड्याळ, ट्रांझिस्टर, अंगठी आणि नवरदेवासाठी सुरेख सूटही आणलेला होता.

मायनं विरघळलेल्या आवाजात विचारलं, "केवढाले पैसे लागले असतील हे एवढं सगळं घेत बसायला नि त्यासाठी तुम्हाला केवढे कष्ट उपसावे लागले असतील!"

"पण हे आपल्या घरातल्या थोरल्या लेकीचं लग्न आहे हे कसं तू विसरतेस?" बाबांनी आईला सांगितलं.

त्यावर आई म्हणाली, "अहो, पण हिच्या पाठच्या दोघी अजून आहेत ना! म्हणजे त्यांच्या लग्नासाठीही पैसे जमवायला तुम्हाला वर्षानुवर्षं घरापासून लांब राहावं लागेल की काय?" तिच्या स्वरात चिंता झळकली.

"हो. कदाचित लांब राहावं लागेल खरं." बाबा हसत नवीन अंथरूण-पांघरुणाची पार्सलं उघडू लागले. गादी, दुलई, चादरी, सर्व काही उत्तम प्रतीचं होतं. मानुली विचार करीत होती, 'हे सगळं हुंड्यात देण्यासाठीच असणार. रोज थोडंच कोणी असलं काही वापरणार?'

परुलीच्या सासरकडूनच दागिने यायचे ठरलं असलं तरीही बाबांनी तिच्यासाठी सोन्याची अंगठी नि कानांतले आणले होते. बाबा अगदी काहीसुद्धा विसरले नाहीत.

हळूहळू नातेवाईक जमू लागले. वऱ्हाड यायच्या आदल्या दिवशी अंगणात एका कोपऱ्यात चूल मांडण्यात आली. तिच्यावर तात्पुरता आडोसा केला. अशा समारंभासाठी स्वयंपाक आणि जेवणासाठी भांडी या गावात सामूहिक असतात. पातेली, कढया, पाणी साठवायला पिंप वगैरे सगळं जमलं. मुलं गमतीनं, उत्साहानं पिंपात पाणी भरू लागली. परुलीचं लग्न फक्त तिच्या घरापुरतंच मर्यादित नसून अख्ख्या गावाचंच जणू कार्य असल्यासारखं होतं. सगळं वातावरणच प्रत्येकाला भारून टाकणारं होतं. अगदी परुलीचा धाकटा भाऊही हे करू की ते करू अशा नादात इकडंतिकडं दुडूदुडू धावत होता. पाहुण्यांसाठी इतर घरांमधून कांबळी आणायला मुलं गेली त्यांच्याही मागं मागं ही स्वारी होतीच. त्यानं चक्क चहाचे ग्लासही विसळले. चमचे धुऊन दिले. आता तो फांद्यांची साल काढत बसला होता. रात्री सर्वजण एका घराहून दुसऱ्या घरी जातील तेव्हा उजेड व्हावा म्हणून मशालीसारखी झाडाची साल पेटवायची ही योजना होती. साल काढता काढता एकाएकी त्याच्या तोंडून किंकाळी बाहेर पडली. फांदीबरोबर स्वतःच्या बोटाचीही साल त्याने सोलून काढली होती. जखम नाही म्हटलं तरी खोल होती.

आजी धावतच आली. ठिबकणारं रक्त पाहून ती घाबरली. धाकट्याचं बोट घाईघाईनं तुरटीच्या पाण्यात धरलं तरी रक्त थांबेना. शेवटी आजोबा त्यांच्या अंथरुणावरून उठले. काठी टेकत टेकत ते रानाकडे गेले. थोड्या वेळात परतले ते



कसलासा पाला घेऊन. तो धुऊन, वाटून जखमेवर लावताच रक्त वाहायचं थांबलं. माणसं पुन्हा आपापल्या कामाकडे वळली. बायामाणसं उंबरे, पायऱ्या, भिंतींवर तांदळाच्या पिठीनं अल्पना काढीत होत्या. भिंतींवर तर त्यांनी लग्नातल्या किती तरी विधींची पौराणिक चित्रं काढली. सूर्य, चंद्र आणि गृहनक्षत्रंही रेखाटली. मुलांनी आणि तरुणांनी रंगीत पताकांनी अंगणाची शोभा वाढवली. काहींनी तर केळीचे खांब उभे करून बनवलेलं द्वार फुला-पानांच्या तोरणांनी नटवलं. त्याच्यावर 'स्वागतम्' लिहिलेला एक चमकदार कापडी फलक लावला.

माय स्वयंपाकघरात सगळ्यांसाठी चहा करत होती. सगळे जण घरी परतायला अंधार झाला, पण लग्नाची तयारी मात्र पुरती झाली होती त्यामुळे आता चिंता नव्हती.

बायका फटफटल्यापासूनच येऊ लागल्या. लाल, हिरव्या, निळ्या साड्या व ब्लाऊज नि घागरा नेसलेल्या. काहींच्या नाकात अवजड नथी दिसत होत्या. सगळ्यांच्याच गळ्यांत अन् हातांत दागिने होते.

अंगणातल्या सपाट खडकावर सतरंजी अंथरलेली होती. येणाऱ्या बायकांना कुंकू लावून माय त्यांचं स्वागत करत होती. मग त्या सतरंजीवर बसत होत्या. सूर्य तळपत होता म्हणून हवेत उष्मा जाणवत होता. वसंत ऋतूचा दरवळही त्यात मिसळला होता.

मानुलीनं ढोलक उन्हात ठेवली होती. तिचं कातडं तापलं की आवाज दुमदुमणार. काहीजणींनी सुरुवातीला गणेशस्तुती आणि शकुनाची गाणी म्हटली. मग तरुणींनीही ढोलक अन् टाळ्यांच्या गजरानं वातावरण गर्जून टाकायला सुरुवात केली. लग्नाची गाणी, नवीन कपड्यांची सळसळ, लग्नघर छान सजलं होतं. पाहुण्यांनी लग्नाला येताना आपापला खारीचा वाटा उचलावा म्हणून दही, दूध, भाज्या असं काय काय आणलं होतं. मानुली ते सगळं साठवून ठेवायला आजीला हातभार लावून ज्याची-त्याची भांडीकुंडी परत करत होती. मायनं कणीक चाळून मोठ्या परातीत ठेवली. ती मळून बायकांनी त्याच्या पापड्या केल्या आणि चादरीवर वाळत घातल्या. नंतर त्या तेलात तळून सर्वांना वाटायच्या होत्या.

अंगणात एका बाजूला एक बाई पातळ पांढरी चादर पिवळ्या रंगात रंगवून तिच्यावर लाल रंगाचे ठिपके उमटवत होती. याला आता 'पिछौडा' म्हणायचं. हे वस्त्र नवऱ्यामुलीनं लग्नाच्या दिवशी साडीवरून पांघरायचं असतं. त्याच दिवशी परुलीच्या अंघोळीआधी माय, काकू, वहिनी अशा कोणी कोणी तिला हळद लावली. अंगाला हळद लागल्यामुळे परुलीचा गोरा रंग, अधिकच उजळला होता. सगळ्यांना चहा

देताना तीने पिवळ्या आणि लाल रंगाचीच साडी नेसली होती. सगळ्या स्त्रिया तिच्या सौंदर्याची मुक्त कंठानं स्तुती करीत होत्या. कशी गंमत आहे बघा! परुलीचं सौंदर्य यापूर्वी कोणालाच कसं जाणवलं नव्हतं? परुलीच्या मैत्रिणीही तिच्या देखेणेपणाचे गोडवे गात होत्या. परुलीचा आनंद गगनात मावेनासा झाला होता.

मानुली तिला हलकेच म्हणाली, "रानातल्या परीसारखी सुरेख दिसते आहेस तू! आता एवढ्यात राजपुत्र येईल आणि तुला घेऊन जाईल त्याच्यासोबत!"

"तू आपली सतत पऱ्यांच्या गोष्टी वाचत असतेस!" लटक्या रागानं परुली म्हणाली, तरी काही केल्या तिचा आनंद तिला लपवता येत नव्हता.

जराशानं गावातल्या बायका घरोघरी परतल्या; पण आता परगावची मंडळी यायला सुरुवात झाली. हे सर्वच जण लग्न पार पडेस्तोवर राहणार नि वऱ्हाड इथून हलल्यावरच निघणार.

लग्नाला आतेभाऊसुद्धा त्याच्या बायकोला घेऊन आला. त्याच्या बायकोनं उंच टाचांच्या चपला घातल्या होत्या. घाम पुसायला ती सारखी रुमाल वापरत होती. बराच वेळ तिच्याजवळ बसल्यानंतर मानुलीनं न राहवून तिला शेवटी विचारलं, "वहिनी, तुझ्या शहरात तर बऱ्याच मुली शाळा शिकत असतील ना?"

"होय. खूपजणी शिकतात, पण फक्त आठवी ते दहावीपर्यंतच. श्रीमंतांच्या मुलीच फक्त कॉलेज किंवा विद्यापीठात जाऊ शकतात." मानुलीला उत्तर देता देता ही वहिनी मध्येच शेजारी बसलेल्या दुसऱ्या बाईकडे वळून म्हणाली, "माझी लेक मात्र कॉलेजात शिकते बरं का! चांगला नवरा मिळवायचा असेल तर शिक्षण हवंच. तिच्याजोगता एखादा अनुरूप नवरा मुलगा सापडला की आम्हीही तिचं शिक्षण थांबवू."

"पण का?" मानुलीनं आश्चर्याने विचारलं.

वहिनीलाही मानुलीचा प्रश्न जरा विचित्रच वाटला. ती म्हणाली, "मुलीला उत्तम जोडीदार मिळणं हेच सगळ्यात महत्त्वाचं, आणखी काय?" वहिनी ठासून सांगत होती.

मानुलीला हे सर्व अजिबातच आवडलं नाही त्यामुळे वहिनीला आता आणखी काही प्रश्न विचारायचा प्रश्नच उरला नाही. ती गप्प झाली, पण वहिनी मात्र तिच्या लेकीच्या नि शहरात राहणाऱ्या इतर मुलींच्याही थाटाबद्दल काहीबाही बोलत राहिली, "आमच्या शहरातल्या मुली अगदी वाट्टेल त्या विषयावर बोलू शकतात पण कष्टाची कामं मात्र त्या करणार नाहीत. त्या जर का अशा राबू लागल्या तर त्यांच्या मऊ मऊ हातांचा नि सुरेख नखांचा पार विचकाच होणार, हो की नाही?" वहिनी नुसताच रुबाब दाखवत नव्हती तर त्याला साजेसे तिचे तर्कही मांडून तिचा मुद्दा बळकट करत होती.



वहिनी क्षणभर बोलायची थांबल्यावर मानुलीनं प्रश्न टाकला, "मग शेतीवाडीचं कोण बघतं? दूध, तूप, भाजीपाल्याचं काय?"

"बाळ, या सर्व वस्तू आम्ही बाजारातनं विकत आणतो. फक्त आम्हीच नाही तर इतरही सर्व जण तसंच करतात." वहिनीने खुलासा केला.

मानुलीला यातून काहीच अर्थबोध होत नव्हता. साबण, मीठ, साखर आणि अशाच काही वस्तूंचं एक वेळ ठीक आहे. हे फक्त दुकानातच मिळतं. पण दूध, तूप अन् भाजीपाला हेसुद्धा? हे सर्व कल्पनेपलीकडचं होतं.

वहिनीला तिच्या शहरी राहणीमानाचा भलताच गर्व झालेला दिसत होता. ती सांगत होती, शहरात कशी विजेची सोय असते. बटन दाबलं की खोलीत कसा लख्ख उजेड पसरतो. मानुलीच्या कानांना हे सर्व खटकत होतं. पाण्याचं एक वेळ ती समजू शकत होती. नळाच्या माध्यमातून घरोघरी पाण्याची व्यवस्था करता येणं तिला पटू शकत होतं. मग हवं तेव्हा पाणी... कारण पावसाळ्यात त्यांच्याकडेही लाकडी नळ्यांमधून घरापर्यंत पाणी आणायचा प्रयोग करून झाला होता.

तेवढ्यात आजी घाईनं आली. म्हणाली, "उठा. आवरा पटपट. वरात निम्म्या वाटेवर येऊन पोहोचलीय. तासाभरात इथं पोहोचेल."

स्वागतासाठी मंगल कलश घेऊन दारात उभं राहायची जबाबदारी मानुलीवर होती. त्यामुळे तांब्याची घागर आणायला ती घरात धावली. परुली एका खोलीत धान्याच्या मोठ्या कणगीच्या आडोशाला बसली होती. तिच्या वयाच्या मुली तिला वेढून होत्या. लग्नाचा महत्त्वाचा विधी पार पडणार होता त्या ठिकाणी एक सजवलेली खाट ठेवलेली होती. आणखीही बरंचसं सामान होतं. वरातीच्या स्वागतासाठी अंगणात एक जागा ठरवलेली होती. तिथं गेरूनं सारवून तांदळाच्या पिठीनं अल्पना रेखलेली होती. आता भटजीबुवा तिथं बसून पुढच्या तयारीला लागलेले होते. मानुलीने फुलांच्या माळा घागरींना बांधल्या, शकुनाच्या डहाळ्या पाण्यात उभ्या केल्या. या घागरी तिनं आता स्वागतासाठी दाराच्या दोन्ही बाजूंस ठेवल्या. अशाच दोन घागरी तिनं स्वयंपाकघराच्या दाराशीही ठेवल्या. आता ती वडलांनी आणलेला टेरिलीनचा सलवार-कमीज घालायला लगबगीनं निघाली.

"आता तूही शहरातल्या मुलींसारखी दिसते आहेस." वहिनी म्हणाली. या वहिनीनं नेसलेली सोन्याच्या नक्षीकामाची लाल साडी मानुलीनं यापूर्वी पाहिलेली नव्हती. केवढी सुंदर साडी होती ती!

सावल्या मोठ्या होऊ लागल्या नि सबंध दरीत ढोल, गाण्याबजावण्याचा नाद घुमू लागला. वरात अगदी रांगेनं पायवाटेवरून पुढं पुढं येत होती. जवळ येताच आधी लाल झेंडा दिसला. त्यामागोमाग तसाच आणखी एक पांढरा झेंडाही दिसायला

लागला.

"एखादी फौजच येत्येय जणू. त्यांच्यापाशी हे लाल अन् पांढरे झेंडे असायचं काय कारण?" मानुलीनं आजीला विचारलं.

"अग, ही आपली जुनी पद्धत." आजी म्हणाली, "लाल झेंडा आक्रमणाचा, म्हणून तो आज आघाडीला आहे. अन् पांढरा झेंडा म्हणजे विजयाचा. जाताना तो पुढे घेतील."

"म्हणजे ते आता आपल्यावर आक्रमण करतील?" मानुलीनं त्वरेनं विचारलं.

"अग बया! तसं नाय ग." आता कसं समजावून सांगावं ते आजीला सुचेना. "अग, ही एक आपली पद्धत म्हणायची. बघ, मधोमध ती डोली दिसत्येय ना, तिच्यात बसून तुझी ताई उद्या सासरी जाणार... आणि तो बघ रेशमाच्या कापडात गुंडाळलेला पेटारा. त्यात परुलीसाठी कपडे नि दागिने असणार."

तिकडे मंडळी वरातीच्या स्वागतासाठी अंगणात उभी नि इकडे मानुली एका उंच भिंतीला टेकून गंभीरपणे विचारात गढलेली... "या सगळ्याचा अर्थ, मुलीला कोणे एके काळी आक्रमणातील लूट म्हणून उचलून घेऊन जात असत की काय?" मानुलीच्या जाणिवा इतरांपेक्षा अधिक तल्लख नि वेगळ्या असल्या तरी तिला हा तिढा मात्र काही केल्या उमगेना.

"लवकर ये. मला खाली उतरून ने." आजोबा व्हरांड्यातून हाकारत होते. "मला स्वागतासाठी दाराशी जायचंय."

आजी धावून यायच्या आधीच बाबांनी आजोबांना तिथवर नेलं. आजोबा आज खूप छान दिसत होते. नवीन खादीची टोपी, अंगावर पांढरी शाल. आजोबा मग दाराशी इतर लोकांमध्ये मिसळून उभे राहिले.

वरातीचं आगमन झालं. ढोल बडवणारे घामाघूम झाले असले तरी त्यांचा जोर मात्र कमी झालेला नव्हता. नवरदेव एका छोट्या घोड्यावर स्वार होऊन आला होता. मस्तकी सोनेरी मुकुट, अंगावर वेलबुट्टीदार पायघोळ कोट, खांद्यावर लोकरीची शाल. त्याच्या एका हातात रुमाल होता नि दुसऱ्या हातानं त्यानं छत्री डोक्यावर धरली होती. मानुली नवरदेवाजवळ गेली. त्याचं कपाळ आणि गालांच्या वरच्या भागावर पांढरेलाल ठिपके रेखाटून नटवलेलं रुपडं तिला दिसलं.

मुलं भलतीच खूष होती, कारण वरातीसोबत 'छोलेती' नर्तकही आलेले होते. रंगबिरंगी पोषाख घालून ते हातांत ढाल-तलवारी घेऊन नाचत होते. ढोलाच्या तालावरचं त्यांचं नृत्य चपळाईमुळे बघणाऱ्यांचं लक्ष वेधून घेत होतं.

नवरदेवाच्या वडिलांच्या खांद्यावरही शाल होती. त्यांनी स्वागतासाठी ठेवलेल्या कलशात काही नाणी टाकली. भटजीबुवांनी शंखनाद केला नि बायका कुमाऊँनी



भाषेतली मंगलगीतं गाऊ लागल्या. माय आणि तिच्या बरोबरीच्या इतर सुवासिनी वेलबुट्टीदार घागरे नि आकर्षक रंगांच्या साड्या नेसल्या होत्या. त्यांच्या भाळी लाल कुंकवाचा उभा टिळा अन् त्यावर अक्षता होत्या. प्रत्येकीच्या हातात पाण्यानं भरलेला तांब्या अन् ओटीत फुलं नि अक्षता होत्या. त्या सगळ्यांनी दोन्ही हातांत तांब्या धरून नवरदेवावरून ओवाळला. मग थोडं पाणी भूमीवर सांडलं. त्यानंतर फुलं अन् अक्षता नवरदेवाच्या मस्तकापर्यंत नेऊन चारी दिशांना विखुरल्या.

मानुली बघत होती. तिच्या बाबांनी नवरदेवाचे बूट-मोजे काढले व त्याचे पाय धुतले. नवरदेवाच्या स्वागताची ही सर्वाधिक शिष्टसंमत पद्धत या भागात होती. नवरा आणि नवरी अशा दोन्हीकडच्या भटजींनी मंत्रोच्चार करून स्वागतसमारंभ पार पाडला.

नवरदेव आणि त्याच्या वडिलांनी स्वागतचौथऱ्यावर बसून चहा अन् गोडाधोडाचा आस्वाद घेतला. त्यानंतर ते त्यांच्यासाठी राखून ठेवलेल्या बंद खोलीत गेले. तिथं गालिचे अंथरून ठेवले होते अन् पेट्रोमॅक्सचा उजेड लखलखत होता. इथं आजोबा त्यांची वाट बघत बसले होते. नवरदेवानं त्यांना वाकून नमस्कार केला. त्याला आशीर्वाद देताना त्यांच्या हातांना आनंदाच्या परमावधीनं कंप सुटला होता. हे सगळं घडत असताना परुलीला मात्र आत थांबणं भाग होतं... कारण नवऱ्यामुलीनं तिच्यासाठी येणारी वरात किंवा ती येऊन ठेपल्यानंतरचा स्वागतसमारंभ पाहायची पद्धत नाही.

अंधारून येताच भराभरा पेट्रोमॅक्स पेटवले गेले. मुलं तलवारधारी नर्तकांची मनधरणी करत होती; पण ते बापडे इतका वेळ अथक नाचल्यानं थकले होते. ते इतरांपासून काहीसे लांब बसले होते, कारण ते खालच्या जातीचे होते. मात्र चहा किंवा गोडधोड वाढताना कोणीही त्यांच्याशी भेदभाव करत नव्हतं.

अशा मोठ्या समारंभासाठी स्वयंपाकाची जबाबदारी पुरुषवर्गाकडंच असल्यानं काही ब्राह्मण त्या कामात गुंतले होते. म्हणता म्हणता स्वयंपाकाचा सुगंध वातावरणात पसरला. लोकांच्या तोंडाला पाणी सुटलं. गारठाही वाढला होता. वऱ्हाडी माणसांनी सुती सदरे नि धोतरं नेसल्यानं त्यांना अंमळ जास्तच थंडी जाणवत होती.

पहिली पंगत वऱ्हाडी मंडळींची. बाबा ऊन ऊन पाण्याची बादली घेऊन सज्ज होते. एकेकजण यायचा, हात-पाय धुऊन जेवायला बसायचा. पूर्वीच्या काळी अशा मोठ्या जेवणावळींसाठी पत्रावळी नि द्रोणच ठेवत असत; पण अलीकडे मात्र कित्येक गावांमध्ये अशा कार्यांसाठी सामूहिक भांड्यांची सुविधा उपलब्ध झाल्यामुळे ताटं, वाट्या नि ग्लासांची अजिबात उणीव नव्हती.

वऱ्हाडी मंडळींबरोबरच लहान मुलांनाही पंगतीत बसायला सांगितलं होतं. तरुण गडी आग्रहानं वाढत होते. त्यानंतर गावातली पुरुषमाणसं आणि सगळ्यात शेवटी बायका जेवायला बसल्या. माय नि बाबांना उपवास धरायला लागला होता. आजोबा अन् आजीनंही स्वेच्छेनं उपवास धरला होता. त्यांनी मग फळं, दूध, चहा वगैरे घेतला.

भटजीबुवा आपलं स्थान ग्रहण करून मंत्रोच्चार करू लागले. विवाहविधीला आता सुरुवात झाली होती. समोर पवित्र अग्नी प्रज्वलित झालेला होता. सभोवताली नवरदेव, त्याचे वडील, नवऱ्यामुलीचे आईवडील बसून होते. भटजींच्या सांगण्यानुसार ते 'पुष्पम्, फलम्, जलम्' असं काय काय अर्पण करून पूजा करत होते. तिकडं नवऱ्यामुलीला तिच्या सख्या सुरेख कपडे घालत होत्या, नटवत होत्या. परुलीही खूपच सुंदर दिसत होती.

नवरीमुलगी तयार होताच मायनं तिला हाताशी धरून होमाजवळ नेलं आणि नवऱ्यामुलाच्या शेजारी बसवलं. तिच्या मैत्रिणीही तिच्या पाठीशी बसल्या.

आजी हळूच पुटपुटली, "आता परुली परक्यांची झाली."

हे ऐकताच मानुली उदास झाली. थोड्या वेळापूर्वीच तर परुलीचे नवे कपडे, दागिने, तिचं सौंदर्य बघून ती केवढी आनंदली होती! विवाहाचा मुहूर्त मध्यरात्री होता. परुलीच्या अंगावरील 'पिछौड्या'चं टोक नवऱ्यामुलाच्या अंगावरल्या शालीच्या टोकाला बांधायचा विधी होता. त्या वेळी एका मुलीनं सूचना केली, "एवढं घट्ट बांध, की या दोघांची लगीनगाठ आजन्म तशीच राहो अन् परुलीला आमची कधीच आठवणदेखील न येवो!" सगळेच हसले.

एक आजीबाई म्हणाल्या, "देव या दोघांनाही फक्त या जन्मातच नव्हे तर पुढील जन्मातही नवरा-नवरी म्हणून सुखी ठेवो."

नवरदेवानं परुलीच्या गळ्यात मंगळसूत्र बांधलं, भांगात सिंदूर भरला. त्यानंतर दोघांनी पवित्र अग्नीला सात प्रदक्षिणा घातल्या. प्रत्येक प्रदक्षिणेच्या वेळी परुली नवऱ्यामुलाच्या एक पाऊल पुढं चालत होती अन् धाकटा भाऊ त्यांच्या पुढ्यात साळीच्या लाह्या टाकत होता. हा विधी संपला तेव्हा मायचे डोळे डबडबले होते. बाबा भटजीबुवांना दक्षिणा देत होते. परुलीला ती दिवसभर होती त्या खोलीत जाऊन विसावावंसं वाटत होतं, पण काय करणार? तिच्या 'पिछौड्या'चं टोक तर नवऱ्यामुलाच्या शालीशी बांधलेलं होतं. आजीनं दोघांच्याही अंगावरून पिछौडा आणि शाल काढून घेऊन खुंटीवर टांगून ठेवलं नि परुली आपली नेहमीसारखी कमलासोबत झोपायला निघून गेली.

मानुलीही खूपच दमली होती. तिला झोपायला कुठं जागाच सापडेना. शेवटी एका



दुलईत आसरा मिळाला. ही दुलई पांघरून कोण कुठली मुलं झोपली होती कोण जाणे! यापूर्वी तिनं त्यांना कधीही पाहिलेलं नव्हतं.

दुसऱ्या दिवशी नीट उजाडण्यापूर्वीच ढोलाच्या आवाजानं ती जागी झाली. अंगणात अजूनही बत्ती पेटलेली होती. कोणी अनोळखी माणसं पाणी तापवून अंघोळी करत होती. आणखी काहीजण स्वयंपाकाच्या तयारीत जुंपलेले होते. मानुलीला या सगळ्या गदारोळात अगदी एकटं एकटं वाटू लागलं होतं. माय आणि आजी सापडताच तिच्या डोळ्यांमध्ये पाणी तरळलं.

"काय झालं ग मानू?" मायनं विचारलं. "परुली जाणार म्हणून तू रडतेस होय?"

मानुली गप्पच राहिली.

आजी म्हणाली, "बायकांच्या नशिबी हे असंच असायचं. लग्न केलं तरी आणि न केलं तरी दुःखं काही सुटायची नाहीत."

मानुलीला मात्र हे पटत नव्हतं.

पंगती आटोपताच वरात परतणार होती, कारण अंधारून यायच्या आधी त्यांना नवऱ्यामुलीला तिच्या सासरी नेऊन सोडायचं होतं. परुलीच्यासुद्धा कपाळावर अन् गालांच्या वरच्या भागावर नवऱ्यामुलासारखेच पांढरे-लाल ठिपके रेखाटण्यात आले. मुलीच्या आयुष्यात फक्त एकदाच तिला अशा पद्धतीनं सजवण्याची पद्धत असते.

संदूक उघडून नवऱ्यामुलीला नवे कपडे नि दागिने देण्यात आले. परुलीनं एक वेलबुट्टेदार साडी, मखमली लाल ब्लाऊज घातला. पायांत सोनेरी चपला. वहिनी आणि मैत्रिणींनी तिच्या अंगावर दागिने चढवले. एक भरदार नथ, चांदीच्या जड पोहोच्या, पैंजण, सोन्याचे डूल आणि हार. मायनं लग्नाचा मुकुट डोक्यावर ठेवताच परुली ओक्साबोक्शी रडू लागली. मायलाही आवरता येत नव्हतं. बायका बिदाईगीत म्हणत होत्या. त्यानं आणखीच रडायला येत होतं. ही घटका मानुलीच्या दृष्टीनं अत्यंत कठीण अशी होती. त्यातून तिच्याकडं कोणाचंही लक्षच नव्हतं. स्वतःच्याच अश्रूंनी ती जणू न्हाऊन निघत होती.

परुली आणि तिचा नवरा दाराशी दिसताच इतरही किती तरी जणांच्या डोळ्यांत पाणी तरळलं. परुलीच्या हातात तांदूळ आणि फुलं होती. ती बाहेर येताच तिनं ते सर्व उंबरठ्यावर अर्पण केलं. आता नवऱ्याच्या घरी प्रवेश करतानाही तिला पुन्हा एकदा असंच करावं लागणार होतं.

अंगणात माणसंच माणसं. शंख नि ढोलांच्या गर्जना. तलवारधारी नर्तकांचा नाच पुन्हा एकदा जोरात सुरू आणि बायकांच्या तोंडी बिदाईगीतं. परुली रडतच होती.

माय, आजी नि गावातल्या आणखी बऱ्याच जणी रडत होत्या. एवढंच काय, काही पुरुषांच्याही डोळ्यांत आसवं होती नि मानुलीचं तर विचारूच नका. आजच्या एवढा दुःखाचा दिवस तिच्या आयुष्यात कधीच उगवला नव्हता. तिचे प्राण कंठाशी आले होते. हुंदके काही केल्या थांबतच नव्हते.

डोली सजून तयार होती. परुली आलटून-पालटून आजी, माय नि बहिणींच्या गळ्यात पडून सारखी रडत होती. शेवटी गावातल्या एका वृद्धेनं तिला आणि तिच्यासोबत सासरी जाणाऱ्या धाकट्या भावाला बळंबळंच ढकलून डोलीत बसवलं. नवरामुलगा पुन्हा घोड्यावर स्वार झाला. गड्यांनी डोली उचलली नि ते डोंगर उतरू लागले. वरात एका अरुंद रस्त्याला लागून परतीच्या दिशेनं निघाली. वरातीच्या अग्रभागी पांढरा झेंडा, त्याच्या मागं डोली, मग नवरदेवाचा घोडा, पाठोपाठ वऱ्हाडी मंडळींची लांबच लांब रांग. त्या सगळ्यांमागं सामानसुमान वाहून नेणारे. काहीजण हुंड्यातलं हे सामान जवळ येऊन बघत. पलंग, भांडीकुंडी, वगैरे वगैरे.

माय आणि आजी दोघींच्या मध्ये उभ्या राहून मानुली नि कमल डोळे भरून वरातीकडे बघत होत्या. अगदी ते सगळे संपूर्णपणे दिसेनासं होईपर्यंत. त्यानंतर सगळे घरात परतले. बाबांनी या कार्यासाठी आलेल्या पाहुण्यांना भेटी द्यायला सुरुवात केली. कारण हेही महत्त्वाचंच काम होतं अन् तेही यथासांग पार पडणं आवश्यक होतं. कोणी श्रीफल तर कोणी रुपयांची भेट स्वीकारत आपापल्या घराकडे निघाले. जवळच्या नातेवाइकांना साड्या किंवा इतर नवीन कपडे भेट म्हणून दिले. तेही सोयीनुसार उद्या-परवा आपापल्या गावी परततील.

गावातली माणसं दिवसभर भांडीकुंडी, सतरंज्या वगैरे जिथल्या तिथे पोहोचवण्याची व्यवस्था बघत होती. आजीनं गायी आणि शेळ्यांना दोन दिवस गोठ्यातच बांधून ठेवलं होतं. त्यांना आज चरायला बाहेर काढलं. मायबरोबर कमल म्हशींसाठी चारा आणायला रानात गेली. आजोबा घराबाहेर सतरंजीवर बसून विश्रांती घेऊ लागले. मानुलीवर मोठ्ठीच जबाबदारी होती. घरातल्या खोल्यांची साफसफाई. ते आटोपता आटोपता ती एवढी दमली की घरातली माणसं परतायच्या आधीच ती गाढ झोपलीसुद्धा.

लग्नानंतर चौथ्या दिवशी परुली, धाकटा भाऊ आणि परुलीचा नवरा घरी आले. मानुलीला वाटलं, आपली ताई आतापासूनच बदलायला लागली की काय? कारण ती फक्त तिच्या नव्या संसाराबद्दलच भरभरून बोलत होती. ते दोघं दुसऱ्या दिवशीच परतणार होते, कारण परुलीच्या नवऱ्याला त्याच्या नोकरीच्या ठिकाणी पोहोचायचं होतं. मानुलीला भावोजी एकदम आवडले, कारण ते तिच्या शिक्षणाबाबत विचारपूस करत होते. शहरात राहणाऱ्या मुलींबद्दलही ते तिला खूपशी माहिती पुरवत होते.



त्यामुळे त्यांचं अनोळखीपण विरून जाऊन मानुलीला ते एकदम जवळचे वाटू लागले.

नवीन जोडपं आपल्या घरी परतल्यावर धाकटा भाऊ बसच्या प्रवासाचेच गोडवे गात राहिला. आयुष्यात पहिल्यांदाच त्यानं बसचा प्रवास केला होता.

हळूहळू परुलीशिवाय राहायची त्या सगळ्यांना सवय झाली असली तरी परुलीची आठवण मात्र सदोदित जागी असायची. परुलीला लिहिता-वाचता येत नव्हतं, तरी माय नि आजीनं तिच्यासाठी एक पत्र मानुलीच्या हातून लिहून घ्यायचं ठरवलं. पण हे पत्र वाचून तरी कोण दाखवणार, हे लक्षात आल्यावर माय नि आजी दोघींनाही खूपच रडू आलं.

एके दिवशी मात्र परुलीचंच पत्र त्यांना मिळालं. ते एवढ्या वाईट अक्षरात होतं की मानुलीला ते वाचायला अक्षरशः प्रयास पडले. त्यावर शाईचे भरपूर डागही होते. मात्र कष्ट पडूनही परुली खुशाल असल्याचं त्यातून उमगलं.





मानुलीला आता चौदावं सरून पंधरावं लागलं होतं. ती आत्ता सातव्या इयत्तेत होती. इतर मुलींप्रमाणेच तीही पांढरी सलवार आणि निळा कमीज हा गणवेश घालायची. पायांत सँडल्स. दोन्ही हातांत धातू नि प्लॅस्टिकच्या बांगड्या. ती रोज सकाळी तेल लावून लांबसडक वेणी घालायची. मग वह्या-पुस्तकं दप्तरात भरून शाळेत जाताना 'आपण किती नशीबवान आहोत' असं तिच्या मनात यायचं. प्रत्येक विषयात तिला चांगली गती होती. वक्तृत्व स्पर्धेत भाषण करण्याचं तिचं कौशल्य अफाट होतं.

एके दिवशी शाळेतून परतताना तिच्या चेहऱ्यावरून आत्मविश्वास अगदी ओसंडून वाहत होता. ती पहिली आली होती ना वार्षिक परीक्षेत! शिवाय प्रगतिपुस्तकात आगळावेगळा शेरा नोंदवलेला होता, 'असाधारण प्रतिभा व दूरदृष्टी असलेली बालिका.' हे वाक्य वाचताक्षणी अत्यानंदानं तिच्या काळजातली धडधड वाढली. कधी एकदा घरी पोहोचते असं झालं. वार्षिक परीक्षेचा निकाल, त्यात नोंदवलेला गौरवपूर्ण शेरा हे सगळं नीट जाणून घेईल असं कोणीही तिच्या घरात नव्हतं; पण तरीही आपण त्यांना हे समजावून सांगू शकू, असा ठाम विश्वास तिला वाटत होता. तिच्या यशाचा आनंद मात्र नक्कीच तिच्या घराला होणार होता यात काही शंकाच नव्हती.

वेग वाढवण्याच्या नादात तिची सलवार एका झुडपात अडकली. ती पडता पडता वाचली, मात्र सगळी शाई तिच्या कपड्यांवर नि दप्तरावर सांडली. पण तिला आज कसलीच पर्वा नव्हती. झपझप चालताना तिला एक पोस्टमन तिकडंच जाताना दिसला. माना लगबग लगबग त्याच्याही पुढं जाऊ लागताच त्यानं हाक मारून तिच्या



हाती एक पत्र दिलं. ते परुलीच्या घरून आलं होतं.

दिवस बुडायला आला होता. आजी नि माय दमून घरी परतल्या होत्या. मानूनं तिचं प्रगतिपुस्तक अन् परुलीकडचं पत्र दोन्ही आजोबांसमोर धरले. आजोबांनी तिला आधी पत्र वाच म्हणून सांगितलं. परुलीच्या सासऱ्यांनी कळवलं होतं की परुलीचा नवरा दोन महिन्यांपूर्वीच युद्धावर गेला. दहा दिवस झाले, तो बेपत्ता आहे.

मानुलीचे बाबासुद्धा सैन्यातलेच, म्हणून बेपत्ता या शब्दाचा अर्थ त्या सगळ्यांना चांगलाच माहीत होता. सगळ्यांचे चेहरे खर्रकन उतरले. माय पटकन निजायच्या खोलीत शिरली. तिथून तिच्या हुंदक्यांचा आवाज बाहेर ऐकायला येत होता. आजी म्हणत होती, "देवा, तू एवढा मोठा अनर्थ कसा घडवू शकतोस बाबा?"आजोबांनी निःशब्दपणे भिंतीकडे तोंड फिरवलं.

ती सायंकाळ मुलांच्या दृष्टीनेही ओकीबोकीच ठरली. कमलानं भाकरी करून तूप-दह्याबरोबर खाऊ घातली, पण ती घशाखाली उतरेना. भावोजींचा हसरा चेहरा आता कधीच नजरेस पडणार नाही हे काही केल्या मानूला पटत नव्हतं. ती आजीजवळ जाऊन आडवी झाली. रडता रडताच केव्हा तरी डोळा लागला.

माना जागी झाली ती आजीच्या आवाजानं. आजी हाक मारत होती, "सूनबाई, लवकर ये. यांना बघ, काही तरी झालंय." मायपाठोपाठ मानुलीही आजोबा झोपायचे त्या खोलीत पोहोचली. मायनं शोधाशोध करून काडेपेटी हातात घेतली, कंदील लावला. आजोबा अंथरुणातच ताठर झालेले होते. हालचाल नव्हती. फक्त घशातून विचित्र आवाज येत होता. आजीनं त्यांना हाक घातली, हलवलं; पण व्यर्थ. त्यांचा चेहरा मात्र शांत होता. जणू आयुष्यभराचे कष्ट संपवून ते आता विश्रांती घ्यायला निघाले होते.

माय म्हणाली, "त्यांची शुद्ध हरपलीय." आजीने सांगितलं, "त्यांना आता कोणीही काही करू नका. ते आता या जगाचा निरोप घेण्याच्या तयारीत आहेत."

"पण त्यांची अंतिम यात्रा पावन व्हावी म्हणून आपणही आपले सगळे प्रयत्न करायला हवेत. कोणी तरी लवकर जाऊन नदीकाठच्या भटजींना बोलावून आणा रे." माय सूचना देत होती. ती पुढे म्हणाली, "आधीच एवढा दुःखाचा डोंगर कोसळलेला, त्यात आता आजोबाही..."

आजी काळजावर दगड ठेवून म्हणाली, "देवापुढं आपलं काय चालणार? चटकन एक मशाल घे सूनबाई आणि मानुलीला सोबत घेऊन आजोबांचा जीव जाण्याआधी शक्य तेवढ्या लवकरात लवकर भटजींना घेऊन ये. तोवर कमला शेजाऱ्यांना सांगून येईल."

मशाल विझेल की काय असं वाटेल इतका गार, बोचरा वारा. मानुली तर थरथरत होती. केवढी भयाण ही रात्र! जावं तिथली कुत्री भुंकून कहर करीत होती. दोघी

आल्या एकदाच्या नदीकिनारी. रस्त्यालगत आक्रोडाची उंचच उंच झाडं. त्यावर डोकं छाटलेलं भूत असतं म्हणे. ते घोड्यावरून हिंडत असतं असंही म्हणतात. मानूला वाटलं, आता लगेच घोड्यांच्या टापांचा आवाज कानावर येईल. घाबरून तिनं मायचा हात घट्ट धरला.

"काय झालं ग मानुली?" मायनं विचारलं.

"मला भुताची भीती वाटतेय!" मानुली म्हणाली.

"त्याचा विचार मनातून काढून टाक आणि देवाचं नाव घे बाळा." माय मायेनं म्हणाली. मानुलीनं तसं करताच हळूहळू तिची भीती कमी झाली. आता तिला हवेचाच आवाज काय तो ऐकू येत होता, आणखी कुठलाही नाही. भटजीबुवांच्या अंगणात पोहोचल्यावर मायनं त्यांना हाक मारली. ते आणि त्यांची बायको बाहेर आल्यावर मायनं त्यांना नमस्कार करून सगळं काही सांगितलं.

भटजीबुवांना सोबत घेऊन दोघी घरी आल्या. तोवर आजोबांचा श्वासोच्छ्वास सुरू होता. भटजीबुवांनी त्यांची नाडी पाहिली. मग सोन्याची एखादी वस्तू द्या म्हणून सांगितलं. आजीनं कानातली कुडी काढायचा प्रयत्न केला, पण तिच्यानं एकटीनं ती काढणं जमत नव्हतं. शेवटी सोन्याच्या दुसऱ्या वस्तूचा बारीकसा तुकडा आजोबांच्या तोंडात ठेवायची व्यवस्था झाली. एकाकडे वाराणसीहून आणलेलं गंगाजळ होतं. त्याचे थेंब आजोबांच्या तोंडात कोणी तरी सोडत होतं. आजोबांचा श्वासोच्छ्वास एव्हाना मंदावत चालला होता. आता त्यांना बाजेवरून खाली चटईवर घेतलेलं होतं. भटजींनी एक कालवड घेऊन यायला मायला सांगितलं. मायनं मोठी कालवड आणायचा खूप प्रयत्न केला, पण ती त्या खोलीतच शिरेना. शेवटी लोकांनी तिला धरून आजोबांपर्यंत ओढत आणलं. तिच्या शेपटीवर आजोबांचा हात ठेवून भटजी मंत्रोच्चार करू लागले. तेवढ्यात आजोबांनी एक मोठा श्वास घेतला आणि झालं, त्यांची मान एका बाजूला कलंडली. आजी मोठमोठ्यानं आक्रोश करायला लागली. तिचा आवाज शेजारच्या घरापर्यंत ऐकायला येत होता. रडता रडता तिनं आजोबांच्या मृतदेहाला मिठी मारली. शेजारच्या बायका तिचं सांत्वन करू लागल्या, "कोणत्याही रोगाशिवायचं मरण हे सर्वांत चांगलं. पिकलेल्या फळासारखं झाडापासून अलग होणारं मरण आलंय त्यांना." कोण कोण काय काय सांगत होतं! मायनं मानुलीच्या मदतीनं कालवड खाली आणली.

पहाटे गावकऱ्यांनी प्रेत स्मशानात न्यायची तयारी सुरू केली. बायकांनी प्रेतावर फुलं वाहून अंतिम दर्शन घेतलं. त्या सर्वजणी आजोबांची स्तुती करता करता आजीला धीरही देत होत्या. आता आजीला दागिने उतरवून ठेवावे लागणार. त्यातलं सर्वाधिक महत्त्वाचं मंगळसूत्रही काढावं लागणार.

मंगळसूत्र आजोबांच्या देहावर ठेवण्यात आलं. शुभ्र वस्त्रात देह लपेटायचा होता. त्याआधी अंघोळ घालण्यात आली. लोकांनी तिरडी उचलून खांद्यावर घेतली तेव्हाही आजीनं आकांत केला. ती प्रेतयात्रेच्या मागोमाग निघाली. बायकांनी तिला कसंबसं आवरलं. 'रामनाम सत्य है', म्हणत पुरुष स्मशानाकडे तिरडी घेऊन निघाले.



आजोबांचा बारावा दिवस होता. गावातले सगळे जमले होते. आजोबांच्या आत्म्याला शांती मिळावी म्हणून अनुष्ठान करण्यात आलं. आजोबांना परलोकात आवश्यक त्या वस्तूंची कमतरता पडू नये म्हणून त्याही अर्पण करण्यात आल्या. कोणत्याही पुरुषाच्या सहभागाशिवाय हे आयोजन करावं लागतंय याचं दुःख आजी व मायच्या मनात ठसठसत होतं. घरात या वेळी धाकट्या भावाशिवाय अन्य पुरुषमाणूस कोणीही नव्हतंच. शेवटी या दोघी स्त्रियांनी व्यवस्थितपणे सर्व काही धीरोदात्तपणे पार पाडलं.

आजोबांच्या मृत्यूच्या तिसऱ्या दिवशीच मानुली आजारी पडली. त्यामुळे तिला एखाद्या भुतानं पछाडलं असावं अशी शंका अनेकांना होती. कारण या अल्पावधीत या कुटुंबावर कोसळलेली ही तिसरी आपत्ती, म्हणजे नक्कीच प्रेतबाधा असणार. आजोबांच्या बाराव्याच्या रात्री तर मानुलीचा ताप खूपच वाढला. घरात परिणामकारक औषधही नव्हतं. आजोबाच काय ते जडीबुटींची माहिती ठेवून होते. आता काय करायचं?

शेवटी भगताला बोलावलं. तो आला. डोक्यावर अस्ताव्यस्त केसांचं जंगल. कपडे तेवढे स्वच्छ असले तरी तो विचित्रच दिसत होता. वेगळ्या जगात वावरत असल्यामुळे तंद्रट डोळे. त्यानं मूठभर तांदूळ मागताच माय घेऊन आली. तो मांडा ठोकून बसला. डोळे मिटून एक-एक दाणा चारी दिशांना भिरकावू लागला. क्षणभर कसल्याशा विचारात असेलसं वाटलं. लगेच दुसऱ्याच क्षणी डोळे उघडून तो किंचाळला, "मोठं जबरी भूत आहे! वाडवडिलांपैकीच कोणी तरी रागावलेलं आहे!" भगताचं सर्वांग हलत होतं.

त्याच्या आरड्याओरड्यामुळे मानुली जागी झाली. तिला आता पूर्वीपेक्षा बरंच बरं वाटत होतं, पण अंथरुणावरून उठायचा जीव काही होत नव्हता. ती आता भगताचं बोलणं ऐकू लागली.

"उत्तरेकडे कोणी तुमचे नातलग आहेत का? त्यांनी पितरांना दुखावलंय, कोप ओढवून घेतलाय. त्या गावात जाऊनच शांती करायला हवी. काळ्या रंगाची दोन बोकडं, एक कापड आणि खिचडी द्यायला लागेल." भगत उपाय सांगत होता.

"आम्ही हे सगळं काही करू, पण पोरीला लवकर आराम पडू दे." आजी म्हणत होती.

"भूत तर तिला आता सोडेलच, पण थोड्या वेळात ती बरीसुद्धा होईल. कापड

अन् खिचडी मला आता द्या. बोकड मात्र त्या गावात जाऊन कापायला विसरू नका.'' भगतानं त्याच्या पद्धतीनं प्रश्न सोडवला.

मानुली डोळे मिटून यावर विचार करत राहिली. शाळेत तर सांगतात की भूतप्रेत वगैरे काही नसतं. ही सगळी अंधश्रद्धा आहे. मग हे काय चाललंय? आजीनं तिला जे औषध पाजलं त्यानंच खरा गुण आला, अशी मानुलीची पक्की खात्री होती. बोकड बळी द्यायची बोलणी घरात झाली. माय म्हणाली, ''मी भावाला निरोप धाडते, म्हणजे तो आधी सर्व तयारी करून ठेवेल आणि आम्हाला फार दिवस तिथे राहावं लागणार नाही.''

मायनं मानुलीला सोबत न्यायचं ठरवलं होतं. त्यामुळे मानुलीची शाळा आता बुडणार होती. अशानं आपण अभ्यासात मागं पडू, अशी नवी भीती आता तिला सतावत होती. आजीनं सांगून ठेवलं होतं, ''एवढ्यात काही तू शाळेला जायचं नाहीस. केवढी अशक्त झालीयस! झोपेत बडबडतेससुद्धा!''

मानुलीला शाळेत जायची परवानगी नसली तरी तिला 'रानात आणि शेतात जाऊन काम करू नकोस', असं मात्र कोणीही म्हटलं नाही, हे तिला जरा विचित्रच वाटलं. एके दिवशी अंथरुणावर पडल्या पडल्या ती ऐकत होती. आजी मायजवळ सांगत होती, ''मानुलीचं शाळा शिकणं मला मुळीच पसंत नाही. याचे परिणाम किती भयंकर होऊ शकतात ते माहीत आहेत का? काही काही आत्मे सगळ्या चांगल्या वस्तू नि माणसांवरच डोळा ठेवून असतात. बघितलंस ना परुलीचं कसं झालं ते? केवढ्या थाटामाटात आपण तिचं लग्न लावलं! केवढा चांगला जावई मिळाला! अन् पुढं काय? दुष्ट आत्म्यांनी तिचं आयुष्य मातीत मिळवलं!''

''तुमचं बरोबर आहे सासूबाई.'' माय तिची 'री' ओढत म्हणाली, ''परुलीच्या कपाळी आता आयुष्यभर शुकशुकाट. ना चांगले कपडे ती नेसू शकणार, ना चांगले दागिने अंगावर घालू शकणार. एखादं पोर झालं असतं तरी तिला थोडाफार मान मिळाला असता. पण आता काय?''

''कोणा परपुरुषाबरोबर ती आता बोलूही शकणार नाही. नाही तर लोक तिला वाईट चालीची म्हणतील.'' आजी पुढे बोलत होती, ''कधी कधी मनात येतं की ती मेली असती तर सुटली असती बिचारी!''

मानुलीच्या मनात प्रश्न उभा राहिला, ''आपलं आयुष्यही असंच जाणार का?'' जवळच्या दोन माणसांचे मृत्यू झाल्यानं कुटुंबावर पडलेलं सावट मान्य करूनही शाळेत जायचा विचार काही केल्या तिच्या मनातून जात नव्हता. तो मार्ग सुकर व्हावा यासाठी वडील केव्हा घरी येतात याची ती आतुरतेनं वाट बघत होती.

इकडं आजी सांगत होती, ''मी काही आता मानुलीला शाळेत जाऊ देणार नाही. अलीकडे तर ती देवावरही विश्वास ठेवेनाशी झालीय. भगताच्या सांगण्यावरही तिचा



विश्वास नाही.''

माय म्हणाली, ''पण मला मात्र यांची भीती वाटते. सुट्टी पडल्यावर ते घरी येतील आणि मानूची शाळा बंद केली म्हणून आपल्याला खूप रागावतील.''

आजी म्हणाली, ''असू दे. थोरली मुलगी विधवा झाल्याचं समजल्यावर तो आपोआप ठिकाणावर येईल.''

ऐकता ऐकता मानाच्या डोळ्यांना धारा लागल्या.

बोकडाचा नवस फेडायला माय-लेकी दोघी निघाल्या. आजीनं टिळा लावून आशीर्वाद दिला. गावातील आणखी एक स्त्री सोबत आली. तिचंही माहेर तेच होतं. तिचा एक वर्ष वयाचा मुलगा तिच्या कडेवर होता. मायच्या अंगावर दागिने, चांगले कपडे होते. डोक्यावरच्या टोपलीत फळं आणि मिठाई होती. मानुलीच्या पिशवीत कपडे होते.

सोबत येणाऱ्या बाईच्या हातात 'विंचू गवत' होतं. मानुलीनं त्याबद्दल विचारताच मायनं सांगितलं, ''तिच्या बाळाला कोणाची नजर लागू नये म्हणून.''

मध्ये त्यांना एक गाव लागलं. एक माणूस सामोरा जात मानाकडे बघत म्हणाला, ''ही शाळेत जाते वाटतं? तसेच कपडे घातलेत. मुलींना कशाला तुम्ही शाळेत धाडता हो, ताई? त्यांचं आयुष्य रानात नि शेतातच जायचं. कोयत्यानं गवत नीट कापता आलं म्हणजे झालं. ते डोक्यावर ठेवून घरी आणायचं. मग घरातलं काम करायचं. डोंगराळ भागातल्या मुलीला हे सगळं जमायलाच हवं.''

''तुमचं म्हणणं बरोबर आहे दादा, पण काळ बदलत चाललाय. आमच्या गावात तुमच्यापेक्षा खूप वेगळं आहे. तुमचं हे गाव खूप आतल्या भागात आहे ना, म्हणून इकडं बदल लवकर पोहोचत नाहीत.'' माय सांगत होती.

''तसं नाही काही. आमच्या गावात पण सरकारने उघडलीच आहे की शाळा; पण आमी फकस्त मुलांनाच तिथं पाठवतो. मुलींना?... छ्याऽऽ छ्याऽऽ!'' असं बडबडत तो निघून गेला.

माय त्या गावातल्या कोणालाच ओळखत नसली तरी त्यांनी सांगितलेलं मात्र मन लावून ऐकत होती, ही गोष्ट मानूला अजिबात आवडली नाही. तीही सभोवताली निरखून बघत होती. इथलं निसर्गसौंदर्यही मानूच्या गावाहून खूप वेगळं होतं. डोंगराला थोडे जास्त उतार नि शेतं अगदी छोटी छोटी होती. डोंगरातल्या पायवाटांवरलं गवत कापणाऱ्या बायकांची दमणूकही होत नव्हती. मानूएवढ्या मुली लांब काळे झगे घालून गुरं राखत होत्या. मानुलीचे आगळेवेगळे कपडे बघून त्या धावतच खाली आल्या. एकटक तिच्याकडे बघू लागल्या. मानूनं विचारलं, ''तुम्ही शाळेत नाही जात?''

''शाळा?'' मुली थक्क होऊन एकमेकींकडे बघत, नंतर हसत पुन्हा गुरांकडे

वळल्या. मानुली वेड्यासारखी त्यांच्याकडे बघत विचार करत राहिली, 'का बरं जात नसतील या शाळेत? काय म्हणून घरातली मोठीमोठी कामं त्यांना करावी लागत असतील?' अगदी बेचैन झाली माना. गडबडीने म्हणाली, "माय, आपण घरी परतलो की मी पुन्हा शाळेला जाईन हं!"

"तेवढं मात्र मला आता विचारू नकोस." मायने तिला मध्येच तोडलं.

"मग मध्येच काढून टाकायचं होतं तर शाळेत नावच कशाला घातलंत माझं? माझा निकालही तुला माहीत आहे. एक होतकरू विद्यार्थिनी म्हणून मला शाळेनं गौरवलंय!" मानानं समर्थन सुरूच ठेवलं.

"ते काही मला सांगू नकोस! तुझ्या शाळेबद्दल आता वाद नकोय!" माय करवादली.

"शाळेत मला मुलांपेक्षाही जास्त मार्क मिळतात तरी तुला काही कसं वाटत नाही ग? तुझ्यापेक्षा जास्त त्या मुलांना कळतं. म्हणून तर मला शाबासकी मिळाली की परतताना वाटेत ते मला मारतात." मानू भलतीच नाराज झाली होती.

"सगळ्या दुखण्याचं मूळ तिथंच तर आहे. तू आता लग्नाला आलीस. मुलांबरोबर अशी शाळेला जात राहिलीस तर लोक काय म्हणतील? मग तुझ्यासाठी नवरा कुठनं शोधायचा आम्ही?" मायनं सोक्षमोक्ष लावून टाकला.

चालून आणि नकोसा विषय बोलून दोघी दमल्या होत्या. एका झाडाची सावली बघून त्या बसल्या. मानूने मुद्दा सोडला नाही तो नाहीच. 'तुम्हां सगळ्यांच्या मनात मुलगी म्हटली की लग्नाशिवाय दुसरा काही विचारच येत नाही. मला नकोय ते लग्नबिग्न! खरं म्हणजे विघ्नच ते! परुलीचं बघ कसं झालं! विधवा झाल्यावर तिच्या आयुष्यात इथून पुढं आता काळोखच फक्त."

माय आता संतापली होती. "गप्प बैस मानू! मुलीच्या जातीला कशाला पाहिजेत असे विचार? कमी बोलावं आणि मोठ्या माणसांचं ऐकावं, म्हणजे आपण सगळ्यांना हव्याहव्याशा वाटतो!"

मानुली तिरीमिरीनं काही म्हणणार एवढ्यात सोबत आलेली बाई येऊन पोहोचली. तिच्या बाळासाठी पाणी शोधायला या साऱ्याजणी आणखी थोडं चालत एका झोपडीपाशी पोहोचल्या. एक म्हातारा गुराखी नि त्याची मुलगी तिथं राहत होते. दक्षिणेकडून येणाऱ्या या प्रवाशांना बघून तो म्हणाला, "आत या. नुसतं पाणी कशाला? ताक घ्या की घोटभर. सकाळपासनं तुमच्या पोटात अन्नाचा कण नसेल."

मायनं मग शिदोरीच सोडली. त्या गुराख्याला अन् त्याच्या लेकीलाही थोडं गोडधोड दिलं. तोवर लाकडाच्या भांड्यात ताक आलेलंच होतं. म्हातारा परसदारी जाऊन कांदा-लिंबूही घेऊन आला. मजेनं अंगतपंगत चाललेली असताना म्हातारा माहिती पुरवत होता. खाली पसरलेल्या दरीत त्याचं गाव आहे. दर वर्षी उन्हाळ्यात



मात्र तो गुरांना घेऊन या ठिकाणी येत असतो. त्यामुळे गुरांना हिरवा चारा मिळतो. तो सांगतच होता, "मी आयुष्यभर म्हशीच राखत आलोय. मला रानातलं शांत नि स्वच्छ वातावरणच खूप आवडतं. तरी गावी परतल्यावर गावकऱ्यांबद्दल राग, चिडचिड, द्वेष असं काही माझ्या मनात येत नाही. कदाचित या निर्मळ हवेतच मला बळकट करण्याची मोठी शक्ती असावी. जाऊ दे ताई, माझं बोलणं कधीच संपायचं नाही. किती तरी आठवड्यांनंतर मला एखाद्या माणसाचं दर्शन होतं नि मी बोलत सुटतो. चला आता, नाही तर तुम्हाला खूप उशीर होणार. अजून लांब जायचंय ना?"

त्या निघाल्या. भरपूर डोंगर चढून झाल्यावर खाली जाणारी वाट दिसली. अंधार पडायची वेळ झाली होती. सोबतिणीला तिच्या मुलाची काळजी होती. वाटेत भेटलेल्या एका मुलीनं सांगितलं होतं की या भागात एका नरभक्षक वाघाचा सध्या धुमाकूळ चाललाय. तिनं तिच्या गावातच रात्र काढण्यासंबंधीही सुचवून पाहिलं. यांनी ते मान्य केलं.

गावात अगदीच मोजक्या झोपड्या होत्या. त्या मुलीच्या झोपडीतली जागा चारजणांसाठी पुरणार नाही म्हणून शेजारी व्यवस्था झाली. त्या जातील त्या झोपडीत कोरभर भाकरीचा आग्रह मोठ्या प्रेमानं होत राहिला. झोपायला कांबळं अंथरण्यात आलं. मानुली झोपली त्या झोपडीत आणखी काही मुलं होती. तिनं त्यांना पऱ्यांच्या गोष्टी सांगायला सुरुवात केल्यावर आजूबाजूची चिल्लीपिल्लीही येऊन बसली.

त्या सगळ्यांच्या चेहऱ्यांवरचं कुतूहल बघून मानुलीचा थकवा पार कुठल्या कुठं पळाला. मग तिनं किती तरी उशिरापर्यंत त्यांना कसल्या कसल्या गोष्टी सांगितल्या. ती झोपायला आली त्या वेळी तिच्या कानावर आलेला संवाद तिला चीड आणणारा होता. एक बाई मायच्या कानाशी लागून तिच्या लग्नाचा विषय काढत होती. याच गावातला एक मुलगाही तिने तेवढ्यातल्या तेवढ्यात सुचवला. हे सगळं हाणून पाडून शाळेला कशी सुरुवात करावी या विचारात माना गाढ झोपी गेली.

भल्या पहाटे पुन्हा त्यांची वाटचाल सुरू झाली. एक-दोघींना वाट विचारत मानूच्या आजोळी पोहोचल्या. मायनं आधी मामाला नमस्कार केला. मग आत जाऊन आजीच्या पायांशी वाकून तिनं नमस्कार केला. परुलीच्या नवऱ्याबद्दल आणि आजोबांच्या मृत्यूबाबत तिने सांगताच दोघींना रडू आवरेनासं झालं. मामानं आधी सांत्वन केलं. नंतर विषय बदलावा म्हणून त्यानं मानूबद्दल बोलायला सुरुवात केली.

मानूला ते पहिल्यांदाच बघत होते. सगळे तिचं कोडकौतुक करत होते. मायनं गावातल्या बायका-मुलांमध्ये गोडधोड वाटलं. जुन्या मैत्रिणींशी ती हितगुज करू लागली. मामीनं लाकडी भांड्यात दही आणलं. तिनं मायला नमस्कार करून गळामिठी मारली. सर्व पाहुण्यांनी गूळ नि दह्याचा पाहुणचार स्वीकारला. कालची

पायपीट करून मानू एवढी दमली होती, की बसल्या बसल्या क्षणात आडवी होऊन झोपी गेली. आजीनं तिच्यावर पांघरूण घातलं. मग ती उठल्यावर आजीनं केलेला स्वैपाक त्या भरपेट जेवल्या.

दुसऱ्या दिवशी दोन काळे बोकड बळी द्यायचा विधी पार पडला. थोडं मांस त्याच आवारात भाजून खाल्लं. बाकी इतर गावकऱ्यांमध्ये वाटून टाकलं. तो दिवस गडबडीतच संपला. संध्याकाळी माय नि मानुली अंगणात चटईवर विसावत नाहीत तोच दाट रानाकडून मुलींचा गलका कानी आला. "अस्वल, अस्वल! काळं अस्वल! वाचवा, वाचवा!"

मोठमोठ्यानं आवाज करीत माणसं त्या दिशेला धावली. अचानक गावात दहशतीचं वातावरण निर्माण झालं. म्हाताऱ्याकोताऱ्यांनी लहान मुलांना घरात बोलावून घेतलं.

"लीला जायबंदी झालीय. धावा, धावा," मुली ओरडत होत्या. पाठोपाठ काहीजणींनी एका मुलीला उचलून आणलं. तिच्या वस्त्रांची लक्तरं झालेली होती नि पाठीवर भली मोठी जखम होती. तिला उचलून आणणाऱ्या बायकांच्या कपड्यांवरही रक्त सांडलेलं होतं. रक्त थांबेल असा औषधी झाडपाला जखमेवर वाटून लावला.

ही लीला म्हणजे गावातल्या एका वयोवृद्ध माणसाची सून. ती जराशानं शुद्धीवर येताच वेदनांमुळे जोरजोरात कण्हायला लागली. एका बाईनं ऊन ऊन पाणी आणून तिची जखम धुतली. कोणी तरी तिला थोडी ब्रँडीही पाजली; पण लगेच तिची शुद्ध पुन्हा हरपली. अस्वलामुळे आता रानात जाणं थोडे दिवस तरी शक्य होणार नाही. मग गुरांच्या चाऱ्याची व्यवस्था कशी करायची, या विवंचनेत बायका होत्या. एकजण म्हणाली, "बिचारी लीला! अस्वलानं तिच्या चेहऱ्याची किती दुर्दशा केलीय?"

"ते सोडा. ती जिवानिशी वाचली. रूपाचं काय घेऊन बसलात?" दुसरी म्हणाली. तिसरीने काळजीच्या सुरात सांगितलं, "आता लवकरात लवकर वैद्यबुवांकडे जाऊन तिच्यासाठी औषध आणायची तजवीज करायला हवी. त्यांच्या औषधानं जखमेची खूणही उरणार नाही. मात्र हे सगळं लवकरात लवकर करायला हवं, नाही तर तिला ताप येईल."

एक आजीबाई रागावून म्हणाल्या, "पण असं कसं झालं? रानात अस्वल आहे हे ठाऊक नव्हतं की काय तुम्हाला? अन् ते जवळ आलं तेव्हा त्याला घालवण्यासाठी तुम्ही आरडाओरडा का बरं केला नाही?"

"आम्हाला इथनं निघायलाच मुळी उशीर झाला होता." एका मुलीनं सारी हकीगत सांगायला सुरुवात केली. दूरवर गवत जास्त सापडेल म्हणून आम्ही गेलो. लीला अगदी खालच्य बाजूचं गवत काढत होती. तिथंच अस्वल असणार. ती ओरडली तेव्हा आम्ही पाहिलं. ते अस्वल तिला ओढून नेत होतं. इथं-तिथं सारखे चावेही घेत होतं. आम्ही ओरडून त्याच्यामागे धावलो. एक मोठं लाकूड, एक कोयता असं जे हाती येईल ते त्याला फेकून मारल्यावर त्यानं लीलाचा नाद सोडून आमच्याकडे मोर्चा वळवला. आम्ही आरडाओरडा करून धावाधाव करत त्याचं लक्ष वेधत होतो, तेवढ्यात लीलाला घेऊन तिघी-चौघी एका बाजूला गेल्या. गावातली माणसं काठ्या नि भाले घेऊन येईपर्यंत त्यानं आमचा पिच्छा काही सोडला नव्हता."



सगळ्यांनी आधी नीट लक्ष देऊन ही घटना ऐकून घेतल्यावर लीलाच्या कामांची जबाबदारी आपापसांत वाटून घेतली. एकीनं तिच्या गुरांसाठी चारा आणायचं काम स्वीकारलं, दुसरीनं तिच्या घरातल्या स्वैपाकाचं काम अंगावर घेतलं, तिसरीनं आणखी काय काय. मग रात्र बरीच झाल्यानं सर्वजण घरोघरी परतले. मात्र एकजण लीलाची काळजी घ्यायला, तिला हवं-नको बघायला तिच्यापाशीच रात्रभर थांबली.

या घटनेमुळे हतबद्ध झालेली मानुली सावरली तेव्हा तिनं मनाशी एक खूणगाठ बांधली. आज केवढा बरं महत्त्वाचा धडा ती शिकली होती! तिच्यासारख्या शाळेत न जाणाऱ्या मुलीही केवढ्या शूर नि बुद्धिमान असू शकतात हे तिला नव्यानं उमगलं होतं. अस्वलाच्या हातून त्याची शिकार ओढून आणायची म्हणजे सोपी गोष्ट नाही. स्वतःला अस्वलाच्या तावडीत सापडू न देता आपल्या मैत्रिणीला सुखरूप त्याच्या कचाट्यातून ओढून आणायचं म्हणजे कसलं धाडस ना! शिवाय घायाळ अवस्थेत लीलाला पाठुंगळीला घालून घरापर्यंत आणायचं. धन्य धन्य! आपल्या आयुष्यातही असंच शौर्य अंगी बाणवायला हवंय आपण.

मायला मात्र हे नवीन नव्हतं. तिचं बालपण असल्या घडामोडींत गेलं होतं. दुसऱ्या दिवशी लवकरच परतीच्या वाटेला लागावं असं मायनं ठरवलं होतं. बळी देऊन झाल्यामुळे आता मानाला कोणत्याही भुताखेतानं पछाडायची भीतीही नव्हती. त्यामुळे तिसऱ्या कोणाच्या सोबतीसाठी थांबायची गरज नव्हती. त्या दोघी पहाटेच निघाल्या, कारण अंधारण्यापूर्वी त्यांना घरी पोहोचायचं होतं.

वाटेत एक माणूस एका मुलीच्या मागं धावताना दिसला. ती बापडी परुलीच्या वयाची होती. तो तिला मारायला बघत होता, शिव्यांची लाखोली वाहत होता. गावकरी त्याला थोपवत होते. तो बधेना, तेव्हा त्या मुलीला इतरांनी एका घरात ढकलून बाहेरून दार लावून घेतलं. तो माणूस क्रोधानं वेडापिसा होऊन हात-पाय आपटत होता.

मायनं एका बाईला विचारलं, "काय झालं?"

"काही नाही, त्या मेल्याला एवढ्यातेवढ्यानं लगेच संताप येतो. ती बिचारी याची गुरंढोरं, शेत, स्वयंपाकपाणी, दुखलंखुपलं सर्व निगुतीनं करते... पण हा सारखा तिला मारझोड करत असतो. कंटाळलीय बिच्चारी. माहेरला निघून जायचं म्हणतेय. आम्ही पण तिला त्यासाठी हातभार लावायचं म्हणतोय." त्या बाईनं उत्तर दिलं.

पण मायनं पुन्हा प्रश्न विचारला, "तिच्या माहेरची मंडळी तिला परत घेतील?"

"हो." ती बाई म्हणाली, "तिचा भाऊ कमवता हाये. त्यानं तिला बोलावणं धाडलंय; पण हाच मसण्या तिला जाऊ देईना. ती गेली तर याची कामं तरी कोण करणार? पण तिनं आता जावंच निघून, म्हणजे तरी त्याला समजंल की सुर्व्या उगवल्यापासनं बुडण्यापर्यंत बायकांना केवढाल्ले कष्ट उपसावे लागतात ते!"

त्या दोघींनी पुन्हा आपली वाट धरली. आजोळहून येताना मामांनी खाऊ, कपडे, पैसे दिले होते. मानूला प्रश्न पडला, आपल्याला मिळालेल्या पैशांतून माय पुस्तकं विकत आणून देईल की नाही? संध्याकाळपर्यंत दोघी घरी पोहोचल्या. त्यांना सुखरूप आलेलं पाहून सगळ्यांच्या जिवात जीव आला.

दर दिवशी मानुली शाळेला पाठवावं म्हणून मायची मनधरणी करायची, पण परिणाम शून्यच होता. घरातले सगळे निर्णय आता आजी घेत असे. पुस्तकांकडे लक्ष गेलं की मानुलीला रडायला यायचं. कधी कधी ती उगीचच शाळेचा गणवेश घालून बसायची.

सहा महिन्यांहून अधिक कालावधी लोटल्यावर मानूचे बाबा सुट्टीसाठी घरी आले. आजोबांच्या निधनाची वार्ता त्यांना त्यांच्या कामाच्या जागीच पत्राद्वारे समजलेली होती; पण परुलीबाबत मात्र त्यांना घरी आल्यावर समजलं. परुली त्यांची थोरली लेक होती. तिचं लग्न हे त्या कुटुंबातलं पहिलं मंगलकार्य होतं. तेच अयशस्वी झाल्यानं बाबांना अतीव दुःख झालं होतं. त्यांनी मानूच्या शाळेसंबंधी बोलणी सुरू करताच आजीनं कडाडून विरोध दर्शवला. घरातल्या दोन दुःखद घटनांमुळे आजी खूप दुखावलेली आहे, असा विचार करून मग बाबांनी तो विषय फारसा वाढवला नाही. उलट, आजीचं मन थाऱ्यावर यावं म्हणून त्यांनी तीर्थयात्रेचा नवाच विषय सर्वांपुढे मांडला.

माय म्हणाली, "तुमचं म्हणणं अगदी बरोबर आहे, पण मला वाटतं की परुलीला आधी माहेरी आणायला हवं. पोरीला बघून किती दिवस झाले आहेत!"

बाबांनी विचारलं, "तुला तिची काळजी वाटतेय का? विधवा झाल्यापासून घरातले तिचा छळ करीत असतील असं वाटतंय का? काही हरकत नाही, मी तिला घेऊन येईन."

अखेर बाबा तिला घेऊन आले. परुली विधवा झाल्यानंतर प्रथमच मानुली तिला पाहत होती. पांढऱ्या वस्त्रांमध्ये परुली खूपच सुंदर दिसत होती. तिच्या चेहऱ्यावरील शांत व धीरगंभीर भाव पहिल्यापेक्षाही जास्त गहिरे झाले होते. भांगेत सिंदूर नसला तरी तिच्या शरीराला घाट आणि कमावलेपणा आला होता. चेहऱ्यावर तेज होतं.

रात्री जेवताना बाबांनी आजीला तीर्थयात्रेला घेऊन जायचा विषय काढला. आजीला खूपच आनंद झाला. ती म्हणाली, "तुझं बरोबर आहे बेटा. तीर्थयात्रेला गेल्यावर मी माझे केस काढीन नि मसालेदार पदार्थही वर्ज्य करीन."



परुली हळूच म्हणाली, "आणि माझं काय बाबा?"

अवघ्या एकोणीस वर्षांची परुली. वैधव्य प्राप्त झालेली. लग्नाचे कपडे जेमतेम एकदा अंगावर चढवल्यावर दुसऱ्यांदा ते चढवायचा एखादाही प्रसंग तिच्या आयुष्यात आलेला नव्हता. तिच्या अंगावर प्लॅस्टिकच्या बांगड्या नि काचेच्या मण्यांच्या माळेव्यतिरिक्त दागिना म्हणून नव्हता. या घरातली ही अत्यंत तरुण नात आणि तिची वयोवृद्ध आजी. या दोघींच्याही वाट्याला सुनंसुनं आयुष्य आलं होतं.

माय म्हणाली, "परुलीला हवं तर घेऊन जा तुमच्याबरोबर."

"पण काय वाट्टेल ते झालं तरी तिचे केस मात्र काढायचे नाहीत हं!" एका झटक्यात मानुली म्हणाली. सगळ्यांच्या नजरा तिच्याकडे वळल्या, परंतु तिची नजर मात्र स्थिरपणे विस्तवाकडे एकाग्रपणे लागून होती.

परुली म्हणाली, "केस काढायला माझी काहीच हरकत नाही."

बाबांनी विषय बदलला, "उद्या कपडेबिपडे धुऊन घ्या. मग परवा निघू आपण."

"दक्षिण दिशेला जायला शुक्रवार हा शुभ दिवस." आजीनं सांगितलं.

दुसऱ्या दिवशी आजीनं मानू आणि मायला तिच्या पश्चात घराची काळजी कशी घ्यायला हवी याबद्दल सूचना दिल्या. मानूनं संधी पाहून बाबांकडे शाळेचा विषय काढला. बाबांचंही तेच मत होतं, हे लक्षात आल्यावर ती पुन्हा शाळेला जायची सोय व्हावी म्हणून विनवण्या करायला लागली.

बाबा म्हणाले, "तुझा अभ्यास आता इतर मुलांहून सहा महिने मागे पडलाय. तो तू कसा भरून काढणार? शिवाय तुझ्या वयाच्या इतर मुली काही शाळेला जात नाहीत. एवढ्या मुलांमध्ये आणि तेही एवढ्या लांब जाऊन तू शाळा शिकणार म्हटल्यावर गहजब होईल. गावातले सगळे लोक काय म्हणतील?"

मानू फणकारली, "मला नाहीये पर्वा, कोण काय म्हणतंय त्याची! खरं सांगायचं तर तुम्हालाच माझी पर्वा नाहीय, दुसरं काय? पण मीही आता पुन्हा शाळेला जायला मिळेपर्यंत जेवणार नाही, लक्षात ठेवा!" असं म्हणत मानुली तणतणतच आत गेली नि तिनं अंथरुणावर स्वतःला लोटून दिलं.

मायनं सुचवलं, "जाऊ देत. तुम्ही मानुलीलाही तुमच्या सोबतच घेऊन जा. होय की नाही मानू? बघ तरी किती नवीननवीन गावं, शहरं तुला बघायला मिळतील ते."

अशा रीतीने मानू प्रथमच डोंगराळ भागातून पठारी प्रदेशाच्या वाटेवर आगेकूच करायला निघाली.





प्रवास लांबचा असल्यानं अंथरूण-पांघरूण सोबत घेतल्यावाचून पर्याय नव्हता. काही ठेवणीतले कपडेही पेटीत टाकले. गावातला एकजण ते ओझं घेऊन खालच्या रस्त्यापर्यंत सोडायला आला. परुलीच्या खांद्यावर अडकवलेल्या पिशवीत पितळी ग्लास, गोडधोड पदार्थ आणि थोडं जेवणही होतं. दोघी बहिणी पुढं चालल्या होत्या. मानूला परुलीशी खूप खूप बोलायचं होतं. बाबा आणि आजी धिमेपणानं मागोमाग येत होते. ते रस्त्यावर येऊन पोहोचेपर्यंत पेटी नि वळकटी एस.टी.च्या टपावर जाऊन पडल्या होत्या.

बाबांनी आजीला खिडकीपाशी नि मुलींना मध्ये बसवलं नि स्वतः सीटच्या कडेशी बसले. माणसं किती न् काय काय घेऊन एस.टी.त चढत होती. अवजड सामान, बटाटे नि धान्याची पोती असं केवढं तरी! कंडक्टर घसा फोडून सांगत होता, "टपावर ठेवा, आत कशाला आणताय राव?" पण कसंच काय! शेवटी त्यानं नाद सोडला, डोकी मोजली अन् तिकिटं तपासली. एस.टी.च्या आतल्या गर्दीपेक्षा तिच्या भवताली भरपूर गर्दी होती. कोणाकोणाला सोडायला आलेले कोण कोण. त्यातल्या एक दोघी आयाबाया रडतही होत्या. आजीनं प्रवास सुखाचा व्हावा म्हणून देवाची करुणा भाकली.

एस.टी. निघाली. एस.टी.त विड्या-सिगारेटी नि डिझेलचा दुर्गंधमिश्रित धूर साठत होता. तो सहन होईना तेव्हा परुली नि मानू दोघींनी नाकावर पदर धरला. शरयूच्या काठाकाठानं एस.टी.दक्षिणेकडे निघाली. घाटाची अरुंद वाट. लवथवत्या



शेतांची हिरवळ मनाला सुखावत होती. मध्ये एक बाजाराचा थांबा लागला. झालं! जो तो एस.टी.त शिरायची शर्थ करू लागला. अगदी पाय ठेवायला जागा नाही हे दिसत असूनही आटापिटा करीत एक म्हातारी महामुश्किलीनं एस.टी.त चढली. येण्याजाण्याच्या वाटेतच ती जागा करून बसली. कंडक्टरनं विचारलं, "आजी, कुठं जायचंय?"

"पुढे शहरगाव लागंल, तिथंच उतरव बाबा."

"एक रुपया पन्नास पैसे काढा." कंडक्टर म्हणाला.

"येवढे? येवढे कशे होतील? एक रुपया घे." आजीबाई म्हणाल्या.

"हा काय बाजार हाय का काय, भाव करायला? म्हणे एक रुपया घे! काढा चला दीड रुपया." कंडक्टर वैतागून चिमटा वाजवत म्हणाला.

"आरं, चिडतूस कशापायी, बाबा? तिथं चालत जायला अर्धा तास लागतो अन् तू आपला रुपयाच्या वरती मागतूस? आरं, एक रुपाया कनवटीत यायला लई काम करावं लागतं पोरा." म्हातारी तत्त्वज्ञान सांगत होती; पण तिनं सगळे पैसे देईस्तोवर कंडक्टरनं एस.टी. थांबवून ठेवली.

वाट इतकी वळणावळणाची होती की परुली नि आजी दोघींना उलट्या व्हायला लागल्या. पुढं एस.टी. थांबल्यावर बाबांनी त्यांना हात-तोंड धुवायला पाणी आणून दिलं. बापेगडी चहापाण्यासाठी आजूबाजूला गेले, पण बायाबापड्या मात्र एस.टी.तच बसून होत्या.

मानूला काही मुली दिसल्या. त्या शाळेचा गणवेश घालून एकमेकींचे हात धरून चालल्या होत्या. या ठिकाणी आणखीही बऱ्याचशा एस.टी.गाड्या येत-जात होत्या. अर्ध्या तासानंतर त्यांची एस.टी. तिथून हलली. कोसी नदीच्या काठावरून पुढचा प्रवास सुरू झाला. आता घाटाची वाट रुंदावत चालली होती. मध्येच हिमालयाच्या बर्फाच्छादित पर्वतशृंखलाही नजरेस पडल्या. एस.टी. जसजशी डोंगर उतरून खाली येऊ लागली तसतसं तापमान वाढायला लागलं होतं. मानुलीच्या लक्षात आलं, अरेच्या, इथं अगदी वेगळीच झाडं दिसायला लागलीत की!

चक्क मैदानासारखा भाग सुरू झाला असल्याचंही मानूला जाणवलं. एस.टी. एका मोठ्या शहरात येऊन थांबली. जवळपास डोंगराचा मागमूस नाही. प्रचंड संख्येनं माणसं इतस्ततः फिरत होती. आजी आणि या दोघींच्याही आयुष्यात प्रथमच अशी घटना घडत होती. सगळा जणू भूलभुलैयाच. कुणी फळं विकतंय तर कुणी आणखी कुणाशी पैसे ठरवून त्याचं ओझं वाहून नेतंय. एस.टी., मालमोटारी नि वेगवेगळ्या मोटारगाड्या तऱ्हेतऱ्हेचे आवाज करत वाट काढायचा प्रयत्न करताहेत. त्यात पुन्हा वर सायकल रिक्शाचा अवतार बघून तर मानुलीला हसायलाच आलं.

'मी रिक्शा आणतो.' बाबांचा आवाज अचानक कानी पडल्यावर दोघी भानावर आल्या. मागे वळल्या, तर पगडी नि दाढीवाला एक कसनुसा माणूस तिथं उभा दिसला. का, कोण जाणे; पण त्याच्या डोळ्यांतले भाव बघून मानुलीला कसंसंच वाटलं. बाबा एका रिक्शात सामान ठेवत होते. दुसऱ्या रिक्शात आजी नि या मुली बसणार होत्या.

दोन्ही रिक्शा रेल्वे स्टेशनाजवळच्या एका टुमदार घराशी येऊन थांबल्या. हे घर मामेभावाचं होतं. तो इथल्या एका शाळेत मुख्याध्यापक होता. तो आणि त्याची बायको परुलीच्या लग्नाला आले होते.

घरात शिरल्यावर वहिनीनं 'या, बसा' म्हटलं. या दोघीजणींनी वाकून नमस्कार केला. बाबा खुर्चीवर बसले. आजी नि मुली खाली चटईवर. वहिनी चहा ठेवायला स्वयंपाकघरात जाताक्षणीच मानूही पाठोपाठ आत शिरली. पाहते तो सरपणाशिवाय पेटलेली चूल. न राहवून मानुलीनं चूल चाचपून बघायला हात पुढं करताच वहिनी तटकन् म्हणाली, "चुलीजवळ नको जाऊस. या चुलीची माहिती असल्याशिवाय तिच्याशी लुडबूड करणं धोक्याचं ठरतं."

मानू पुन्हा सगळ्यांमध्ये येऊन बसली. परुलीच्या लग्नावेळी होती तेवढीच तुटक आहे वहिनी अजून... तिच्या मनात येऊन गेलं. वहिनीनं सगळ्यांसाठी कपातून चहा आणला. आजी नि दोघा मुलींना कप धरायला त्रासाचं जात होतं. शेवटी आजीनं ग्लास मागून घेऊन त्यात चहा ओतला; पण मानू नि परुलीला मात्र कपासारख्या आधुनिक वस्तूतून चहा प्यायचा अनुभव घ्यायचा होता. कप धरताना दोघीही खबरदारी घेत होत्या. चहा झाल्यावर बाबा म्हणाले,'तुम्ही आराम करा. मी जरा बाजारात जाऊन येतो."

"पण मी नाही दमले बाबा." मानू तत्परतेनं विचारत होती, "मी येऊ तुमच्याबरोबर?"

"बरं, चल; पण गर्दीत हरवू मात्र नकोस हं!"

रस्त्यावर केवढी तरी गर्दी होती! दुतर्फा दुकानांच्या रांगा, वाहनं नि मध्ये मध्ये वाट काढत हिंडणाऱ्या गायी. मानाला त्या गायींची जरा दयाच आली. या सगळ्या धबडग्यात मानुली सारखी मागं पडायची. तसं पाहिलं तर बाबाही वेगातच चालत होते. पण ती स्वतःही गंमत बघत रमत होती. अशीच एके ठिकाणी कावरेबावरेपणानं मागं वळून पाहते तर मघाचाच तो दाढीवाला विचित्र माणूस पुन्हा दिसला. ती दचकलीच. तेवढ्यात बाबांनी हाक मारली म्हणून ती चटकन त्यांच्या जवळ पोहोचली.

बाबा म्हणाले, "चल, आपण देवळात जाऊ. संध्याकाळच्या आरतीची वेळ



झालीय."

काही बायकासुद्धा नीटनेटके कपडे करून, हातात फुलं- उदबत्ती-कुंकू असलेलं पूजेचं तबक घेऊन देवळाकडे निघाल्या होत्या. बाबांनी माहिती दिली, "या सगळ्याजणी देवळातच निघालेल्या आहेत. शहरात संध्याकाळी देवळात जायची पद्धत असते." मानुलीचं लक्ष त्या बायकांकडेच लागलं होतं. तिला त्यांची भाषा येत असूनही त्या नेमकं कशाबद्दल नि काय बोलत होत्या ते मात्र काही केल्या कळत नव्हतं.

देवळाशी पोहोचेस्तोवर माना दमून गेली होती. बाहेर रिक्शावाल्यांचा गिल्ला चालला होता. ते ओरडून ओरडून गिऱ्हाइकांचं लक्ष वेधून घेत होते. बेवारशी मुलंही इकडून तिकडं फिरत होती. तेवढ्यात तो दाढीवाला आणखी एकदा दिसला.

देवळात शिरताना बाबा म्हणाले, "आज काही तरी आहे वाटतं. देवळात खूपच गर्दी दिसतेय." बाबांनी देवासमोर पैसे ठेवले, हात जोडले. पुजाऱ्यानं त्यांना गंध लावलं, फुलं आणि बत्तासे प्रसाद म्हणून दिले. मानुलीच्या डोक्यावरही एक फूल ठेवून पुजाऱ्यानं आशीर्वाद दिला, "देव तुझं कल्याण करो! तुला मनासारखा नवरा मिळो! तुझ्या पोटी अनेक पुत्र जन्माला येवोत!"

जे नको तेच मानूला ऐकायला मिळत होतं, पण बाबा मात्र ते ऐकून प्रसन्न झालेले दिसले. त्यांनी खुषीत आणखी थोडे पैसे देवासमोर ठेवले. थोडा वेळ ते देवळातच थांबले. परतताना रिक्शानं जावं म्हणून ते थांब्यापाशी येताच रिक्शावाल्यांनी बाबांना पकडण्यासाठी एवढी भाऊगर्दी केली, की मानू मागल्या मागं पार कुठे तरी ढकलली गेली. गडबडीत तिनं बाबांचा म्हणून हात धरला तो कोणी अनोळखी माणूस होता. बाबा नाहीतच. त्यामुळे ती फारच घाबरली. कुठे शोधायचं आता बाबांना? अरे देवा!

चटकन तो दाढीवाला तिच्या समोर येऊन उभा राहिला. म्हणाला, "तुझे बाबा कुठं आहेत ते मला माहीत आहे. मी तुला तिथे नेतो. चल माझ्याबरोबर." मानुलीचा जीव भांड्यात पडला. ती त्या दाढीवाल्यासोबत जाऊ लागली. भरपूर चालून एका बोळात तिला तो आता घेऊन चालला होता. काळोख तर केव्हाच दाटला होता. मानाला काही तरी चुकल्यासारखं वाटायला लागलं. तो म्हणाला, "तुझे बाबा रिक्शानंच गेले असतील. आपणही आता रिक्शानंच जाऊ." त्यानं समोरून येणारी एक रिक्शा थांबवली. तो रिक्शावाल्याला काय म्हणाला ते मानुलीला अजिबात समजलं नाही. दोघं रिक्शात बसले. रिक्शावाल्यानं त्याला हिंदीत विचारलं, "यह लडकी कौन है?"

"मेरी पत्नी है." दाढीवाल्यानं उत्तर दिलं.

"पर यह तो बहुत छोटी है." रिक्शावाल्यानं आश्चर्यानं विचारलं; खुद्द मानुलीलाही

'पत्नी' हा शब्द ऐकल्यापासून पायाखालची जमीन सरकल्यासारखं वाटलं. तिला वाटलं, ओरडावं. रिक्शातून उडी घ्यायचाही तिनं प्रयत्न केला; पण दाढीवाल्यानं घट्ट धरलं. ती ओरडतच होती, "बाबा, तुम्ही कुठं आहात? बाबा, या ना! मला वाचवा ना बाबा! बाबा!" तिच्या आवाजानं आजूबाजूच्या घरांमधली माणसं पटापटा बाहेर येऊन बघत होती.

रस्त्यात एकच गर्दी झाली. मानुलीच्या अंगावरचे कपडे फाटले होते. डोळ्यांतून संताप नि भीती, दोन्हींच्या लाटांमागून लाटा. शेवटी गर्दीमुळे रिक्शाचा वेग मंदावताच तिनं उडी घेतली. दंडावर झालेल्या जखमेतून रक्त यायला लागलं होतं. गर्दीतल्या एकानं रिक्शाचा नंबर टिपावा म्हणून पाहिलं, तर दाढीवाल्यानं नंबरप्लेटवर हात ठेवला. शेवटी रिक्शा व दाढीवाला दोघंही पसार झाले. एकानं तिला पत्ता विचारला. आता तिला काय माहीत? ती मामेभावाचं जेमतेम पूर्ण नाव आणि तो मुख्याध्यापक आहे, एवढंच सांगू शकत होती.

आणखी एकानं वर्णन विचारलं, "ते कुरळे केसवाले, बुटकेसे, तेच का?" मानूनं मानेनेच 'हो' म्हटलं. तो म्हणाला, "मग ते मला माहीत आहेत नि त्यांचं घरही मला माहिती आहे. आमचं नि त्यांचं गाव जवळच आहे... पण इथं मात्र त्यांचं घर गावाच्या अगदी एका बाजूला आहे."

तेवढ्यात दुसरा म्हणाला, "चला तर मग, तुम्हीच पोरीला आता त्यांच्याकडे नेऊन सोडा. चला रे, रिक्शासाठी वर्गणी गोळा करा."

शेवटी एकदाची मानू पुन्हा रिक्शात बसली. आणखी एक अनोळखी माणूस... पण या वेळी मात्र फसगत झाली नव्हती. लांबूनही तिला आपण नेमक्या जागी आलोय हे लक्षात आलं. घराजवळ रिक्शाचा वेग मंद होताच एकदम उडी घेऊन ती धावतच घरात शिरली. त्या माणसाचे आभार मानायचंही भान तिला राहिलं नाही. घरात चिंतातुर बाबांच्या अवतीभवती इतर सगळेजण उभे होते. तिचे बाबा पोलिसात तक्रार नोंदवायला निघणार तेवढ्यात ती पोहोचली होती.

आजी म्हणाली, "देवाची कृपा, पोर सुखरूप परत आली!"

मानूच्या तोंडून सर्व चित्तरकथा ऐकून घरातल्या सर्वांनी सुटकेचा निःश्वास टाकला. परुली तिला घरामागच्या नळापाशी घेऊन गेली. तिथं तिनं तोंड-हात-पाय नि ती जखमही धुतली. बल्बचा चकचकीत उजेड पाहिल्यावर तिच्या मनात आलं, गावात लग्नाच्या वेळी असा उजेड असतो, पण तो पेट्रोमॅक्सचा.

रात्रीची जेवणं झाल्यावर वहिनी म्हणाली, "बाहेरच्या खोलीत दोन पलंग आहेत, तिथं ते दोघं झोपतील. आपण सर्व आतल्या खोलीत झोपू."

आजी म्हणाली, "अर्थातच! पलंगावर बायकांनी थोडंच झोपायचं असतं? आपण आतच जाऊन जमिनीवर अंथरूण घालून झोपणार."



झोपायची तयारी झाल्यावर मानुलीला प्रश्न पडला... या खोलीतही बल्ब आहे, अन् त्याचा केवढा भगभगीत उजेड पडतोय! आता झोप तरी कशी लागणार? तेवढ्यात वहिनीनं भिंतीवरचं एक बटन दाबलं नि जादू झाल्यासारखा अंधार झाला. विजेच्या या नवलाईबद्दल त्या दोघी ऐकून होत्या, पण प्रत्यक्षात आज पहिल्यांदाच सारं अप्रूप बघायला मिळत होतं.

याआधी आणखीही एक नवीन माहिती मानूला मिळाली होती. जेवणं झाल्यावर भांडी घासून ठेवू म्हणून या दोघी बहिणी पुढं झाल्या तेव्हा वहिनीनं सांगितलं होतं, "राहू देत. घरकामासाठी एक मुलगा येतो. तो करील सगळं. मानूला आता जेवल्यानंतर भरपूर विश्रांती मिळाली की झालेल्या घटनेचा तिला विसर पडेल. तुम्ही झोपा आता खुशाल."

अंथरुणाला पाठ टेकल्यावर गप्पा सुरू झाल्या, तसा आजीनं त्या मुलाचा विषय काढला. वहिनीनं सांगितलं, "तो एक गरीब मुलगा आहे. कॉलेजात शिकतो. एका छापखान्यातही दोन तास काम करतो. त्याला मदत म्हणून आम्ही त्याची खायची नि राहायची सोय केलीय. त्या बदल्यात तो धुणी-भांडी, साफसफाई करतो, बाजारहाट करून आणतो. आता मुख्याध्यापकाच्या बायकोनं असली कामं करणं शोभत नाही. आमचं काम झालं की तो त्याचा अभ्यास करायला मोकळा. तसा तो खूप कष्टाळू आहे. पैसे जपून वापरतो, चैनीत उडवत नाही. साठवून गावाकडे पाठवतो."

हे सर्व वर्णन ऐकल्यावर मानाला त्याच्याबद्दल कुतूहल निर्माण झालं. कोण बरं हा मुलगा? शिकायला मिळावं म्हणून एवढे कष्ट घेतो?

अचानक गडगडाट सुरू झाला, जणू डोंगरावरून काही गडगडत आल्यासारखा. त्यामुळे घरालाही हादरे बसू लागले. मानू किंचाळून परुलीला बिलगली. तेवढ्यात वहिनी आली. म्हणाली, "आता काय झालं? विंचू दिसला की काय?"

मानुलीने विचारलं, "हा कसला आवाज आहे?"

'आगगाडीचा. दाखवीन मी सकाळी. झोपा आता.'

मुली एवढ्या भ्यायल्या की कसली झोप अन् कसलं काय! पहाटे पहाटे डोळा लागला.

पहाटे जाग आली तेव्हा तांबडं फुटत होतं. जुन्या पद्धतीनुसार शौचाची जागा घरापासून लांब असावी, या तत्त्वाप्रमाणे सगळेजण रेल्वे लाइनजवळ शौचाला जात असत. त्याप्रमाणे तिकडे घेऊन जाताना वहिनी वाटेत म्हणाली, "आमचा घरमालक आमच्या निजायच्या खोलीमागच्या जागेतच संडास बांधून देणार आहे."

"घरात परसाकडला बसायचं? मी तर अशा घरात राहणारच नाही मुळी!" आजी ठामपणे तिची भूमिका मांडत म्हणाली, "आम्ही तिकडे डोंगरात करतो तसं तुम्ही जमिनीत खड्डा का करत नाही बरं?"

वहिनी ते ऐकून हसायलाच लागली. मानाला वाटलं, छे, काही खरं नाही. शहरात काही आपण फार काळ राहू शकणार नाही. बरं, वहिनी दिवसभर करते तरी काय, हे कोडंही काही केल्या तिला सुटत नव्हतं. नेमकं आजीनं वहिनीला विचारलंच, "तुमच्याकडे शेती नाही, गुरं नाहीत! मग तू दिवसभर करतेस तरी काय?"

"घर नीटनेटकं राहील याची काळजी घेते. स्वयंपाक करते, शेजारणीशी गप्पा मारते. कधी कधी आम्ही सगळ्याजणी सिनेमालासुद्धा जातो, पण चार वाजायच्या आत घरी परत येतो. हे यायचे असतात ना! मग चहा करायचा असतो. हिवाळ्यात आम्ही सगळ्याजणी अंगणात बसतो, ऊन खात नि स्वेटर विणत. थोडंफार शिवणकाम ही करते, पण शिंप्याकडेच बहुतेक वेळा आम्ही कपडे शिवायला टाकतो. कारण नवीन फॅशनचे कपडे त्यालाच जास्त चांगले जमतात ना!"

या साऱ्याजणी परतेस्तोवर त्या तरुण मुलानं चहाचं आधण ठेवलं होतं. तो आता कप पुसत होता. मानुलीच्या मनात आलं, अरे, हा तर देखणा आहे! पुरुषांनी बाहेरच्या खोलीत बसून चहा घेतला. मुलींनी बायकांबरोबर आतल्या खोलीतच चहा घेतला, पण अगदी गप्प राहून.

आजीनं वहिनीला विचारलं, "तुझ्याबद्दल तुझ्या गावातल्या बायकांचं म्हणणं काय आहे?"

"पेरणीच्या वेळी किंवा मक्याची कणसं कापायची वेळ झाली की गावाकडनं मला निरोप येतो. त्यांना मदत हवी असते; पण नवऱ्याला इकडे एकटं सोडून मी कशी जाणार?" वहिनीनं उत्तर दिलं.

मानुलीला ही बाई काही केल्या आवडलीच नव्हती. त्यातनं नवऱ्याचं निमित्त करून आळसात दिवस घालवण्याची तिची पद्धत बघून मानुलीला शहरातल्या एकूणच सर्व बायांबद्दल काहीच वाटेनासं झालं.

तो तरुण मोरीत चहाची भांडी विसळत असताना परुली आणि मानूही त्याला हातभार लावण्यासाठी जागच्या हलल्या. वहिनी आजीला बाहेरच्या खोलीत बाबांकडे घेऊन गेली. मुख्याध्यापक त्यांच्या कामासाठी केव्हाच घराबाहेर पडले होते. मुली एकट्याच दिसल्यावर त्या तरुणानं विचारलं, "तुम्ही पण शाळेत जाता?"

"मी सातवीपर्यंत शिकलेय." मानू म्हणाली, "पुढं आजीनं मला शाळा सोडायला लावली. मला ते अजिबातच आवडलं नाही, पण करणार काय?"

"इथंच राहा ना. आपण एकत्र शिकू." त्या तरुणानं सुचवलं. मानूचा चेहरा लाजेनं लालेलाल झाला. यावर काय उत्तर द्यावं तेच कळेना म्हणून ती वळून परुलीजवळ येऊन बसली. परुली गालातल्या गालात हसली. तेवढ्यात वहिनी आत येत म्हणाली, "तुमचे बाबा रात्रीच्या गाडीची तिकिटं आणायला जाताहेत. तोवर आजींना देवळात नेऊन आणू. हा आपल्यासोबत येईल, म्हणजे रिक्शा शोधायची कटकट नको."



वहिनी नि आजी एका रिक्शात अन् परुली, मानू नि तो तरुण दुसऱ्या रिक्शात बसले. मानुली आता न लाजता त्याच्याशी शाळा, पुस्तकं, शिक्षक आणि आणखी किती तरी विषयांवर भरभरून बोलत होती. परुलीला या विषयांमधलं गम्य नसल्यानं ती दोघांमध्ये मुकाटपणे बसून शहरी जीवनातील आगळ्यावेगळ्या पैलूंचं निरीक्षण करीत होती. तिच्या वडिलांच्या किंवा नवऱ्याच्या गावातल्यासारखं इथे काहीच कसं नव्हतं?

देवळात आजी नि वहिनीनं पूजा केली. माना, परुली नि त्या तरुणानंही हात जोडले नि नंतर ते आपापल्या गप्पागोष्टींकडे पुन्हा वळले. मानूनं त्याला विचारलं, "पुरुषांसारखी पैसे कमावणारी कुणी मुलगी तुमच्या माहितीत आहे का?"

तो म्हणाला, "मी स्वतः भेटलो नाही, पण अशा किती तरी जणी इथे आहेत. अगदी आत्तासुद्धा जवळच्या एका शाळेत हवं तर मी घेऊन चलतो. तिथे मुख्याध्यापिकाही महिलाच आहे. त्या संस्थेत मुली टायपिंग करतात. त्यांना पगार मिळतो. जायचं का आपण ते बघायला?"

आजीनं मान हलवताच पडत्या फळाची आज्ञा घेऊन या साऱ्या त्या संस्थेच्या आवारात दाखल झाल्या. टायपिंग मशिनींचा आवाज कानावर पडत होता. सर्वजणी रंगीत साड्या किंवा सलवार-कमीज घातलेल्या. सगळ्याजणी कामात गढलेल्या. मानू तर हे दृश्य पाहून मंत्रमुग्धच झाली. परुली मध्येच म्हणाली, "मी आतापर्यंत नर्स पाहिलीय पण इस्पितळ नाही पाहिलं. ते आहे का जवळपास?"

"आहे तर. चला, जाऊ या आपण." तो तरुण मानूकडे प्रेमभरानं पाहत म्हणत होता. आता मोठा रस्ता ओलांडून पलीकडं जायचं तर एस.टी. आणि मोटारींच्या अवाढव्य रांगा काही थांबेनात. सवय नसल्यामुळे मानुली एका एस.टी.शी धडकून खालीच पडणार तेवढ्यात त्यानं सावरलंन् की! आयुष्यात पहिल्यांदाच परपुरुषाचा हात हातात धरला होता. तिला धडधडत होतं; पण आवडतही होतं. रस्ता ओलांडल्या क्षणी तिनं हात काढून घेतला. दवाखान्यात पांढऱ्या साडीत ऐटबाजपणे नर्सेस इकडून तिकडं वेगात जात होत्या. पांढरी टोपी, काळे बूट. किती बघू नि किती नको असं परुलीला झालं होतं, पण परतायलाही हवं होतं.

बाबांनी एव्हाना सामानाची बांधाबांधही केली होती. त्या तरुणानं चहा केला. मानू तिथंच स्वयंपाकघरात घोटाळत होती. एकाएकी ती बाबांपाशी येऊन म्हणाली, "मी

इथे मुलींना ऑफिसात अन् दवाखान्यात काम करताना पाहिलंय. मला पण पैसे मिळवायचेत. तुम्ही मला शाळेत पाठवायलाच हवं.''

''मोठ्यांशी नीट वाग.'' आजीनं दरडावून सांगितलं. ''पैसे मिळवून तू काय करणार? लेकीची कमाई खाणं पाप आहे, माहीत आहे ना तुला?''

बाबा म्हणाले, ''पुरुषांच्या बरोबरीनं नोकरी करणाऱ्या मुली अनेकदा संकटात सापडतात.''

तेवढ्यात तो तरुण अचानक म्हणाला, ''मुलीच्या जातीनं घराबाहेर पडून काम करणं चांगलं नव्हे. मी माझ्या बायकोला चुकूनही नोकरी करू देणार नाही.''

त्याच्याबद्दल मानूच्या मनात सुरू झालेली स्वप्नशृंखला क्षणात भंगली. त्याच्या आणि आजीच्या विचारांमध्ये काहीसुद्धा फरक नव्हता. छे! मानू विचार करत दुसऱ्या खोलीत गेली.

रेल्वेगाडीचा प्रवास आणि त्यातूनही बाबांनी झोपायची व्यवस्था असलेल्या जागांची तिकिटं घेतली म्हणून मजेत प्रवास संपला. सामान ठेवायलाही केवढी तरी जागा. गाडी थांबायची त्या स्टेशनावर चहा, फळं विकणारी किती तरी माणसं दिसायची. ते ओरडून चित्रविचित्र आवाजात वस्तूचं नाव घ्यायचे नि लोक आगगाडीच्या खिडक्यांमधूनच बसल्या जागी पैसे देऊन ती वस्तू विकत घ्यायचे. गाडीत काही ठिकाणी बसायच्या जागेवरून प्रवाशांमध्ये भांडणंही चालली होती.

संध्याकाळी खाणं झाल्यावर झोपायच्या आधी विचार करत बसली होती मानुली. काही केल्या त्या तरुणामुळे झालेला अपेक्षाभंग तिला चैन पडू देत नव्हता. माणसं अशीही असतात? केवळ शिक्षण मिळालं म्हणून समज वाढतेच असं नाही, असाच याचा अर्थ. नाही तर शहरातली शिकली-सवरलेली पुरुषमाणसं आणि स्त्रियाही अशा चमत्कारिक वागल्या नसत्या. का बरं इतकी दांभिक अन् पोकळ राहतात ही माणसं? की आपणच या सगळ्यांपेक्षा खूप वेगळ्या आहोत? मानुलीला या नादात कधी झोप लागली ते कळलंसुद्धा नाही. दुसऱ्या दिवशी सकाळी ते गंगातीरावरील एका तीर्थस्थळावर पोहोचले. बाबांनी धर्मशाळेत एक खोली घेतली. ते म्हणाले, ''आपल्याला खूपच सावध असायला हवं. उभ्या देशभरातून इथे यात्रेकरू येतात. सगळीच काही चांगली माणसं नसतात. काहीजण दुष्ट प्रवृत्तीचेही असतात. ते मुलींना किंवा लहान मुलग्यांनाही उचलून नेतात, म्हणून दोघी एकमेकींचा हात धरूनच राहा आणि माझ्या मागेमागेच या.''

''अगदी बरोबर बोलतोयस बेटा.'' आजी म्हणाली, ''एवढ्या गर्दीत चेंगराचेंगरीही होऊ शकते. बरं का ग मुलींनो, लोकांकडे बारकाईने लक्ष असू द्या. साधूसारख्या



दिसणाऱ्यांकडे तर जास्तच लक्ष द्या. कारण काही गुंड-बदमाशही साधूच्या वेशात हिंडत असतात.''

बाबा म्हणाले, ''चला, आता गंगेत स्नान करून न्याहारी उरकून घेऊ.''

आजीने त्याआधी केशवपनाच्या विधीची आठवण देताच बाबा न्हाव्याला आणायला गेले. आजी नि मुलींनी या पवित्र स्नानासाठी मुद्दाम आणलेल्या पांढऱ्या सुती साड्या काखोटीला घेतल्या नि त्या नदीच्या दिशेनं जाणाऱ्या गर्दीत मिसळल्या. आजूबाजूला वेगवेगळ्या भाषा बोलणारी माणसं होती. बाबा लक्षपूर्वक ऐकून सांगत होते, ''हा दक्षिण भारतातला, तो बंगालचा.'' परुलीने मध्येच सुचवलं, ''बायकांच्या साडी नेसायच्या पद्धतीवरूनही ओळखता येईल की!'' बाबांनी देशभरातल्या विविध भाषांमधले त्यांना येत असलेले शब्द नि वाक्यं सांगितली. त्यामुळे मुलींची थोडी करमणूक झाली.

आजी सांगत होती, ''तुमचे आजोबा गावातल्या वडीलधाऱ्या माणसांना सोबत घेऊन एकदा या ठिकाणी आले होते. त्यानंतर ते बऱ्याचदा इथल्या आठवणी सांगत असत. ते नेहमी म्हणायचे, की धर्माच्या एका सूत्रामुळे देशभरातले वेगवेगळी भाषा बोलणारे लोक या ठिकाणी एकत्र येतात, म्हणून याला तीर्थ म्हणायचं. आजोबा शाळा शिकले नसले तरी त्यांना खूप कळायचं. मला आता त्यांची वारंवार आठवण येते.'' आजी उसासा टाकत म्हणत होती.

मानुलीच्या लक्षात एक गोष्ट आली, ती म्हणजे म्हातारपणामुळे आजीच्या चेहऱ्यावर आता सुरकुत्या दाटून आल्या असल्या, तरी आजोबांबद्दल ती बोलायला लागली की तिचा चेहरा जणू चमकायलाच लागतो.

बाबांनी मध्येच तोडलं, ''अग, पण अस्थी कुठं आहेत? तू नेमक्या त्याच आणायला विसरलीस ना?''

''वा रे वा! म्हणे अस्थी विसरली का? तेवढ्याचसाठी आपण आलोय ना इथं आणि मी तेच विसरेन?''

बाबा अस्थिविसर्जनासाठी पंडा (भटजी) घेऊन यावा म्हणून तिकडं गेले. पंड्यानं आजीच्या हातात मूठभर फळं दिली आणि केस कापणाऱ्यासमोर स्टुलावर तिला बसायला सांगितलं. आजी आजोबांच्या आठवणीत हरवली. केस कापून झाल्यावर ते अस्थींवर ठेवले. केस कापणं सुरू असताना पंडा मंत्रोच्चार करत होता. केस कापून झाल्यावर केस कापणाऱ्याला बाबांनी पैसे दिले. सगळेजण घाटाच्या पायऱ्या उतरून पाण्यात स्नानासाठी उतरले. पुरुष व स्त्रियांसाठी वेगवेगळे घाट होते. अंघोळीनंतर पांढरी सुती साडी बदलताना कोणी पाहत नाही ना याकडे आजी नि या दोघींनी काटेकोर लक्ष ठेवलं. अस्थी आणि केस गंगेत विसर्जित केल्यावर आजीनं आजोबांच्या या

शेवटच्या खुणांना शेवटचा नमस्कार केला. त्याच वेळी गंगाजल हातात घेऊन इथून पुढे ती मांस, कांदा, वांगी, लसूण इत्यादी खाणार नाही असा तिनं संकल्प सोडला. त्यानंतर सगळे देवासमोर नैवेद्य दाखवायला देवळात गेले. वाटेत परुलीनं हळूच मानूच्या कानात सांगितलं, "तो बघ, तो निळा पॅण्ट घातलेला मुलगा मघापासून आपला पाठलाग करतोय. आपण आजीजवळ जाऊ म्हणजे तो आपल्या मागं यायचं सोडेल. तसं बाबांनी सांगितलंच आहे, कुठल्याही प्रकारची मदत लागली तर फक्त पोलिसाचीच मदत घ्या."

वाटेत एक म्हातारी ठेच लागून पडली होती. तिला एक पोलीस उभं राहायला मदत करत होता. भोवती बघ्यांची गर्दी झाली. तेवढ्यात मानुलीच्या खांद्यावर कुणी तरी हात ठेवला. वळून बघते तर तोच पॅण्टवाला मुलगा. मानू प्रचंड संतापली. तिनं काडकन त्याच्या मुस्काटात लगावली. त्याच्या गालावर चक्क वळ उठले की! परुलीनंही त्याला खूप शिव्या दिल्या. आत्ता कुठं तो भानावर आला.

भोळ्याभाबड्या गावंढळ पोरी असलं उत्तर देतील हे आधी त्याच्या गावीही नव्हतं. एवढं करून माना शांत बसली नाही. ती कडाडली,"नीघ इथून, नाही तर पोलिसालाच बोलावीन." हा मजनू घाबरला अन् गयावया करायला लागला, "नका बोलावू पोलिसाला. माझी चूक झाली. पुन्हा आयुष्यात मी कुणालाच असा त्रास देणार नाही."

त्याला रागावणाऱ्या दोनजणांना मग मानू म्हणाली, "जाऊ देत त्याला. मूर्ख कुठला! पण आज त्याला जन्माची अद्दल घडलीय एवढं नक्की!" मानूच्या बाबांनी येताना लांबूनच ही चित्तरकथा पाहिली होती. घाईघाईनं धापा टाकत ते जवळ आले तेव्हा त्यांच्या चेहऱ्यावर भीती, चिंता असे संमिश्र भाव होते. त्यांनी मुलींना विचारायला सुरुवात केल्यावर दोघंजण त्यांना म्हणाले, "नशीबवान आहात! स्वतःची काळजी स्वतः घेण्याजोग्या पोरी तुमच्याकडे जन्माला आल्या आहेत."

हे सर्व वर्णन ऐकल्यावर बाबांच्या मनातली चिंता पार कुठल्या कुठं पळाली. एवढंच नव्हे, तर त्यांना आपल्या लेकींबद्दल फार अभिमान वाटू लागला.

दुसऱ्या दिवशी बाजारात हिंडताना परुलीनं अष्टभुजा देवीची मूर्ती विकत घेतली. तिला ती खूप आवडली होती. मानाला मात्र थोर स्त्रियांची चरित्रं वाचायला खूप आवडायचं. इंग्रजांच्या फौजांशी मुकाबला करणाऱ्या झाशीच्या राणीबद्दलचं पुस्तक घ्यावं म्हणून ती पुस्तकांचं दुकान शोधत होती. लांब कुठून तरी लाऊड स्पीकरवरून भाषणाचा आवाज ऐकू येत होता. कुण्या बाईचा आवाज. त्या दिशेनं चालत गेल्यावर खूप गर्दी जमलेली दिसली. एका चौथऱ्यावर उभी राहून एक बाई तावातावानं बोलत होती.



"या पुरुषांना आपण सांगितलं पाहिजे, तुमच्या बायकोला आणि मुलींना पाळीव प्राण्यांसारखं घरातच डांबून ठेवू नका. त्यांनाही तुमच्यासारखंच शाळा-कॉलेजात शिकू द्या. या कसल्या रूढी नि प्रथा, बाईला गुलाम करणाऱ्या? बाप, भाऊ, नातेवाईक, शेजारचे या सर्वांनी का म्हणून मुलींवर बंधनं घालायची? लेकीबाळींना काय वाटतं ते समजून घ्यायला तुम्हा पुरुषांपैकी कुणीच कसं पुढे येत नाही? ज्यांच्या मुली अजून लहान आहेत अशा माता-भगिनींशीही मला बोलायचंय. या मुलींना मुलांसारखेच समान हक्क, समान संधी मिळू द्या. मुलींनाही माझं सांगणं आहे, स्वतःच्या इच्छा आणि महत्त्वाकांक्षा अजिबात चिरडून टाकू नका. तुमचं आयुष्य तुम्हीच घडवायचा तुम्हाला पुरेपूर हक्क आहे. तुमच्या मदतीसाठी मी नेहमीच तत्पर आहे. ज्या कुणाला माझी मदत हवी असेल त्या स्त्रीनं किंवा मुलीनं खुशाल माझ्याशी संपर्क साधावा. तिच्यासाठी जेवढं जास्तीत जास्त जमेल ते मी करीन."

भाषण संपताच माणसं उठून उभी राहिली. बऱ्याच जणांनी तिच्याभोवती कोंडाळं केलं. तिच्या भाषणाचा प्रभाव मानुलीच्या मनावरही झालेला होताच. तिच्याशी दोन शब्द बोलावे असं मानूला खूप वाटत होतं; पण बाबांना धर्मशाळेत लवकर पोहोचायचं होतं म्हणून ते घाई करीत होते. या सगळ्यांना तिथं सुखरूप पोहोचवून बाबा त्यांच्या एका मित्राला भेटायला जाणार होते. मुक्कामी येऊन ठेपल्यावरही मानू एकसारखी विचारातच गढून होती. परुली नि आजी मात्र दिवस कसा छान गेला त्याबद्दल खुषीत बोलत होत्या.

मानाला प्रकर्षानं वाटलं, माझ्या आयुष्याची घडी खुद्द माझ्याच इच्छेनुसार मला कधी बरं बसवता येईल? एका आवेगातच ती म्हणाली,"आजी, चल परत जाऊ. आपलं गावच बरं. शहरातल्या घडामोडींनी माझं मन विटलंय. इथं माणसं पार गर्दीत तरी सापडतात किंवा अगदीच त्याउलट म्हणजे चार भिंतींमध्ये स्वतःला कोंडून घेतात. काय ग हे?"

आजीनं दुजोरा दिला, "बरोबर आहे तुझं, मानुली. शहरी आयुष्य मुळी पुरुषांसाठीच आहे. कारण रूढी-परंपरांच्या कुठल्याच बेड्या त्यांच्यासाठी जणू नाहीतच मुळी. आपल्यासाठी आपलं डोंगराळ भागातलं आयुष्यच बरं म्हणायचं. कष्टाचा बाऊ नसणाऱ्या बाईला उलट तिथंच जास्त स्वातंत्र्य आहे, नाही का?"

"मला एक गोष्ट कळली नाही आजी." मानू विचारत होती, "आपण त्या मुख्याध्यापकांकडे राहिलो होतो. त्यांची बायको एवढी शिकली-सवरलेली, पुन्हा शहरात राहणारी, शिवाय प्रगत वातावरणातली. मग ती घरातच का राहते? नोकरी का करत नाही?"

आजी म्हणाली, "शाळा शिकून तिला वाईट सवयी जडल्यात. मुख्य म्हणजे ती

आळशी झालीय."

मानूनं तिच्या परीनं स्पष्टीकरण मांडलं, "मला वाटतं, तिच्या नवऱ्याचंही चुकतंय. बायकोनं सर्व रीतिरिवाज कटाक्षानं पाळावेत असा त्याचा कल असणार. म्हणून अगदी शोभेच्या बाहुलीसारखीच तिची अवस्था झालीय. मला नाहीच आवडलं ते घर."

"अग, काय बोलतेस? तू म्हणजे दिवसेंदिवस अगोचरच होत चाललीयस! मुलीच्या जातीनं इतकी बडबड करायची नसते अन् असा विचारही करायचा नसतो. सांगितलेलं निमूट ऐकावं. कित्तीदा तेच तेच सांगावं बरं तुला?"

"तूसुद्धा तुझी वायफळ मुक्ताफळं ऐकवून मला गुलाम करू पाहतेस?" मानूचा एकदम पाराच चढला. तेवढ्यात बाबा खोलीत शिरले. जोडे काढून खुर्चीवर बसून राहिले. काही वेळ खोलीतलं वातावरण अगदी चिडीचूप होतं. मग बाबाच उद्वेगानं म्हणाले, "या मुलीच्या चांगल्यासाठी म्हणून जेवढं करावं तेवढी ही जास्तच डोक्यावर बसत चाललीय. आता तर वडीलधाऱ्यांशी आरडाओरडा करून बोलण्यापर्यंत तिची मजल गेलीय!"

खोलीत पुन्हा सामसूम पसरली. मानुलीनं गुन्हाबिन्हा केल्यासारखी परुली तिच्याकडे बघत होती. मानुलीचा चेहरा बघून हिला आता रडू फुटेल असं वाटत होतं; पण ती रडली नाही. हळूच म्हणाली, "मला क्षमा करा बाबा. मी असं वागायला नको होतं. पण तुम्ही मला शाळेत का जाऊ देत नाही? माझं तेवढं एकच तर म्हणणं आहे."

"मला ठाऊक आहे ते," बाबा म्हणाले, "पण तू अजून खूप लहान आहेस. आम्ही काय बोलतो ते आता तुला कळणार नाही. तुला शाळेत जाऊ न देण्याचं एकमेव कारण म्हणजे तुला चांगला शिकला-सवरलेला नवरा मिळायला हवा. तू श्रीमंताच्या घरी पडावीस. घरात गडीमाणसं, सुखसंपत्ती नांदत असेल असं घराणं तुला मिळावं म्हणून आम्ही धडपडतोय अन् आज तर मला त्याच्यात यशही आलंय. मी आज सगळं नीट ठरवलंय."

परुली नि आजीच्या चेहऱ्यावर फिरून उत्साह दिसू लागला. बाबा सांगत होते, "माझा एक मित्र इथं राहतो. त्याचा मुलगा आता एकवीस वर्षांचा झालाय. दोन वर्षांत तो इंजिनियर होईल. मग त्याला एखादी सरकारी नोकरी लागेल. मी त्याच्यासोबत मानूचं लग्न ठरवून आलोय. मानू थोडीफार शिकलेली असल्यानं त्यांनीही आनंदानं होकार दिलाय."

"म्हणजे यांचं वर्षश्राद्ध झाल्या झाल्या हिचं लग्न उरकता येईल. पण एक अडचण मात्र आहे बारीकशी. मधली कमला अजून लग्नाची राहिलीय. तिचं लगीन आधी व्हायला पाहिजे." आजीचं म्हणणं असं होतं.



त्यावरही बाबांनी मार्ग सुचवला, "काही हरकत नाही. माझ्या मित्राचा एक भाचाही लग्नाचा आहे. त्याच्याशी कमलबद्दल बोलणं करू."

आजी जणू सुखाच्या सागरात बुडाली, "देवा, परमेश्वरा, तुझा महिमा खरंच मोठा! तूच आम्हाला हा आनंदाचा दिवस दाखवलास... पण मुलींनो, आपणही देवाला प्रसन्न करण्यासाठी बरंच काय काय केलंय. आधी काळ्या बोकडाचा बळी. नंतर आता आपण यात्रेला आलोय, त्याच्या दर्शनाला आलोय."

बाबा म्हणाले, "या मुलींची जबाबदारी पार पाडली की मग मुलाच्या शिक्षणाकडे नीट लक्ष देता येईल. त्याला मोठं करायला हवं."

"पण बाबा, आजी, मला लग्न करायचं नाहीये. स्वतःच्या पायांवर उभं राहता येईल एवढं शिकायचं मात्र आहे. काहीही करून." मानूनं तिचा दृढनिश्चय सांगितला.

"फालतू बडबड!" बाबा रागावले होते. "हा सगळा त्या भाषण ठोकणाऱ्या बाईचा परिणाम! एवढं चांगलं स्थळ मिळेल असं स्वप्नातसुद्धा वाटलं नव्हतं; पण तू त्या सगळ्यावर पाणी ओतणार!"

"बापाचं कर्तव्य बापानं केलं. तिला एवढं समजावून सांगितलं हेच खूप झालं. आता अजिबात तिचं मत जाणून घ्यायची गरज नाही!" आजीनं बोलून झाल्यावर ग्लासभर पाणी घटाघटा संपवीत राग शांत केला.

थोडा धीर गोळा करीत मानूनं पुन्हा सांगायचा प्रयत्न केला, "बाबा, माझ्या लग्नासाठी भरपूर पैसा खर्च करायचा तुमचा निर्णय झालाच आहे एवीतेवी, तर तोच खर्च तुम्ही माझ्या शिक्षणावर का करायला तयार नाही? एवढं दिलंत तर आयुष्यात मी दुसरं काहीच मागणार नाही तुमच्याकडे. शिकून मी एखाद्या शाळेत शिक्षिका होईन किंवा नर्स, नाही तर एखाद्या ऑफिसात नोकरीला लागेन."

"तुला वाटतंय तेवढं सोपं नाहीये ते." बाबा गंभीरपणे सांगत होते. "तू काही जरी केलंस तरी तुझी जबाबदारी शेवटपर्यंत माझ्यावर राहीलच ना अशानं? मी मेलो की तुझ्या भावाला तुझी जबाबदारी पत्करावी लागेल. त्याच्या डोक्यावर ओझं होऊन राहायची इच्छा आहे का तुझी?"

मानूला उत्तरच सुचलं नाही. काय म्हणावं काहीच कळेना.

बाबांनी पुन्हा तोच मुद्दा मांडला. "तुझ्या भावाकडेसुद्धा मला लक्ष द्यायला हवंय. त्यालाही चांगलं शिकवायला हवंय. याचा तू का बरं विचार करीत नाहीस?"

आता मात्र तिचा बांध फुटला. ती हमसून हमसून रडायला लागली. परुलीला कळेना तिची कशी समजूत काढायची ते. मग तिनं मानुलीला जवळ घेऊन 'उगी उगी' म्हटलं. आजीही मानूच्या केसांतून हात फिरवीत म्हणाली, "अग, आम्ही करतोय ते तुझ्या भल्यासाठीच ना मानू?"

पण मानुलीवर कशाकशाचा म्हणून परिणाम होत नव्हता. किती तरी वेळ ती उरी फुटून रडतच राहिली.

मध्यरात्रीच्या सुमारास परतीचा प्रवास सुरू झाला. आजी आनंदात होती. तिनं झाकण असलेल्या एका छोट्या बादलीत गंगाजल सोबत घेतलं होतं. एका छोट्या टोपलीत प्रसादाचे बत्तासे, फुलं, मिठाया होत्या. हे सर्व गावी गेल्यावर भेटायला येणाऱ्यांना प्रसाद म्हणून वाटायचं होतं. आजीच्या मते तिचं आता सर्व करून झालं होतं. आता तिला कोणत्याही क्षणी मरण आलं तरी चालणार होतं.

मामेभाऊ ऊर्फ 'मुख्याध्यापकसाहेबां'चं शहर वाटेत लागलं. ते स्वतः प्रवासासाठी खाणं घेऊन आले. त्यांच्याबरोबर तो तरुणही आला. बोलला मात्र काहीच नाही. फक्त मागच्या बाजूला उभा राहिला. एस.टी. सुटायच्या वेळेस हळूच मानूजवळ येऊन त्यानं एक कागद गुपचूप तिच्या हातात सारला. कोणाचं लक्ष नव्हतं म्हणून बरं. मानूला घामच फुटला.

एस.टी. निघाली. बरंच अंतर गेल्यावर एका चहाच्या दुकानाशी थांबली. आजीला जरा गरगरल्यासारखं होत होतं, म्हणून बाबा नि परुली तिला बाहेर घेऊन गेले. हीच संधी होती. मानूनं ते पत्र भरभर वाचलं.

तो तिच्या प्रेमात पडला होता. तिची वाट बघत होता. त्याचं शिक्षण संपल्यावर त्याच्या वडिलांना तो मानूच्या वडिलांशी लग्नाचं विचारायला सांगणार, असंही त्यानं लिहिलं होतं. हे सर्व वाचता वाचता मानूच्या गालांचा रंग बदलला. अंगात काही तरी सळसळतंय असं तिला वाटलं. त्यानं मुलींच्या स्वातंत्र्याबद्दलचे बुरसटलेले विचार डोक्यातून काढून टाकले असतील का? असो. आता मात्र हे सर्व निरर्थकच म्हणायचं. आदल्या रात्रीची घटना तिला पुन्हा आठवली. अंगावर शहारा आला.

घरी परतल्यावर सगळे खूष, पण मानू तेवढी चिंता करीत होती. भवितव्याबाबतची काळजी तिचं मन पोखरत होती. दररोज रात्र झाली की घरात तिच्या नि कमलाच्या लग्नाबद्दल संवाद सुरू व्हायचा. कानावर पडेल ते मुकाट्यानं ऐकण्यावाचून गत्यंतरच नव्हतं. तिचं मन जाणणारं या ठिकाणी दुसरं कुणीही नव्हतं.

एके दिवशी सर्वजण प्रवासातल्या आठवणी सांगत असताना मानूनं बाबांना त्या भाषण देणाऱ्या बाईंचं नाव माहीत आहे का म्हणून विचारलं. बाबा म्हणाले, "त्यांचं नाव माहीत नाही, पण त्यांच्या घरातल्यांना मी ओळखतो. आपल्याच जिल्ह्यातल्या ऊंचा गावात त्यांनी एक शाळा सुरू केलीय. त्यात शेतकऱ्यांच्या मुली येऊन शिकतात. अडचणीत असलेल्या इतरही मुली तिथं शिकतात. तिथं राहून, कष्ट करून, अगदी साधेपणानं जगून मुलींना तिथं शिक्षण मिळतं. पण तू का विचारतेस हे सगळं?"



मानुली घाईघाईनं म्हणाली, "सहजच. मलासुद्धा आपण जिथं जिथं हिंडलो-फिरलो, तिथल्या आठवणी येताहेत." तिचं तिच्या मनालाच काय ते माहीत होतं. ती चक्क खोटं बोलली होती. त्याच दिवशी संध्याकाळी तिनं एक पत्र लिहिलं. पत्ता घातला, 'बालिका विद्यालय, ऊंचा गाव, जिल्ह्याचा मागचा भाग."

आजीसाठी औषध आणायला म्हणून एके दिवशी गेली तेव्हा संधी साधून ती टपालपेटीत ते पत्र टाकून आली. त्यानंतर मग प्रत्येक दिवशी वाढत्या प्रमाणात बेचैनी. पत्र मिळालं असेल का? ते वाचलं असेल का? त्याला उत्तर येईल का? ते जर घरात आणखी कुणाच्या हाती लागलं तर पुढं काय होईल? बाबा किती संतापतील? त्यामुळे त्यांनी माझं लग्न अगदीच झटपट उरकून टाकलं तर काय करायचं?.. शंका आणि प्रश्नांचं मोहोळ.

एके दिवशी बाबा आणखी एक म्हैस दुधासाठी हवी म्हणून आणायला बाजारात गेले होते. माय चारा आणायला नि भाऊ शाळेत गेला होता. मानू गायींना रानात सोडून, घर आवरून आता पाण्याला निघाली होती. अर्ध्या वाटेतच पोस्टमन दिसला. तिच्या हातात एक पत्र ठेवत कुत्सितपणे म्हणाला, "म्हंजी, आता तुलाबी पत्रं यायला लागलीत वाटतं?"

"काही नाही, हे एवढं एकच पत्र फक्त!" मानुली कसंबसं म्हणाली.

"आता या घडीला एकच हाय, पर बघता बघता रीघ लागंल! बिनलग्नाच्या पोरीबाळींस्नी असं सोभत न्हाई बघ. न्हाई, मंजी मला ठाऊक हाय, तू चांगल्या घरातली लेक हायेस, पर तरी आपलं!.." पुटपुटत तो निघून गेला.

मानू पाणी घेऊन वेगातच घरी पोहोचली. आजी बारकाईनं तिला न्याहाळते आहे असं तिच्या लक्षात आलं. ती म्हणालीसुद्धा, "मानू, तुझं चालणं अगदी बाप्या मुलांसारखंच व्हायला लागलंय. तुला चांगल्या घरात सून म्हणून राहायचं आहे हे नीट ध्यानात ठेव. बाईच्या जातीनं बाईसारखंच चालावं."

घरात शिरून कसाबसा डोक्यावरचा हंडा ठेवत तिनं 'हुश्श' केलं. तेवढ्यात आजीनं पुन्हा हाकारलं, "बाहेर येऊन बघ ग जरा, समोरच्या पायवाटेवर कोण दिसतंय. काय आता माझे डोळे तरी! अग, तुझे बाबाच येताहेत का?"

"हो, हो, तेच आहेत. मी चहाचं आधण ठेवते!" उत्तर देत मानू आत वळली. आजीनं पुन्हा लांबण लावली, "हो, अशीच वागलीस तर तुला चांगली सून व्हायला जमेल; पण थोडं कपड्यांचंही बघायला हवं. हे जे काय सलवार-कमीज घातलेस त्याच्याऐवजी आता साडीच नेसायला हवी तुला."

कसाबसा राग गिळत मानूनं चहाचं आधण ठेवलं. घरातल्या सर्वांत जास्त बंदिस्त अशा आतल्या खोलीत जाऊन ते पत्र उतावळेपणानं वाचलं. लहानसंच पत्र होतं :

'प्रिय माना, आमच्या या आश्रम परिवारात तुझं हार्दिक स्वागत असो. इथं तुला हव्या त्या कोणत्याही कामाची संपूर्ण जबाबदारी तू अंगावर घेऊन तुझं शिक्षण पुरं करू शकशील. त्यामुळे तुला तुझ्या खर्चासाठी कुणावरही अवलंबून राहावं लागणार नाही. मात्र एक गोष्ट तुला स्पष्टपणे आत्ताच सांगते, ती म्हणजे इथं आम्ही साऱ्याजणी भरपूर श्रम करतो नि खूपच साधेपणानं राहतो.'

मानुलीचा आनंद गगनात मावेना. अजूनही एक अडचण होती ती, हे सर्व बाबांना कसं सांगावं याचीच. आज तर ते म्हैस आणताना खूपच दमलेले असणार. आज काहीच बोलायचं नाही. नाही तरी हल्ली बाबा लगेच चिडतात.

दुसऱ्या दिवशी वातावरणही छान होतं. बाबा अंगणातल्या कठड्यावर बसून म्हशीचं निरीक्षण करत होते. म्हैस दिसायला खूप चांगली होती. शिवाय किंमतही बेताचीच होती. मानू बाबांसमोर सारखी येरझाऱ्या घालत होती. त्या पत्राचा विषय कसा काढावा हा यक्षप्रश्नच होता. तिला हिंमतच होत नव्हती. शेवटी एकदाचं काय होईल ते होईल, म्हणून ती चक्क बाबांच्या पुढ्यात उभी राहिली नि तिनं त्यांच्या हातात ते पत्र ठेवलं.

"हे काय?" बाबांनी विचारलं.

ओठ थरथरत होते, पण शब्द फुटत नव्हते. काही कळत नव्हतं. मग ती धावतच अगदी आतल्या खोलीत गेली. काळीज धडधडत होतं. जणू बाहेरच येईल असं वाटत होतं.





जवळ येणं तर सोडाच, बाबा दुरूनही काहीच बोलले नाहीत. डोळ्यांत प्राण आणून त्यांच्याकडे पाहिलं तर म्हशीला शेताकडे नेताना दिसले. आता काय होणार? लपावं का रानात? मानूच्या मनाची घालमेल चालली होती.

संध्याकाळी मात्र बाबांनी माय नि आजीजवळ आश्रमशाळेच्या पत्राचा विषय काढला. त्या दोघी तर हादरल्याच. तरुण मुलीनं असं घरदार सोडून लांब कुठं तरी एकटीनं जाऊन राहायचं? असं झालंय कधी?

बाबा जरी रागावले नसले तरी त्यांना मानूचा हा उपद्व्याप आवडलाही नव्हता. शाळेसाठी पोरीनं एवढं जंग जंग का पछाडावं याचं त्यांना आकलनच होत नव्हतं. पुढं दोन दिवस घरात सकाळ, संध्याकाळ, रात्रीही एकच एक विषय. या धाडसाबद्दल मानूची पाठ थोपटावी असं परुलीच्या खूप मनात येत होतं; पण तिला ते व्यक्त करायचं धाडस मात्र होत नव्हतं.

बाबा एकदाचे म्हणाले, "जाऊ दे तिला. मला नाही वाटत, ती जास्त दिवस तिथं राहील म्हणून. घर सतत आठवायला लागलं की येईल आपोआप ताळ्यावर. असो. मी आपला माझी सुट्टी संपायच्या आधी तिला तिथं नेऊन सोडीन. मग बघू पुढचं पुढं."

कसला हा आवाज? गोठ्यात गार्यींच्या गळ्यात बांधलेल्या घटांचा आवाज असणार... डोळे उघडता उघडता मानूच्या मनात आलं. नीट जागं व्हायला जरा वेळच लागला. भवतालचं सगळं परकं परकं वाटत होतं. कुठं आहोत आपण? अरे, आपण कालच नाही का इकडं आलो? उजाडायला लागलंय बाहेर. सगळ्याजणी अंथरुणातून बाहेर येताहेत. आपल्यालासुद्धा उठलं पाहिजे.

शिक्षिकाताई खोलीत आल्या. केवढं सुंदर प्रभातगीत म्हणताहेत! किती प्रसन्न वाटतंय! ताईंनी मुलींना म्हटलं, ''काय म्हणतेस लीला? देवी, तू कशी आहेस? काय ग मानू, झोप लागली का नीट?''

''हो ताई इतकी गाढ झोप लागली होती की मी घरात आहे की आश्रमशाळेत तेसुद्धा मला पटकन कळलं नाही!'' मानू चाचरत म्हणाली. ताई छानसं हसल्या नि गेल्या. पण त्यांचं ते गाणं नि इतर मुलींना उठवण्यासाठीच्या हाका थोडा वेळपर्यंत आजूबाजूच्या खोल्यांमधून कानी पडत राहिल्या.

इतर मुलींचं पाहून मानूनंही अंथरूण-पांघरूण आवरून ठरलेल्या जागी व्यवस्थित ठेवलं. किती तरी मुली भराभर कामं उरकत होत्या. काही आळसटलेल्या मुलीही होत्याच म्हणा. ''आता आपण काय करायचं?'' असा प्रश्न मानूच्या मनात येत नाही तोच देवी तिच्या हाताला धरून बाहेर नेत म्हणाली, ''चल माना, आपण दात घासून घेऊ.''

दोघी निघाल्या. लाकडी व्हरांडा, लाकडी जिना संपला नि समोर अंगण दिसलं. खोल्यांमध्ये अजून कंदील पेटत असले तरी बाहेर मात्र एव्हाना स्वच्छ उजाडलं होतं. 'देवी, देवी' असं बऱ्याचदा ऐकल्यानं मानूला आता या नव्या मैत्रिणीचं नाव समजलं होतं. पण गाणाऱ्या ताईंचं नाव मात्र माहीत नव्हतं. तिनं विचारल्यावर देवी म्हणाली, ''त्या इथं शिकवतात. 'विद्यार्थिनी निवासा'ची देखरेखही त्याच करतात. सगळ्या शिक्षिकांना आम्ही 'ताई'च म्हणतो.''

त्यानंतर देवीनं मानूला संडास दाखवला. पाणी घ्यायचा डबा अन् नळही दाखवला. मानू जाऊन आल्यावर बघते तो किती तरी मुली रांग लावून उभ्या होत्या. त्यातल्या काहीजणी दात घासत होत्या. मानूलाही कोणी तरी मातीनं रगडून हात स्वच्छ धू म्हणून सांगितलं. त्यानंतर तिच्या हातावर देवीनं दंतमंजन ठेवलं. मानूने विचारलं, ''हे तू स्वतः बनवलंस?''

देवी म्हणाली, ''हो, गेल्या रविवारीच. आता दोन महिने बघायला नको.''

ताई मानूला म्हणाल्या, ''यात सरसूचं तेल आणि मीठ घातलंय. ते दातांसाठी चांगलं असतं. कोळशाची भुकटी घातलीय, ती मात्र दात पांढरेशुभ्र व्हावेत म्हणून.''

''अय्या! ताई, तुम्ही होय?'' देवी मागे वळली.



''हो. मी खोलीत चाललेय. तुम्ही आता दहा मिनिटांत उरका सगळं. वेळ संपत आलीय.''

मुली घाईघाईनं नळापाशी जमल्या. हिरा नुकतीच संडासातून बाहेर आली होती. बघते तर नळापाशी हे मोठ्ठं कोंडाळ. बाप रे! आता आपलं केव्हा आवरून होणार?.. तिच्या डोळ्यांत चिंता प्रकटली. गोल चेहरा, अपरं नाक, मोठे गाल, आदिवासी छाप असलेला देखणा चेहरा. ती वैतागून बडबडली, ''एवढ्यात कसं आवरून होणार? तीनच संडास नि एकच तर नळ आहे. एवढ्या मुली! यांच्या गर्दीत माझं कधी आवरून होणार? अजून तर माझी वेणीही व्हायचीय. हे सगळं खरं तर यांना समजतंय; पण आदेश देऊन त्या मोकळ्या होणार. भरभर आवरा!'

मानूला मोठं आश्चर्य वाटलं. देवी हिराची समजूत घालत होती. ''तुला उशीर झालाय उठायला, म्हणून! चल, शांत हो अन् आटप पटपट!''

हिरानं आता देवीवर राग काढायला सुरुवात केली, ''काल त्यांनी तुझं कौतुक केलं म्हणून तू आज त्यांची बाजू घे. चल, काही सांगू नकोस तू मला!''

तेवढ्यात देवीनं तिच्यासाठी बादलीत पाणी आणलं होतं. त्या पाण्यानं हिराचं हात-तोंड धुऊन झाल्यावर तिघी एका खोलीत आल्या. ही देवीची खोली होती. देवीनं कपाटातून फणी काढली. ती मानाचे केस विंचरायला लागली. मानाची खोली वर होती. अंगणात एका भिंतीशी फुलझाडं होती. काहीजणी तिथं वेणीफणी करीत होत्या. ही इमारत बरीच मोठी होती. इथली दारं- खिडक्याही गावाकडल्यापेक्षा मोठ्या होत्या.

मानूनं खिडकीतून दरीकडे नजर टाकली. शेतंच शेतं. गहू नि बटाटा लावलेला. मधून झुळझुळणारी एक छोटी नदी. तिच्या दोहो बाजूंच्या चढणीवर मजगी (पायऱ्यापायऱ्यांची शेती) दिसत होती. दूरवर दिसणारं गाव. तिथल्या घरांच्या पांढऱ्या भिंती, उतरती छपरं. वरच्या अंगाला डोंगरमाथ्यापर्यंत चीडच्या वृक्षांचं जंगल.

माना म्हणाली, ''इकडली शेतं आमच्याकडच्या शेतांपेक्षा केवढी तरी मोठी आहेत. जंगलं मात्र आमच्याकडली जास्त चांगली आहेत हं! तिथे चीड फारसं नाही. रुंद पानांची देवदार, बांज, कैल, सुरई, फल्याट अशी किती तरी झाडं आहेत. दाट जंगलं आहेत.'

''हो का? पण माझ्या गावाकडे मात्र अशी शेतं नाहीत. तिथं सफरचंद, प्लम, आडू, खूबानी अशी फळझाडं भरपूर. तिथं घरंसुद्धा लांब लांब अंतरावर बांधलेली आहेत.'' देवीनं तिची माहिती सांगितली.

मानू म्हणाली, ''तू सांगते आहेस ते ऐकल्यामुळे तुझं गाव प्रत्यक्ष बघावंसं वाटायला लागलंय.''

तेवढ्यात घंटा झाली. देवीनं साफसफाई कक्षात जाऊन झाडू आणला. हिवाळ्यात मानूला स्वतःच्या गावी यायचं निमंत्रण देत पुढे देवी माहिती सांगू लागली, "हिरा खूप चांगलीय ग मनानं... पण ती हे असं बोलत असते, म्हणून कोणीही तिला समजून घ्यायला तयार नसतं. तुला माहीत आहे? तिची आई एकदा डोंगरावरचं गवत कापत होती. मुसळधार पाऊस. वरून दरड कोसळलीन् त्याचबरोबर हिची आईसुद्धा गडगडत खाली गेली. गेली ती पावसाळ्यामुळे उधाणलेल्या काळ्या नदीच्या प्रवाहात. तिचं प्रेतसुद्धा हाती लागलं नाही."

"बिच्चारी!" माना पुटपुटली.

"वाईट म्हणजे तिचे बाबाही अशाच पद्धतीनं वारले. देवीला इथं पोहोचवून ते परतत होते. दरड कोसळली. दुसऱ्या दिवशी सरकारी माणसं नि फौजेच्या जवानांनी ढिगारे उपसले तेव्हा त्यांच्या मनगटावरचं घड्याळ चमचमताना दिसलं. आणखी खणलं तर ते हिराचे बाबा आहेत याची खात्री पटली. ते एका शाळेत मुख्याध्यापक होते." देवी आणखी सांगत होती तेवढ्यात किंकाळी ऐकू आली म्हणून ती थांबली.

गोमा ओरडत होती, "देवी, अग, बादली पाण्यात पडलीय. आता काय करू गं?"

देवीनं झाडू तिथल्या तिथं टाकून टाकीच्या दिशेनं धाव घेतली. "गोमा, गोमा, तुला नाही ना काही झालं? हुश्श... मला वाटलं, तूसुद्धा टाकीत पडलीस की काय?" देवीला दम लागला होता.

गोमाची सलवार चिंब झाली होती. ती काठी घेऊन आली. उत्तेजित होत ती सांगू लागली, "देवी, लवकर. चटकन काढ बादली, नाहीतर प्रार्थना संपून जायची तिकडे."

तोवर आरडाओरडा ऐकून आणखी काहीजणी तिथे आल्या. "काय झालं? काय झालं?"

देवी हसत होती. "काही नाही, बादली पाण्यात पडली होती."

इतर मुलीही हसल्या नि पुन्हा आपापल्या कामाला लागल्या. देवीनं त्या बादलीत पाणी भरून घेतलं. आता ती संडास स्वच्छ करू लागली. मानूही तिला मदत करत होती. गोमाला एक लहान बादली दिल्यामुळे तिनं तिची कामं सुरू ठेवली होती.

देवीनं बादलीभर पाणी संडासात जोरात टाकल्यानं एकदम दुर्गंधीचा लोट उठला, मानूनं झटकन नाकावर हात ठेवला. "शीऽऽ! किती घाण वास!"

देवी हसली. "अगं, काय करणार? छोट्या छोट्या मुलींना पाणी नीट टाकायला जमत नाही. मग घाण साठून असा वास तर येतोच. शिवाय ती घाण बायोगॅस प्लांटपर्यंतही पोहोचत नाही ते वेगळंच. खरं म्हणजे प्रत्येकानं स्वतः जाऊन आल्यावर संडास नीट स्वच्छ करायला हवा. शहरात म्हणे संडास साफ करायला माणसं ठेवतात."



मानूला थुंकल्याखेरीज पर्याय राहिला नाही. ती म्हणाली, "हो, तसंच असतं शहरात. आमच्या गावाकडे मात्र असलं काही नाहीये हं. कारण लोक जंगलात तरी जातात किंवा नाल्यापाशी तरी."

देवीनं समजावून सांगितलं, "ते योग्य नाही मानू. त्यामुळेच किती तरी आजार पसरतात बरं."

तेवढ्यात ताई यांचं काम कसं चाललंय ते बघायला आल्या. देवीनं विचारलं, "ताई, नीट झालंय ना सगळं?"

त्या म्हणाल्या, "हो ग! तू मन लावून काम करतेस. आता झाडू नि कुदळी एकत्र करून ठेवून दे हं. प्रार्थनेची वेळ होत आलीय."

इथं वेळेचं महत्त्व कटाक्षानं जोपासलं जातंय हे एव्हाना मानूच्या लक्षात आलं होतं. सगळ्यांनी साबणानं नीट हात-पाय धुऊन शांतिभवनाकडे मोर्चा वळवला. तिथं प्रार्थना होते. तिथं पोहोचेपर्यंत मानू देवीकडून कुतूहल शमवून घेत होती. "बायोगॅस प्लांट म्हणालीस त्याचा आणि संडासाचा काय संबंध?"

"बायोगॅसमुळे स्वयंपाकासाठी इंधन मिळतं, खतही मिळतं. तेच खत आम्ही बागेत वापरतो. त्यामुळे भाज्याही चांगल्या मिळतात."

मानूच्या डोळ्यांसमोर चित्र दिसू लागलं. एवढ्या भयानक दुर्गंधीच्या घाणीचा उपयोग स्वैपाकासाठी आणि ती घाण टोपल्यांमध्ये भरून' डोक्यावरून वाहून, शेतात नेऊन खत म्हणून टाकायची! बाप रे, भलतंच काही तरी आहे हे तर! वॅक्... शीऽऽ! उलटी होणार असं मानूला वाटलं. एकदाचा सोक्षमोक्ष लावून टाकावा तसं तिनं विचारलं, "म्हणजे मलासुद्धा डोक्यावरून ती घाण वाहून न्यावी लागेल?"

शांतिभवन आल्यामुळे संवाद तिथंच खुंटला, देवीला उत्तर द्यायला अवसरच नव्हता. कक्षात उदबत्त्यांचा सुगंध दरवळत होता. गहन, गंभीर वातावरण. मानाही गंभीर झाली. जमिनीवर जाड सतरंजी अंथरलेली होती. तीही देवीच्या शेजारीच मांडी घालून बसली. सत्तर मुली नि शिक्षिका रांगा करून बसल्या होत्या. तिच्या समोरच्या चौरंगावर एक ताई होत्या. त्यांच्यासमोर ठेवलेल्या फुलदाणीत सूर्यमुखी फुलं दिसली. ताईंनी प्रार्थना सुरू केली. सगळ्यांनी त्यात सूर मिसळला.

मानाला ही प्रार्थना नवीन होती. त्यामुळे ती स्वतः न म्हणता निमूटपणे इतर मुलींकडे बघत ऐकत राहिली. प्रार्थना संपल्यावर सगळ्या जणी भोजनकक्षाकडे निघाल्या. तो या कक्षाच्या खालीच होता. तिथंही जाड सतरंज्या होत्या. मानू त्यावर बसली. देवीनं तिचीही थाळी आणली. गावाकडल्या शाळेतली प्रार्थना आठवून मानू या प्रार्थनेची

तुलना तिच्याशी मनोमन करत होती. एका मुलीनं तिच्या थाळीत गरमागरम खिचडी वाढली. न्याहारी संपल्यावर काही कळेना म्हणून माना अंगणात एकटीच उभी होती. इतर मुली कसल्या तरी घाई-गडबडीत दिसत होत्या. त्यांचा गिल्लाही सुरूच होता.

"अवजारप्रमुख कुठं गेली?"

"मला कुदळ हवीय."

"पटपट चला. आमची अवजारं आम्हाला हवी आहेत."

"चला, उशीर होतोय."

आठ वर्षांपेक्षा मोठ्या वयाच्या मुली नि सर्व शिक्षिका कामकाजासाठी उतावळ्या झालेल्या दिसल्या. एवढ्या मुली नि एवढं काम असूनही मानूला प्रचंड एकटेपणा वाटला. आजच्या न्याहारीत तिखट नव्हतंच मुळी नि मसालेही अगदी नावालाच घातले होते. मानूला ती चव अजिबात रुचली नव्हती आणि म्हणून तिला घरची आठवण सतावायला लागली होती.

चौदा वर्षं वयाची अवजारप्रमुख धावत आली. मुलींना "रांगेत उभ्या राहा", म्हणाली. मग दार उघडून आतली अवजारं आणून तिनं ती जिच्या-तिच्या हवाली केली. केवढा आत्मविश्वास होता तिच्या चेहऱ्यावर! मानूला तो जाणवला.

"मला पाच कुदळी, सात कोयते नि तीन फावडी दे", अशा काहीबाही मागण्या चाललेल्या होत्या; पण ती मुलगी न गोंधळता व्यवस्थित वाटप करत होती. एकाएकी ती मानूला खूप आवडायला लागली. देवी तिथंच होती. ती मानूला म्हणाली, "मी आणखी पाचजणींबरोबर खत घेऊन शेतात चाललेय."

"मी येऊ?" मानूनं विचारलं.

"बरं, चल. मग मी सात टोपल्या मागून घेते."

म्हणता म्हणता मानूही गर्दीत सामील झाली. थोड्याच वेळात तिच्याही डोक्यावर देवीनं ठेवलेली एक टोपली होती. त्या गोठ्याकडे निघाल्या. वाटेत मका, पावटा, टोमॅटोची झुडपं दिसली. काही मुली गायींसाठी गवत कापत होत्या. त्यांच्या डाव्या बाजूला टाकी होती. धुणं धुण्यासाठी मोठाले दगड होते. देवी म्हणाली, "हे सगळं आपण वापरायचंय माना."

काही मुली तिथं लोकर धूत होत्या. त्या कामात एवढ्या गर्क झाल्या होत्या की येणाऱ्या-जाणाऱ्यांकडे त्यांचं अजिबात लक्ष नव्हतं. काही मुली सरपणासाठी रानात जात होत्या. मानूच्या लक्षात आलं ते असं, की या सर्वजणी वर्गात शिकताना जेवढं गांभीर्य असतं तेवढ्याच गंभीरतेनं सर्व प्रकारची कामं करताहेत. थोड्याशा पायऱ्या चढून गेल्यावर एक मोठा मजला दिसला. तिथं पेळू नि चरखे ठेवलेले होते. मानूनं विचारलं, "इथं गोठा नाहीय?"



देवी म्हणाली, "ही उद्योगशाळा. इथं आम्ही सूतकताई, विणकाम, शिवणकाम शिकतो. गावाकडल्यासारखीच इथंही खालच्या मजल्यावर गुरं बांधलेली असतात. त्यामुळे गोठा म्हटलं होतं. चल, समोरच्या खड्ड्यांमधून आपल्याला खत घ्यायचं आहे."

मानूला आश्चर्यच वाटलं. "आमच्याकडे तर खत उघड्यावरच असतं."

मानू बघतच राहिली. त्या सर्वांनी भराभर खत टोपल्यांमध्ये भरून एकमेकींच्या मदतीनं टोपल्या डोक्यावर घेतल्या नि त्या शेताकडे चालू पडल्या. मानूला समोरच्या गवतात अजिबात वाट दिसत नव्हती, पण या मुली मात्र त्यांच्या रोजच्या सवयीनं वेगात शेतात जाऊन, खत टाकून परतल्यासुद्धा. त्यानंतर दोन तासांत मानूनंही इतरांएवढं म्हणजे तब्बल दहा टोपल्या खत शेतात नेऊन टाकलं. आता तिच्या मनात आलं, 'एवढं काम जर मी मायसाठी घरी केलं असतं तर तिला किती बरं वाटलं असतं! बिचारी एकटीच केवढं तरी काम उपसत असते. आता कोण मदत करत असेल तिला?' मानूला मायची खूप आठवण आली. मानू आज प्रथमच मायबद्दल एवढा विचार करत होती. मन उदास झालं. सोबतच्या मुलींवरून तिचं मन एकाएकी उडालं. राहवेना म्हणून ती गोठ्यात शिरली. एका वासराजवळ गुपचूप बसून राहिली. तळहातात चेहरा लपवून हमसून हमसून रडली. ते वासरू मोठ्या मोठ्या डोळ्यांनी तिला न्याहाळत होतं. खूप वेळ रडली माना. शांत होतेयशी वाटल्यावर तिनं ओढणीनं डोळे पुसले. आपण रडत असल्याचं कुणालाही कळायला नको याची खबरदारी घ्यायलाच हवी. आत्ता कुठं तिचं लक्ष आजूबाजूला गेलं. अरे, हा गोठा तर आपल्या गोठ्यासारखाच! यात मोठ्ठा फरक म्हणजे सिमेंटच्या पक्क्या जागेवर गुरांची चरायची व्यवस्था आहे. जमीनही सपाट अन् टणक आहे. आपल्याकडच्या गोठ्यातही अशीच रचना करायला हवी, म्हणजे मायला गोठा साफ करायला फार कष्ट उपसावे लागणार नाहीत.

'आपल्या गायी कुठं असतील या वेळी? रानात चरत असतील. अरे हो! देवी म्हणत होती की गुरं रानात चरायला इथल्या मुलीच घेऊन जातात. ते काम माझ्याकडे येईल तेव्हा माझा वर्गातला अभ्यास बुडेल की! मी इथं फक्त शिक्षण एके शिक्षणासाठीच आलेय, असं सांगावं का एकदाचं? मानूच्या मनात असलं काहूर उठलेलं असताना एक मुलगी बछड्याला चारा द्यायला आली. म्हणाली, "हे काय? तू इथे आहेस होय? देवी तुला केव्हाची शोधतेय. सामूहिक कताई चाललीय तिकडं."

मानू तिथं पोहोचली. साऱ्याजणी गात गात पेळूवर लोकर कातत होत्या. एकीनं मानूसाठीही साहित्य आणून तिला शिकवायला सुरुवात केली. मुली ताईंना गोष्ट सांगायचा आग्रह करत होत्या. शेवटी ताईंनी एका शूर महिलेची गाथा सांगितली. तिनं

मोगलांशी संघर्ष केला होता. ताईंच्या कथाकथनाच्या धाटणीमुळे मानाच्या मनातली विषण्णता कुठल्या कुठं पळाली. मुलींनी कातणं कधीच थांबवलं होतं. सगळ्यांचं लक्ष गोष्टीकडेच एकवटलं होतं. कहाणी संपताक्षणी ताई म्हणाल्या, "बाप रे, जेवायची वेळ होऊन पाच मिनिटं झालीसुद्धा! उशीर झाला. जा ग गोमा, जरा घंटा वाजव. चला ग भोजनकक्षात."

भोजनकक्षात मानूला दोन मुलींनी "आमच्यासोबत बैस" म्हटलं. तीही निघाली. मानू आता खूष झाली होती. हे सर्व त्या गोष्टीमुळे घडून आलं होतं. तिला भूक होती ती अशाच गोष्टींची ना!

मुली सतरंज्यांवर रांगेत बसून गाणी म्हणत होत्या. देशभक्तिपर नि लोकगीतंसुद्धा. वेगवेगळ्या भाषांमधली गाणी. या आनंदोल्हासात सामील होत मानानंही सूर लावायचा प्रयत्न उत्स्फूर्तपणे केला.

मुलींचा एक गट जेवायला वाढत होता. शिक्षिकाही मुलींमध्येच बसल्या होत्या. काही पाहुणेही होते. हे म्हणजे पालक. मुलींना भेटायला किंवा सोडायला आलेले. एक शिक्षिका वर्तमानपत्र वाचत होत्या. सर्वांना वाढून झाल्यावर गृहमातेनं म्हटलं, "शांती!" सर्व एकदम निःस्तब्ध झाले. पाचजणी उठल्या. एका विशेष डब्यात मूठ-मूठ तांदळाचे दाणे आळीपाळीनं ओतून आल्या. त्या डब्यावर लिहिलेलं होतं, 'सर्वोदय पात्र'. त्यानंतर सर्वांनी मिळून प्रतिज्ञा म्हटली. स्वतःसाठी नि स्वतःपेक्षाही जास्त गरीब असलेल्यांच्या कल्याणासाठी कष्ट करण्यासंबंधीची प्रतिज्ञा होती ती. मानाला हे सारं नवं होतं. तिच्या घरात कधी असलं काही होत नसे. मात्र तिला ही पद्धत खूपच आवडली. आत्ता मात्र तिला जेवणही आवडलं. इतरांसारखीच तिनंही स्वतःची थाळी घासून ठेवली. अंगणात इतर मुली नि काही शिक्षिका बसल्या होत्या तिथं तीही येऊन बसली. ढगाळ वातावरण दिसत होतं. संध्याकाळपर्यंत पाऊस येईल बहुतेक. पण या वातावरणाचा आनंद प्रत्येकीला घेणं शक्य नव्हतं, कारण काहीजणींकडे स्वयंपाकाची भांडी घासायचं काम होतं. काहींना तिथली फरशी स्वच्छ करायची होती. त्या तिकडे वळल्या.

मानू हे सगळं निरखत तर होतीच, पण शिक्षिकांच्या आपापसातल्या बोलण्याकडेही तिचं लक्ष होतं. शहरात उसळलेल्या जातीय दंगलींबद्दल त्या बोलत होत्या. मानू त्यांना यासंबंधात काही विचारणार एवढ्यात त्यांनी मुलींना 'मीलनसभे'त याची माहिती देणार असल्याचं सांगितलं.

आता 'मीलनसभा' म्हणजे काही तरी शिकायला मिळणार या कल्पनेनं माना सुखावली. यासाठीच तर ती कुठून कुठं, इतक्या लांब आली होती. घंटा झाली. सगळ्याजणी पुन्हा शांतिभवनात जमल्या. आधी सरस्वतीवंदना झाली, त्यानंतर हजेरी.



ताईंनी रजिस्टर बघून एकेकीचं नाव पुकारलं की त्या मुलीनं 'ओम' म्हणायचं. मानवतीचं नावही ओघानं पुकारलं गेलंच, आणि तिनं या आश्रमशाळेतल्या तिच्या उपस्थितीची 'ओम' म्हणून कबुली दिली.

एका शिक्षिकेनं वर्तमानपत्रातल्या महत्त्वाच्या बातम्यांचं जाहीर वाचन केलं. त्यात हिंदू-मुस्लीम दंग्यांबद्दलची वार्ता होती. या शिक्षिकेनं सकाळची हकीगतही सांगितली. त्या रेशन घ्यायला शहरात गेल्या होत्या तेव्हा या बातम्या लोक रेडिओ लावून ऐकत होते. दुसऱ्या शिक्षिकेनं माहिती पुरवली, "तीसजण मेले आणि शेकडो जखमी झाले. ही घटना इथून सुमारे तीनशे कि. मी. अंतरावरील एका शहरात घडली आहे."

"का होतात या दंगली?" एका मुलीनं विचारलं.

"कारण हा महिना रमजानचा आहे. मुस्लिमांसाठी अतिशय पवित्र..."

"ते तर आम्हालाही माहिती आहे, ताई." एका मुलीनं नेमक्या विषयाकडं शिक्षिकेला वळवायचा प्रयत्न केला. मग ताई म्हणाल्या, "शेकडो मुस्लीम बांधव या खास नमाजासाठी मोठ्या मशिदीत जमले होते. नमाज संपल्यावर बाहेर निघतात तो पायऱ्यांवर एक डुक्कर जखमी अवस्थेत पडलेलं होतं. ते पाहून हे सारे बिथरले. एखाद्या हिंदू माणसाचंच हे कृत्य असणार अशा भूमिकेतून ठिणगी पेटली आणि हां हां म्हणता त्याचं रूपांतर प्रचंड दंगलीत झालं."

एक मुलगी म्हणाली, "एवढी मोठमोठी माणसंसुद्धा विचार न करता गैरसमजाला किती सहजपणे बळी पडतात, वेडेपणा करतात. हे सगळंच लाजिरवाणं आहे असं नाही वाटत?" चर्चा रंगू लागली. यातून समाज आणि व्यवस्था याबद्दल अनौपचारिक शिक्षण चाललेलं होतं. मानूला हे सारं खूप वेधक वाटलं. अभ्यासाची ही पद्धत तिच्या पूर्वीच्या शाळेपेक्षा किती अनोखी होती, नाही? पूर्वीच्या शाळेत तर धडा किंवा शिक्षकांनी जे काय सांगितलं असेल ते पाठ करावं लागायचं. प्रश्न विचारायचा प्रयत्न कोणीही करत नसे.

मीलनसभा संपल्यावर सर्व मुली आपापल्या वर्गांत गेल्या. काही वर्ग खोल्यांमध्ये होते तर काही चक्क झाडाखाली. मोकळ्या वातावरणात. मानूला हे सारं एकदम आवडलंच.

मानूची चाचणी घेऊन तिला नवव्या इयत्तेत बसायची परवानगी देण्यात आली. वर्गशिक्षिका ताईंनी तिला सल्ला दिला, की मागचा अभ्यास भरून काढण्यासाठी तिला खूप अभ्यास करायला हवा आहे. यासाठी कधीही काहीही अडलं तर ताई हवा तेवढा वेळ द्यायला तयार आहेत. हे ऐकल्यावर मानूला अतोनात बरं वाटलं.

मानूच्या वर्गात कितीजणी होत्या? जेमतेम सातजणी. त्यामुळे ताईंना सगळ्यांकडे लक्ष देता येई. शिकवणाऱ्या ताईसुद्धा मुलींमध्ये येऊन तशाच एका आसनावर

बसल्या तेव्हा तर माना थक्कच झाली. 'अरेच्या! किती जवळ बसल्याहेत, नि हातात छडीसुद्धा नाही! कमाल आहे!' मानाच्या मनात विचार चालू होते. ताई आपल्याला रागावतील, आपल्याला काही येत नाहीय, अशी हुरहूर तिच्या मनाला लागली. वर्गात तीच एकटी कावरीबावरी दिसत होती. तशात ताईंनी अर्थशास्त्र हा विषय सुरू केला. हा तर मानूचा अगदीच नावडता विषय.

त्यानंतर गृहशास्त्राच्या शिक्षिका आल्या. विद्यार्थिनी निवास नि भोजनगृहाची देखरेखही या ताईंकडेच होती. त्याआधी मानूला असं वाटलं होतं, की या ताईंना फक्त स्वयंपाकच चांगला करता येतो; पण त्यांना एवढं छान शिकवता येतं हे बघून ती चकितच झाली. सगळेच विषय तिला हळूहळू आवडू लागले. सगळे विषय इतके सोपे होऊ शकतात हे तिला प्रथमच कळत होतं.

एकाएकी वर्गातल्या एकजात सर्व मुली उठल्या नि शेताकडे धावत सुटल्या, "पळा... पळा!" मानू चक्रावलीच. हे आता काय नवीन? त्या धावत होत्या नि त्यांच्या सोबत श्यामू कुत्राही जोरजोरात भुंकत धावत होता. त्यांच्या ओरडण्यातून हळूहळू मानूला बोध झाला, की भाजी लावलीय त्याच्या जवळपासच्या शेतांमध्ये माकडांची पलटण अवतरलीय. त्यांना हुसकून लावण्यासाठी हा आकांत चाललाय. काही मुलींनी माकडांवर दगड भिरकावले. श्यामू त्याच्या परीनं मन लावून भुंकला नि एकदाची ती माकडं सळो की पळो झाल्यानं नाहीशी झाली. जाता जाता माकडं तोंडात भोपळा, मुळा असा मिळेल त्याचा तोबरा भरत उड्या मारत होती. तेवढ्यात एका माकडाच्या हातून भोपळा निसटला तो एका मुलीनं झपकन पकडला.

माना आपली अंगणात उभी राहून ते विलोभनीय दृश्य बघतच राहिली. माकडांच्या फौजेला परतवून मुलींची फौज पुन्हा एकदाची वर्गात येऊन बसली. खरं तर सुटीची वेळ होत आली होती तरी ताई त्यांना मातीची माहिती सांगू लागल्या. मुली मात्र सकाळी शेतात खत घालायला गेल्या होत्या म्हणून त्याबद्दलचे प्रश्न डोक्यात घोळवत होत्या. एकीनं विचारलं, "शेण, काडीकचरा, पालापाचोळा यांचं खत कसं बरं तयार होतं ताई?"

तेवढ्यात दुसरीचा प्रश्न, "खतामुळे मातीला नेमकं काय मिळतं?"

मानावर पुन्हा थक्क व्हायची पाळी आली होती. कारण मातीचा विषय सांगायला बसलेल्या बाईंनी त्रागा न करता मुलींना हवी ती माहिती द्यायला सुरुवात केली होती. त्यात सवाल-जवाबांच्या फैरी झडत होत्या. गलका असला तरी गंमतही भरपूर होती. तेवढ्यात घंटा झाली नि ताईंनी जाता जाता उद्याचा कार्यक्रम सांगितला. उद्या त्या प्रत्यक्ष खताच्या खड्ड्याभोवती सगळ्यांना उभं करून सविस्तर माहिती देणार होत्या.

दिवस कलला होता. मुलींचा एक गट रात्रीच्या स्वयंपाकाची तजवीज करण्यात



गुंतला होता. बाकी सर्व मुली काही लिहीत होत्या, वाचत होत्या. खरं म्हणजे या वेळी मुलींना स्वतःच्या मनाप्रमाणं काहीही करायचं स्वातंत्र्य होतं. माना तिच्या खोलीतल्या खिडकीत बसून परतणाऱ्या गायी-शेळ्यांकडे बघत होती. मागोमाग गुराखी होता. खांद्यावर काळं कांबळं नि कुऱ्हाड. त्याच्या मागं आश्रमशाळेतल्या दोन मुली. त्यांच्या खांद्यावर वह्या-पुस्तकांनी भरलेलं दप्तर. मानाला हसू आलं. रानात गुरं चारायला जाताना याचा काय उपयोग?.. पण क्षणात तिच्या मनात दुसरा विचार आला आणि ती गंभीर झाली... न जाणो, गुरं चरायला सोडल्यावर या आपापला अभ्यास करत असतील. आपल्याला हे सुचलं असतं तर आपणही असंच केलं असतं. मग शाळा बुडली तरी अभ्यास बुडला नसता. तिचं लक्ष एका काळ्या गायीकडे गेलं. अशीच एक गाय तिच्या घरीही आहेच. झालं, मानूचा जीव पुन्हा घरच्या आठवणीत बुडाला... कोण आपल्याकडल्या गायी चरायला नेत असणार? बहुधा परुलीच. ती आता गायी घेऊन परतत असेल. मायसुद्धा डोक्यावर वैरण घेऊन घराकडे निघाली असणार. आजीनं सगळ्यांसाठी चहा ठेवला असेल. भाऊ कुठं असेल? शेजारच्या मुलांबरोबर हुंदडत असेल... आठवणींचे तरंगांमागून तरंग. तिला वाटलं, आपल्याला पंख असते तर चटकन घरी जाऊन आलो असतो. बाहेर पाहिलं तर वातावरण बदललेलं. तिकडं ढग, इकडं हिचे डोळे डबडबून आलेले. अंथरूण उचलून इकडचं तिकडं पसरलं. पुन्हा त्याची अदलाबदल केली. रडणं थांबवायचा अट्टहास; पण ते काय थांबतं थोडंच? केविलवाणी होऊन दूरवर बघते तर छोट्या सरींच्या मोठमोठ्या मुसळधारा होत चाललेल्या. तो जणू पिंजराच झाला हिच्या लेखी. या पिंजऱ्यात आपण कसे दिवस काढायचे? डोक्यावरनं कांबळं घेऊन ती मुसमुसत राहिली. नकळत तिला झोपही लागली.

"ऊठ माना, ऊठ. दोन घास खाऊन घे." देवी तिला हलवून जागं करत होती.

"सकाळ झाली?" गोंधळून मानूनं विचारलं.

"नाही. रात्रच आहे. तू जेवायला आली नाहीस. खूप दमलीस बहुतेक. किती गाढ झोपली होतीस? हे बघ, मी तुझं जेवण इथंच आणलंय. तोंड-हात धू नि खाऊन घे पटकन. हा घे तांब्या आणि थाळी तशीच राहू दे. मी घासेन. तू जेवून शांत झोप पुन्हा."

देवी तिला मायेनं सांगत होती. तिनं भाजी, भाकरी, दही, गूळ असं सगळं आणलं होतं. जेवता जेवता मानू नीट जागी होत गेली. देवीनं खोलीबाहेर पडताना सांगितलं, "हो, एक राहिलंच. ताईंनी संध्याकाळच्या प्रार्थनेच्या वेळी ठरवलंय की तू आता माझ्याच गटात राहणार."

एवढ्या मोठ्या खोलीत माना एकटीच. अजून कुणी येणार आहे की नाही इकडं

झोपायला? घरी आपण परुलीजवळ झोपायचो. इथं शिकवतात छान, पण कामं तरी किती नि कुठली कुठली? यासाठी नव्हतो आपण एवढ्या लांब आलो. बाबा म्हणलेच होते, घरची खूप आठवण येईल म्हणून. त्या दिवशी निरोप घेताना आश्रमशाळेच्या दाराशी त्यांनी तिला पुन्हा एकदा सांगितलं, "तू इथे यायचा हट्ट धरलास खरं माना, पण ही शाळा काही तेवढीशी चांगली नाही. मी माहिती मिळवलीय. त्यातनं मला असं समजलंय की इथं अफाट कष्टाची कामं प्रत्येकीला करावी लागतात. त्यातच भरपूर वेळ जातो. तुझ्या डोक्यात जी शिकायची कल्पना आहे तसं शिकायला इथं फारच अपुरा वेळ दिला जातो. बघ, काय ते ठरव. तुझी चूक तुझ्या लक्षात आली नि परत यावंसं वाटलं तर लगेच पत्र लिही. पोस्टाचं एक पाकीट आपल्या घरचा पत्ता लिहून मी तुझ्या पुस्तकात ठेवलंय. तुला इथं करमणार नाही याची मला तरी खात्री वाटतेय. तुझं पत्र आलं की तुला परत न्यायची व्यवस्था ताबडतोब करीन. शेवटी मुलीची योग्य जागा ही घरातच."

मानाला वाटलं, ते पाकीट काढावं. त्यात घाईघाईनं एक पत्र लिहून घालावं आणि पाठवावं... पण 'इथे येऊन तू चूक केली आहेस... शेवटी मुलीची योग्य जागा ही घरातच!' यासारखे शब्द तिला डाचत होते, ठुसठुसायला लावत होते. आपण जर अशा पद्धतीनं परत गेलो तर तत्काळ आपल्या लग्नाचा कार्यक्रम ही मंडळी हाती घेतील. मग इतर सगळ्या बायकांसारखंच शेत, घर, धुणी, भांडी, चारा, मुलंबाळं... छे छे! आपल्याला नाही जमायचं ते. आपण शिकायचंच. आपल्या पायांवर उभं राहायचं. जग बघायचं. उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत कुठं कुठं हिंडायचं... पण हे साधायचं तरी कसं? कारण त्यासाठी पदवीपर्यंत शिक्षण घ्यायला हवं, अन् इथं तर धड अजिबात वेळ मिळत नाही तशा अभ्यासाला. काय करावं बरं?... प्रश्नोपप्रश्नांच्या तंद्रीत तिला पुन्हा झोप लागली.

दुसऱ्या दिवशी सकाळी देवीनं मानूलाही इतर मुलींसोबत लवकर उठवलं. तोंड धुऊन इतरांसारखीच मानूही स्वाध्यायाला बसली. तासभर स्वाध्याय झाल्यावर तिला खूपच समाधान वाटलं. मग देवीनं लहान मुलींची वेणी घालायचं काम तिच्यावर टाकलं. एके दिवशी देवीची गटसहायिका आजारी पडली म्हणून तिची जागा मानूनं घेतली. त्या दिवशी संध्याकाळी प्रार्थनेनंतरच्या बैठकीत गटाचा अहवाल सादर करताना देवीनं मानू अतिशय कष्टाळू असल्याचं जाहीरपणे सांगितलं. मानाला आता आयुष्य दिवसेंदिवस जास्त जास्त सोपं वाटायला लागलं. दर दिवशी संध्याकाळी ती ते पोस्टाचं पाकीट हातात घ्यायची नि मनाशी म्हणायची, आजचा दिवस तर कालच्यापेक्षाही खूपच चांगला गेलाय. आणि ते पाकीट पुन्हा दप्तरात जाऊन बसायचं.



मानाला इथं येऊन आज दहा दिवस झाले होते. तिला मोठं प्रसन्न वाटत होतं. सकाळचं कोवळं ऊन स्वतःचं नि दरीचंही रूप पालटत घटकेघटकेला वेगळंच वाटत होतं. गेले तीन दिवस झालेल्या संततधार पावसामुळे ठिकठिकाणी डबकी साचली होती. नदी दुथडी भरून वाहत होती. तिचा आवाज लांबपर्यंत ऐकायला येत होता.

मानूच्या एका हातात कुदळ, दुसऱ्या हातात फावडं. नजर शेताकडे भाजीपाल्याच्या मळ्याकडे. वाफे नाहीसे होऊन चिखलच चिखल दिसतोय. आता याची उस्तवार करायला हवी. विद्यार्थिनी निवासाच्या भिंतीतही केवढी ओल साठलीय! तो वास भरून राहिलाय सगळ्या खोल्यांमध्ये. मानू आणि तिच्या मैत्रिणी माती नि दगडांशी भिडल्या. माना खणत होती. इतरजणी गाळ टोपलीत भरून घेऊन जात होत्या. खूपच अंगमेहनतीचं काम. घामाच्या धारा वाहू लागल्या; पण काम संपेस्तोवर एकजणही उसंत घ्यायला तयार नव्हती.

हुश्शऽऽऽ! संपलं एकदाचं! माना नकळतपणे गुणगुणायला लागली,

'हिरवं हिरवं गवत नि निळं निळं आभाळ
कोण याचा कर्ता नि कोण राखणदार?'

काम संपल्याच्या जाणिवेनं सगळ्याजणी मनमोकळं हसल्या. जिला पाहावं तिची कोपरं-ढोपरं चिखलात बरबटलेली. एकमेकींची चेष्टा करत, कुदळ-फावडं जागच्या जागी ठेवून त्या अंघोळीला पळाल्या. हात-पाय धुताधुताच मानू मोठ्यांदा ओरडली, "जळू- जळू...! माझं रक्त काढत्येय! चिकटली... निघत नाहीये पहा! आई ग... ए, काढ न तिला." मानू जोरजोरात पाय आपटायला लागली.

"ए मानू, अशानं नाही निघणार ती. थांब." असं म्हणत लीलाने गवत हातात घेऊन, ते रगडून जळू सोडवली. म्हणाली, "बघ, किती रक्त प्यायलीय ही! लठ्ठ झालीय अगदी!"

मानूच्या पायातनं रक्त वाहतच होतं. तिनं त्याच्यावर कागदाचा कपटा चिकटवला.

गोमा म्हणाली, "या जळवा किनई आपल्यापेक्षा गायींना खूपच त्रास देतात. त्यांच्या नाकपुडीत शिरून किती किती आठवडे, किती महिन्यांपर्यंत रक्त पीत राहतात."

लीलानं दुजोरा दिला, "हो ना. बिचाऱ्या हैराण झालेल्या गायी मग शिंकतात. नाक घासतात, खूप अशक्त होऊन जातात. कधी कधी त्यांच्या नाकातनं रक्तसुद्धा वाहतं."

"पण आम्हाला काढता येतात गायीच्या नाकात शिरलेल्या जळवा!" गोमानं सांगितलं. अंघोळी आटपून या परतल्या तरी मानूच्या पायातलं रक्त वाहायचं थांबत

नव्हतं. लीलानं सुचवलं, 'कागदानं नाही ग काही व्हायचं. तू तिथं लोकर ठेव."

एकाएकी दगड घरंगळावेत तसा आवाज झाला. गोमा ओरडली, "आपल्या शेतातला बंधारा कोसळतोय बघ तिकडं!" खरोखरच सहा फुटी दगडी बंधारा ढासळून पडला होता. पाटाच्या पाण्याबरोबर माती वाहून जात होती.

"देवा रे! आपण तिथंच केवढं तरी खत नेऊन टाकलं होतं. सगळी मेहनत पाण्यात गेली. आता तो बंधारा पुन्हा होता तसा करायला हवा."

"डोंगराळ भागात राहणाऱ्या आपल्यासारख्यांच्या वाट्याला हे असंच येत राहणार!" मानू म्हणाली.

लीलानं त्यात भर घातली, "रस्तासुद्धा अडलाय. त्यामुळे एस.टी. गाड्या थांबल्याहेत. रस्त्याचं काम चाललंय तिकडं."

गोमानं पुस्ती जोडली, "हो, ताई सांगत होत्या मघाशी. आपण सगळ्या ताईंबरोबर तिथंच चाललोय."

"मग मी चटकन कपडे बदलते. थांब." माना.

रविवार असल्यानं एकजात सगळ्याच खुषीत होत्या. बाजारातून डाळ, तांदूळ, बटाटे आणायला जायचं होतं. सलवारला रक्ताचे डाग दिसत होते म्हणून मानूनं सलवार बदलली, मग कुर्ताही बदलला. तेल लावून केस विंचरले. दोन वेण्या घालून रिबन बांधली, रबरी चपला घातल्या आणि मानाबाई बाहेर निघायला एकदम 'तय्यार' झाल्या.

ताई म्हणाल्या, "आपण आत्ताच निघायला हवं. नऊ किलोमीटर जंगलातनं. नंतर पक्का रस्ता लागेल. पोहोचेस्तोवर ऊन वाढेल. चला, निघू."

माना म्हणाली, "कुणास ठाऊक, ढग आले तर ऊन जाणवणारसुद्धा नाही."

"शक्य आहे." ताईंनी मान हालवली.

निघाल्या सर्वजणी उतारावरल्या पायवाटेनं. गप्पागोष्टी, चेष्टा-मस्करीला उधाण आलेलं. माना एकाएकी झपझप पावलं टाकत एकटीच पुढं निघून आली... रानपाखरांचे वेगवेगळे स्वर तिनं हेरले होते. ते तिला कान देऊन ऐकायचे होते. बरीच पुढं आल्यावर तिच्या लक्षात आलं की बाकीच्या सगळ्या खूपच मागं राहिल्या आहेत. त्यामुळे ती थांबली. एका कातळावर बसली. जराशानं साऱ्याजणी येऊन पोहोचल्या. गोमा म्हणाली, "मी नाही हं इथं बसणार. इथल्या बायका सांगतात, इथं भूत आहे म्हणून. एक बाई इथनं खाली पडून मेली होती. तिचंच भूत इथं असतं."

ताई म्हणाल्या, "तसं काही नसतं. आपल्या मनातली भीतीच आपल्याला नाना रूपांत भिववत असते बरं! ती बाई इथनं कशी काय पडली ते माहीत आहे तुला?"

गोमानं नकारार्थी मान हलवली. लीनानं तर्क मांडला, "ती बहुतेक गवत कापताना पाय घसरून पडली असेल."

ताई म्हणाल्या, "तसं काही नव्हतं. मी सहजच विचारलं तुम्हाला. खरं कारण म्हणजे तिनं इथनं स्वतःच उडी घेऊन जीव दिला होता."

"अरेरे! म्हणजे आत्महत्या! बिचारी गांजलेली असणार!" मुलींनी सहानुभूती व्यक्त केली.

ताई पुढं सांगू लागल्या, "हो. ती बिचारी गरीब मुलगी होती. त्या समोरच्या गावात राहायची. तिथल्याच एका गरीब माणसाशी तिचं लग्न झालेलं होतं. सासरी कुणीच नव्हतं. नवरा आणि तीच फक्त. एवढा-तेवढा जमिनीचा तुकडा दोघं मन लावून कसत. त्यांना चांगले दिवस यायला लागल्यावर गावातल्या दारुड्या, रिकामटेकड्या टोळभैरवांना ते बघवेना."



मुली आता पुढची वाट चालत होत्या नि ताईंची गोष्टही वाटेबरोबर पुढे चालली होती, "एके दिवशी खूपच पाऊस होता. पाटाचं पाणी वाढलं होतं. तिचा नवरा रानातनं मोळी डोक्यावर घेऊन आला. तो पाय घसरून पडला अन् मेला. पुढं ही एकटीच राहिली. न डगमगता जमीन कसत होती. गावकऱ्यांची मदत घेऊन नांगरणी पुरी करायची. तिच्या नवऱ्याच्या नातेवाइकांना काही हे आवडत नव्हतं. त्यांना ती जमीन बळकावायची होती. त्यामुळे 'माहेरी जा, एकटी राहू नकोस' म्हणून ते मागं लागायचे. ही लक्षच द्यायची नाही. शेवटी एकानं तिच्या घरी सारखं जाऊन गोड गोड बोलायला सुरुवात केली. त्याला तिची जमीन काढून घ्यायची होती, म्हणून तो तिला सारखा मदत करायच्या निमित्तानं पुढं पुढं करायचा.

एके दिवशी संधी बघून त्यानं दावा साधला. तिची अब्रू लुटली. हे सारं सांगायचं कुणाला? विश्वास तरी कोण ठेवणार? उगीच तिला मात्र कुलटा म्हणून जिणं मुश्किल करतील. दुर्दैवाने तिला दिवसही गेले. ती बातमी गावकऱ्यांना लागली. ते थू-थू करत रोज तिला भंडावू लागले. अगदीच सहन होईना तेव्हा तिनं हात जोडून सरपंचापुढं गाऱ्हाणं मांडलं, "माझा यात काय दोष?", म्हणाली. "मला तुम्ही पापी समजता? खरा गुन्हेगार तर तो आहे. त्याला का दोषी समजत नाही?" असं तिनं सगळ्यांना विचारलं. त्याचं नावही सांगितलं.

सरपंच भला माणूस होता म्हणून त्यानं गावपंचायत बोलावली. निवाडा करून तिला न्याय मिळावा यासाठी प्रयत्न केले. तो बदमाश मात्र सगळ्यांदेखत शपथेवर म्हणाला, "माझा-हिचा काही संबंध नाही. मला बदनाम करण्यासाठीच हिनं हा घाट घातलाय."

पंचायतीत बसलेल्या एकाही मााणसानं त्याला विचारलं नाही. की बाबा रे, तू जर सारखा तिच्याकडं जायचास तर तुझा तिचा काहीच संबंध कसा नाही म्हणतोस?

त्या निर्लज्ज माणसानं गीतेवर हात ठेवून "तिच्या शरीराला शिवलोसुद्धा नाही", असं शपथेवर सांगून हिला तोंडघशी पाडलं.

दुसऱ्या दिवसापासून गावात आवई उठली की तिच्या माहेरच्या गावातल्या एका खालच्या जातीच्या माणसाशी तिचे अनैतिक संबंध आहेत. तिच्या जिवावर उठलेले लोक रात्री तिच्या घरावर दगड मारायला त्यांच्या मुलांना पाठवायचे. दिवसा ती कुठेही गेली की बायकासुद्धा तिला "वाईट चालीची, वेश्या", असं वाट्टेल ते म्हणायच्या. खरा गुन्हेगार मात्र उजळ माथ्यानं वावरत होता. त्याला जरासुद्धा झळ पोहोचली नव्हती; पण ही मात्र आयुष्यातनं उठली होती. शेवटी काय, तर एके दिवशी गावकऱ्यांना सांगून-सवरून तिनं राजरोस जीव दिला. "माझ्यामागे माझी जमीन, घर घ्या एकदाचं! यासाठीच ना चालवलंय हे सगळं?" असं म्हणाली आणि घेतली उडी.

हिला स्मशानात नेऊन, चिता पेटवून गावकरी परतत होते तेव्हा खूप पाऊस आणि वादळ झालं. त्यात तिची जमीन बळकावू बघणारे तीन नातेवाईक, तीन मुलं वाहून गेली. तो गुन्हेगारही त्यातच मेला. तेव्हापासून लोकांना वाटतं की ती भूत होऊन फिरते म्हणून." ताईंनी भुताची कथा संपवली तेव्हा मुलींच्या लक्षात आलं की आपण बरंच अंतर चालून आलोय. ओझ्यामुळे खांदेही दुखू लागले होते. माना ते सगळं ऐकून अतिशय प्रभावित झाली पण काहीच बोलली नाही. लीला मात्र म्हणाली, "तिनं आत्महत्या करायला नको होती."

ताईंनी दुजोरा दिला, "बरोबर आहे तुझं... पण त्यासाठी आपल्या समाजव्यवस्थेत खूप बदल व्हायला हवा आहे. अजून तरी अशा नाडलेल्या बाईला निंदानालस्तीपलीकडे दुसरं काहीच वाट्याला येत नाही. म्हणून तर बिचाऱ्या किती तरी जणी आत्महत्येचाच मार्ग पत्करतात."

वाटचाल संपून त्या एका देवळात विसावण्यासाठी थांबल्या. तिथल्या पुजाऱ्याकडनं भांडीकुंडी घेऊन त्यांनी खांद्यावरच्या पिशव्यांमधून डाळ-भाताचा शिधा काढून खिचडी रांधायला ठेवली. ओढ्याजवळनं पुदिन्याची पानं आणून चटणीही वाटली. पुदिन्याची पानं आणायला गेलेल्या मुलींपैकी एकीला बाकीच्यांनी चिंब भिजवलं होतं. ती ताईंना ओले कपडे दाखवत, कुडकुडत तक्रार करत होती. ताईंनी तिला उन्हात बसायला सांगितलं. मग अंगतपंगत झाली. भांडी स्वच्छ करून पुजाऱ्याला परत दिली.

परतताना दरड कोसळल्यामुळे आधीची पायवाट बंद झाल्याचं समजलं म्हणून दुसऱ्या वाटेनं सगळ्यांना घेऊन ताई निघाल्या. रस्ता अडला होता तिथं दोन्ही बाजूंनी येणाऱ्या वाहनांची कोंडी झालेली दिसली. ताईंनी पुढं होऊन एकेक दगड बाजूला करायला सुरुवात केली तशा मुलीही पुढं सरसावल्या. थोड्या वेळानंतर एस.टी. आणि मालमोटारीमधले दुसरे पुरुषही आले आणि रस्ता मोकळा व्हायला लागला.



परतीच्या वाटेत माना म्हणाली, "ताई, ते बघा, एकच झाड दिसतंय तिथं वर. बाकी काहीच नाही."

ताई म्हणाल्या, "पूर्वी इथं खूप दाट जंगल होतं. ते लोकांनी तोडलं. म्हणूनच माती आणि दगड सैल होऊन ठिकठिकाणी अपघात होतात, दरडी कोसळतात."

"कोण तोडतं ही झाडं?" मानूनं विचारलं.

"वनखात्याची माणसंच सगळ्यात जास्त." ताईंनी उत्तर दिलं.

मानूला नवल वाटलं. "का? त्यांना वनाचं शास्त्र माहीत नाहीये?"

"आहे तर! कागदोपत्री ते गरजेपुरती झाडं तोडायचीच परवानगी कंत्राटदारांना देतात. लोभी कंत्राटदार तेवढ्यावर थांबतात थोडंच? शासनही लाकडाचं उत्पन्न मिळतं म्हणून त्याकडे कानाडोळा करतं. त्यामुळे झाडं तगली तरच माती, पाणी नि प्राणवायू तगेल, याच्याकडे कुणी लक्षच देत नाही. कंत्राटदार आणि शासनाचं सगळं लक्ष असतं ते इमारती, लाकूड आणि पैशांकडेच."

"पण परवानगीपेक्षा जास्त झाडं तोडणं हा अप्रामाणिकपणा नाही का?" एका मुलीनं असंतोष व्यक्त केला.

"असेना का. त्याच्याकडे लक्ष द्यायला हे अधिकारी कुठं तयार असतात? त्यांच्या या लोभापायी स्थानिक लोकांना मात्र खूप मोठी किंमत मोजावी लागते. त्यांची साधनसंपत्तीच नाहीशी होत चाललीय ना!" ताईंनी स्पष्ट केलं.

मानानं विचारलं, "मग गावकरी याबाबत काहीच करत नाहीत?"

ताई म्हणाल्या, "करतात ना. काही वर्षांपूर्वी इथल्या बायकांनी कंत्राटदारांना झाडं तोडू द्यायला मज्जाव केला होता. ठिकठिकाणी त्या झाडांना मिठी मारून उभ्या राहिल्या आणि झाडावर कुऱ्हाड चालवायची तर पहिली आमच्यावर चालवा म्हणाल्या."

एकजण मध्येच म्हणाली, "हो, गेल्या वर्षी दहावीतल्या मुलीसुद्धा चिपको आंदोलनात भाग घ्यायला गेल्या होत्या."

ताई म्हणाल्या, "तेव्हाच फक्त नाही. त्याच्या आधीसुद्धा आम्ही किती तरी वेळा चिपको आंदोलनात भाग घेतलाय."

अशा तऱ्हेने भौगोलिक आणि थेट भिडणाऱ्या सामाजिक अनुभवांचाही एक छोटा प्रवास संपवून मुली आश्रमशाळेत परतल्या.

माना रोज दैनंदिनी लिहायची. आजची तिची नोंद अशी होती: 'गावात एक वर्षभरातही मला जेवढं शिकायला मिळालं नसतं तेवढं आज अवघ्या एका दिवसात मला इथं शिकायला मिळालं.'

मग तिनं वडिलांनी दिलेलं ते पोस्टाचं पाकीट काढलं. आज लिहावंच घरी पत्र,

असा निश्चय करून ती लिहू लागली, 'मला इथं खूप आवडतं आहे. इथली राहणी आणि अभ्यास मला पुढं खूप उपयोगी पडणार आहे. इथेच सगळं आयुष्य काढावं असं वाटतंय.'

'सगळं आयुष्य' असे शब्द लिहिताना, म्हणजे नेमकं काय हे तिला तरी कुठं स्पष्टपणे उमगलं होतं? पण तसं लिहिल्यावाचूनही राहवलं नव्हतं, हे त्या वेळेपुरतं तरी सत्य होतं.





पावसाळा सरला होता तरी मधूनच केव्हा तरी ढग दाटून येत आणि एखाद-दुसरी सर कोसळून जाई. या रिपरिपीचा मुलींना भारी कंटाळा आला होता. कारण कपडे वाळणं, सरपण, गुरांसाठी चारा आणणं, गुरं चारायला नेणं या सर्व दैनंदिन कामांचं व्यवधान ठेवावं लागत असे.

मागच्या सबंध चार महिन्यांच्या काळात मनाजोगतं खेळायला तरी कुठं मिळालं होतं? मैदान चिंबच नसायचं का? आज मात्र जरा उघडीप होती म्हणून साऱ्याजणी हुंदडायला निघाल्या. ताईंचं तर सांगायलाच नको. नुसती परवानगी द्यायच्या ऐवजी स्वतःही सगळ्यांबरोबर खेळायला निघाल्या. मग काय! थोड्याथोडक्या नव्हे, चक्क साठजणी मैदानावर गोंधळ घालत होत्या. अशा तऱ्हेच्या सांघिक खेळांसाठी आणखी काही खास थोडंच लागतं? मोकळं मैदान अन् अमाप उत्साह ही दोनच महत्त्वाची साधनं. ती मिळाल्यावर तासभर सगळ्यांनी खेळाची हौस फेडून घेतली. त्यानंतर मात्र ताईंनी फतवा काढला, "चला आता. परतायला हवं. पण चेहरे कशासाठी टाकायला हवेत? रात्री पुन्हा चांदण्यात झोडा नाच (स्थानिक लोकनृत्य) करायचाच आहे की!"

मुली हरखल्याच. "अय्या! किती मज्जा! खूपच नाचू आम्ही!"

मानुलीचं लक्ष पूर्वेकडील नभात गेलं. चीडच्या झाडांमधून पूर्ण आकाराचा चंद्र वर वर चढताना दिसला.

रात्रीचं जेवण संपवून सगळ्याजणी लगेच अंगणात धावल्या. त्यातल्या चौदाजणी

एकमेकींच्या बाहूंत बाहू गुंफून थिरकत होत्या. कुमाऊँनी लोकगीताचे स्वर आसमंतात घुमत होते. मोठ्या मुलींचे हात धरून नाचायला जमत नव्हतं म्हणून इटुकल्यांनी आपलं निराळं कोंडाळं केलं होतं. त्यांचाही नाच रंगात आला होता.

ज्या कुणी नाचत नव्हत्या त्या अवतीभवती बसून प्रेक्षकाची भूमिका बजावत होत्या. मानालाही या वातावरणाची धुंदी चढली होती. एकाएकी काय झालं कुणास ठाऊक, तिच्या ओठांवरचं हसू घरंगळलं नि ती नाचातनं बाहेर पडून एकटीच स्वतःत हरवल्यासारखी बसली. नुसतं तेवढ्यावरच थांबलं नाही. ती उठली नि तिच्या खोलीत जाऊन अंथरुणावर आडवी झाली. नाच-गाण्याचे सूर आतही तिच्या कानी पडत होते, पण ती आपल्यात नसल्याचं मात्र कुणाच्याही लक्षात येत नव्हतं.

दुसऱ्या दिवशी सकाळीही ती अंथरूण सोडीना तेव्हा दुसऱ्या मुलींनी चौकशी केली.

"तुला बरं नाहीये का मानू?"

"हो." मानूचं संक्षिप्त उत्तर.

"डोकं दुखतंय?"

"अंहं."

"दात दुखतोय?"

"छे!"

तेवढ्यात आरोग्यशिक्षिका असलेल्या ताई आल्याच. त्यांनी तिच्या कपाळावर हात ठेवत म्हटलं, "पण तुला तापही नाहीये माना, हो ना?"

"नाही, ताप नाहीये."

"मग? काय होतंय?" ताई विचारत होत्या.

कावरीबावरी होत मानानं कांबळ्यात स्वतःला गुरफटून घेतलं आणि तिचे हुंदके सुरू झाले. ताईंनी पाणी प्यायला दिलं. तोंड-हात धुऊन घ्यायला सांगितलं. मग ताईंनीच तिची वेणी घातली. न्याहारीसुद्धा अंथरुणातल्या अंथरुणातच आणून दिली. खाऊन झाल्यावर ताईंनी पुन्हा जिव्हाळ्यानं विचारलं, "माना, काय झालंय?"

"मला सांगता येत नाहीय." मानूला लाजल्यासारखं होत होतं.

"पाळी आलीय?"

मानूनं होकारार्थी मान हलवली.

"त्यात काय एवढं? ते होतंच. नैसर्गिकच नाही का हे? अग, तुझ्याहून मोठ्या मोठ्या मुली आहेत की इथं. त्यांनाही हे असंच होतं." ताई समजूत घालत होत्या.

"पण मला नाही हे आवडत!" मानूचा अभिप्राय.

"का? पहिल्यांदाच झालंय की काय?" ताईंनी विचारलं.



"नाही. इथं यायच्या आधीही असंच झालं होतं. खूप वाईट वाटलं होतं मला. गावाकडं तर अविवाहित मुलीला पाळी येणं ही केवढी चुकीची गोष्ट! त्याआधीच तिचं लग्न करतात. घरी आवडेल की नाही म्हणून मी कुणाला सांगितलं नव्हतं, पण परुलीला मात्र समजलं होतं. त्यामुळे इतरांपासून मी हे कसं लपवून ठेवायचं ते तिनं मला सांगितलं. स्वतः मात्र ती हे गुपित पोटात ठेवू शकली नाही. लगेच दुसऱ्या दिवशी मायला तिने हे सगळं सांगितल्यामुळे ती बिचारी खूप कष्टी झाली होती. त्यानंतर मायनं मला स्वयंपाकघरात पाय ठेवू दिला नव्हता, पाण्याला हात लावू दिला नव्हता, देवासमोर फिरकू दिलं नव्हतं." जमिनीकडे डोळे लावून मानू सर्व हकीगत सांगत होती. पुढे ती म्हणाली, "बरं झालं, आजीला कळलं नव्हतं; नाही तर तिनं मला घराबाहेर काढलं असतं!" भय जणू तिच्या चेहऱ्यावर एकवटून आलं होतं.

"मीही यातनं गेलेय माना!" ताई कणवेनं म्हणत होत्या.

मानू म्हणाली, "आपल्या हातून फार मोठा अपराध घडल्यासारखंच तेव्हा वाटत होतं. इतरांना कळू द्यायचं नाही म्हणून शाळेलाही गेले नव्हते. कुणी विचारलंच की आज घरी कशी, तर खोटीनाटी कारणं पुढं करावी लागत होती. अजूनही ते आठवलं की शहारा येतो, वाईट वाटतं." क्षणभर थांबून मानू पुढं म्हणाली, "ताई, मी मुलगा झाले असते तर ही पीडा मागे लागली नसती."

"नाही मानू, स्त्रीचं शरीरसुद्धा तेवढंच महत्त्वाचं असतं. बुरसटलेल्या सामाजिक रीतीरिवाजांमुळे स्त्रियांच्या सगळ्याच गोष्टींकडं हिणकस नजरेनं लोक बघतात ते दे सोडून." ताई शांतपणे मानूला पटवून देत होत्या, "आता बघ ना, मुलांच्या शरीरातही या काळात बदल घडतात. त्यांना दाढी-मिशा फुटायला लागतात. ते मात्र कुणीही वाईट किंवा अपवित्र मानत नाही. मग मासिक पाळी हाही स्त्रीच्या शरीराचा धर्मच. ते कसं वाईट? तुझ्या वर्गात मी आरोग्याचा तास घ्यायला येईन ना, तेव्हा हे सगळं नीट खुलासेवार सांगीन बघ. या दिवसांत काय काळजी घ्यायला हवी तेही सगळ्यांना समजावून सांगीन. आता मात्र तू पड जरा. एखादं पुस्तक वाचत पड."

ताईंशी केलेल्या या हितगुजानंतर मानूच्या डोक्यातला, खांद्यातला, नसांमधला मघाचा साठून राहिलेला ताण कमी झाला. त्यानंतर एक पुस्तक हातात घेऊन ती निवांत वाचत बसली.

एके सकाळी ताई सांगत होत्या, "पाऊस संपलाय बहुतेक. ती बघा गवतातली कोळीष्टकं उन्हामुळे चकाकताहेत."

"पाऊस संपलाय असा याचा अर्थ होतो?" मानूनं विचारलं.

"कोळ्यांना आपल्यापेक्षा जास्त कळतं या बाबतीत. म्हणून या दिवसांत ते जाळी विणायला लागतात." ताईंनी स्पष्टीकरण दिलं.

तेवढ्यात एक मुलगी उत्साहात म्हणाली, "म्हणजे आता आपल्याला हिवाळ्यात साठवायचं गवत काढायच्या तयारीला लागलं पाहिजे."

ताईंनी थोपवलं. "आजच नको, उद्यापासून करू या. विळ्यांना धार लावायची म्हणून लोहाराकडे दिलेत ते. संध्याकाळी मिळतील. गवत निबर झालंय म्हणून धार लावलेलेच विळे घ्यायला पाहिजेत. बरं, आज मीलनसभेत खास कार्यक्रम आहे. एक परदेशी पाहुण्या येणार आहेत आपल्याकडे. त्या तुम्हाला त्यांच्या देशातली माहिती सांगतील. तुम्हालाही त्यांना प्रश्न विचारायची संधी आहे. तयारीत राहा."

मानूनं विचारलं, "त्यांच्या देशात मुलामुलींमध्ये काय फरक करतात ते विचारलं तर चालेल? तिथं सगळ्यांना समान शिक्षण असल्याचं मी ऐकून आहे फक्त."

गोमानं मुद्दा मांडला, "आपल्याला त्यांच्याकडलं राजकारण, पक्षांचं कामकाज अन् निवडणुकीबद्दलही बरंच काही विचारायला वाव आहे."

ताईंनी दुजोरा दिला.

मानू गोशाळेच्या साफसफाईसाठी निघालेल्या मैत्रिणींना म्हणाली, "अग, अजूनही खरं म्हणजे बरंच काही विचारता येईल आपल्याला."

त्या पाहुणीबरोबरच्या गप्पा ठरलेल्या वेळेपेक्षा अर्धा तास जास्त लांबल्या. कारण प्रश्न-उत्तरांचं भाषांतर करावं लागत होतं. ताई आणि मोठ्या मुली विचारलेल्या सर्व प्रश्नांबाबत पुरेपूर माहिती मिळावी म्हणून उत्सुक होत्या; पण छोट्या मुली मात्र हळूहळू कंटाळून पेंगू लागल्या होत्या. एका छोट्या मुलीनं हात वर केला. कौतुकानं ताई म्हणाल्या, "आता आमच्या एका चिमुरडीचा छोटासा प्रश्न ऐका!"

चिमुरडीनं त्या पाहुणीला तिच्या भाषेतलं गाणं म्हणता येतं का म्हणून विचारलं नि मोठ्या मुली खोखो हसू लागल्या. पाहुण्या बाईंनी त्या लहानगीचा मान राखत लगेच त्यांच्या देशातलं एक गाणं म्हणून दाखवलं.

मानूनं यापूर्वी परदेशी माणूस पाहिलंच नव्हतं. म्हणून आधी आश्चर्य, मग बुजणं, असं सर्व एकामागून एक ओलांडत संध्याकाळ होईतो ती तोडक्यामोडक्या इंग्रजीत बिनधास्तपणे परदेशी पाहुणीबरोबर गप्पा मारायला लागली होती.

दुसऱ्या दिवशी सगळ्याजणी तयार होऊन आपापले विळे घेऊन अंगणात जमल्या. मानूचं लक्ष विळ्याजवळ ठेवलेल्या पेनकडे गेलं. पेन हातात घेऊन ती स्वतःशीच म्हणाली, आज हे लागणार नाही. दुसऱ्याच क्षणी विळा हातात घेऊन तीही सगळ्यांमध्ये येऊन उभी राहिली. गृहमातेने त्यांना कुंकवाचा टिळा लावला, गूळ वाटला. कामाचं उत्साह वाढवणारं आश्रमातलं एक गाणं सगळ्यांनी मिळून म्हटलं नि साऱ्या डोंगरउताराकडे निघाल्या. या ओसाड जागी पावसाळ्यात मात्र गवताचं रान माजायचं. हिवाळ्यासाठी हे गवत कापून ठेवण्याचा सामूहिक कार्यक्रम म्हणजे एक



सांस्कृतिक उत्सवच होता. गवत कापतानाही गाणी रंगायची. एका मुलीच्या विळ्याला घुंगरं होती. त्यांचा मंजूळ नाद कानांना सुखावत असायचा. मधूनमधून आळीपाळीनं एकेकजण गोष्ट सांगायची.

गवत काढण्याचा कार्यक्रम मुली न दमता पार पाडायच्या. ते बघून छोट्या मुलीही हट्ट करायच्या; पण त्यांच्या हातात विळा दिसणार नाही याची मोठ्या मुली दक्षता घेत. आजही तसंच चाललं होतं. छोट्या मुली फक्त त्यांच्या जेवण्याखाण्याचं सामान घेऊन तेवढ्या आल्या होत्या. केळीच्या पानावर जेवण. खरकटी पानं बादलीत भरून गोशाळेकडे रवाना केली नि लागल्या पुन्हा मुली कामाला. शामू कुत्राही या आनंदाच्या वातावरणात वारा प्यायल्यासारखा इकडून तिकडं धावत होता. तोही दमल्यावर एका दगडावर जाऊन पहुडला. मुलींचाही गवत कापायचा वेग आता मंदावू लागला होता. तेवढ्यात एकजण ओरडली, "अग आई गऽऽ!"

"साप?"

"विळा लागला का ग?" सगळे विळे थांबून प्रश्न उसळले.

"झालं तरी काय?"

"गांधीलमाशी!" एकजण किंचाळली. आजूबाजूला गांधीलमाश्यांचं एकदम मोहोळच उठलं.

देवी म्हणाली, "त्यांच्या पोळ्याला धक्का लागला असेल म्हणून त्या चिडल्यात बहुतेक."

"देवी, तू जास्त जवळ जाऊ नकोस त्यांच्या. तुला डसतील बघ." देवी मानूची पहिल्या दिवसापासून आवडलेली खास मैत्रीण. मानूला तिची काळजी लागली होती.

"नाही चावायच्या. मला तेवढं पोळं बघायचंय. बाकी थोडंच काही करणार आहे मी?" देवीनं तिची इच्छा व्यक्त केली. तेवढ्यात एका मुलीनं औषधी पाला शोधून गांधीलमाशी डसलेल्या मुलीवर उपचार केले. घंटा झाल्यावर सगळ्याजणी अंघोळीला गेल्या. दमून दुपारच्या उकाड्यात अंघोळ करायला मजा वाटत होती.

दुपारी थोडी विश्रांती, गप्पाटप्पा नि किरकोळ अभ्यासानंतर पुन्हा गवत काढायची मोहीम सुरू. उन्हं उतरली तसा या कापणीचा वेग आणखी वाढला. पश्चिमेला बुडणाऱ्या सूर्याची किरणं क्षितिजावर सांडली. मुली मंत्रमुग्ध होऊन ते बघू लागल्या. संध्याकाळचं भारावून टाकणारं वातावरण. त्यातच 'ओम तत्सत् श्रीनारायण तू...' या प्रार्थनेचे आणि संत मीराबाईच्या भजनाचे स्वर यामुळे मनं तरल झाली. झपाटून काम केलेल्या एका दिवसाचा जणू सुंदर समारोप होता. ताईंनी परतायला सुचवलं तर मुली तयार होईनात.

"चांदण्यात गवत काढायला खूप मजा येईल." एकीनं प्रस्ताव मांडला.

मानूनं सुचवून पाहिलं, "आणखी एक तासभर थांबू या."

ताई मात्र निकरानं म्हणाल्या, "अजिबात नाही! काळोखात दिसणार नाही. विळ्यानं बोट कापायचं किंवा साप, विंचू, किडाकिटकुल चावायचं. चला, परतू आता. उद्या येऊ."

इलाजच नव्हता म्हणून मुलीही निघाल्या. नीट हात-पाय धुऊन जेवायला बसणार तोच देवी सांगत आली, "ताई, पिनाथच्या डोंगरावर पाऊस सुरू झालाय. तासाभरात इथं येईल. आपलं गवत भिजेल की सगळं."

ताईंनी मुलींना विचारलं, "जेवून मग गवत ठेवायला जायचं की आधी ठेवून येऊन मग जेवायचं?"

बऱ्याचशा मुली उठून उभ्या राहत म्हणाल्या, "ते नीट ठेवून येऊ आधी. नाही तर दिवसभराचे एवढे कष्ट पाण्यात जायचे."

काही मुलींना मात्र हे मान्य नव्हतं. त्यांना आधी जेवायचं होतं... पण इतक्या सगळ्याजणी बाहेर निघालेल्या पाहून चरफडत त्यांनाही मागोमाग जावं लागलं. ताई सूचना देत होत्या, "सगळं गवत गोशाळेत नीट ठेवा. कोरडं राहिलं पाहिजे. भिजलं की गायी तोंड लावणार नाहीत."

काम संपूवन मुली झरझर परतल्या. सगळ्याजणी चिंब झालेल्या होत्या. मागं राहिलेल्या शिक्षिकांना तिथं विळे नि दोऱ्या दिसल्या. मुली तिथंच ते सर्व टाकून घाईत निघाल्या होत्या म्हणून त्या ती आवराआवर करू लागल्या.

झपाझप चालता चालता मानूचा पाय घसरल्यानं ती एका खड्ड्यात पडली. पडताना तिच्या हातातला विळा जोरात लागल्यामुळे जखम होऊन भळाभळा रक्त वाहू लागलं. ती कण्हत होती. जखमही मोठीच होती. शिवाय तिचा खांदाही दुखत होता. ताईंनी तिला बाहेर ओढून काढलं. वसतिगृहात पोहोचल्यावर मलमपट्टी करत तिला औषध दिलं. आरोग्यकक्षातच तिचं जेवण देऊन तिथंच तिला झोपायला सांगितलं.

दोन-तीन दिवसांत मानूची जखम भरली तशी ती पुन्हा गवत कापायला जायची तयारी करू लागली. शिक्षिकांना मात्र तिची जखम पूर्ण बरी होईपर्यंत तिनं ते काम करू नये, असं वाटत होतं. मानू हातात विळा घेऊन शिक्षिकांच्या नजरेपुढे इकडून तिकडं फेऱ्या मारत होती. गवत कापायची परवानगी मिळवण्यासाठी तिच्या या सूचक हालचाली होत्या. ती कितीही खडखडीत बरी झाल्याचा आव आणत असली तरी शिक्षिकांवर त्याचा ढिम्म परिणाम झाला नाही. त्यांनी तिला गायी चरायला घेऊन जा म्हणून रानात पाठवलं. सोबत हेमा नावाची एक छोटी मुलगी होती. दोघी आपापली दप्तरं काखोटीला मारून निघाल्या.



रानात गायी सुखेनैव चरत असताना हेमा पुस्तक वाचत बसली होती नि माना स्वेटर विणत होती. हा स्वेटर ती हिवाळ्याच्या सुट्टीत घरी जाताना धाकट्या भावासाठी घेऊन जाणार होती. रानात सर्वत्र नीरवता पसरलेली. या दोघी आपापल्या तंद्रीत. भानावर आल्या तेव्हा बघतात तर गायींची अजिबात चाहूल नाही. गेल्या कुठं? कळपात सगळ्यात मोठ्या, खज्जू नावाच्या गायीच्या गळ्यात घंटा होती. तिचा आवाज कुठून तरी लांबून ऐकायला आला.

माना म्हणाली, "या डोंगरामागं गेल्यात वाटतं. धाव पटकन. खज्जूची वर्षभर वयाची कालवड कळपात आहे. ती मागं राहिली तर तिला अजून परतायची वाटही पाठ झालेली नाही."

दोघी धावतपळत, धापा टाकत उताराला लागल्या. हा भाग खोलगट असल्यानं दाट झाडी होती. घनदाट जंगल. थोडं पुढे गेल्यावर खोलगट भागात गायी दिसल्या.

हेमा उतावीळ होत म्हणाली, "मला इथं भीती वाटतेय. दुपारच्या वेळीसुद्धा केवढा काळोख आहे हा! जवळपास माणूस असल्याची एकही खूण नाही. चल ना, आपण गायींना वरच्या बाजूला हाकून नेऊ."

मानूनं री ओढली, "खरंच. मलासुद्धा जरा भीतीच वाटतेय. निघूच आपण... पण जरा थांब. ती बघ, समोर किती छान फळं आहेत. तोडू आणि वर उन्हात बसून खाऊ."

हेमाच्या डोळ्यात भय संचारलेलं होतं. "अग, म्हणतेस तरी काय? ही फळं अस्वलांना आवडतात, माहितीय? अस्वलं या झाडांच्या जवळपासच दडून बसलेली असतात."

"अरेच्चा, अस्वलांची खूपच माहिती दिसतेय तुला! पण घाबरतेस कशाला उगीच? अस्वलं रात्र झाल्याखेरीज यायची नाहीत काही." माना हेमाला पटवत असली तरी मनात कुठं तरी तिलासुद्धा अस्वलाची भीती वाटायला लागली होती. न राहवून तिनं ती फळं घेतलीच तोडून. दोघीजणी गायींना त्या खोलगट जागेतून बाहेर वरच्या बाजूला हाकायचा प्रयत्न करीत होत्या; पण गायींना त्या कोवळ्या हरळीचा मोह सोडवेना. केवढ्या तरी हाकाहाकीनंतर एकदाच्या त्या गायींना घेऊन पुन्हा डोंगराच्या वरच्या बाजूला आल्या. इथं ऊनही होतं. पावसाचं पाणी एके ठिकाणी साचलं होतं. त्या तळ्यातलं पाणी पिऊन गायी रवंथ करीत बसल्या.

मानू हेमाला म्हणाली, "तू जाऊन आपलं जेवण घेऊन ये आता."

तासाभरानंतर हेमा परतली. जेवणात आज वरण-भात, भाजी-पोळीबरोबर चटणीही होती. दोघी चवीचवीनं सावकाश जेवत होत्या. जेवून विसावताना डोळा कधी लागला ते कळलं- सुद्धा नाही. मानाला जाग आली तेव्हा सावल्या लांबताना दिसल्या. सूर्य

मावळत होता. डोळे चोळत तिनं हेमालाही जागं केलं. जवळपास बघते तो गायी नाही अन् काही नाही. अरे देवा, हे काय आता पुन्हा? हेमा तर अकराच वर्षांची होती, लहानगी. जास्तच घाबरली. "मानू, आता काय करायचं?"

"घाबरू नकोस. मी बघते ना!" मानू तिला धीर देत होती. स्वतः मनातल्या मनात धास्तावलेलीच होती. केवढा हा उशीर आज! पुस्तकं, स्वेटर, दप्तर, ताटं– सगळं पिशव्यांमध्ये भरत दोघी घाईनं निघाल्या. अरुंद पायवाटेनं माना झपाझप निघाली होती. हेमाला तिच्यामागे धावावंच लागत होतं. ती म्हणाली, "या शुकशुकाटात जीव चाललाय ग माझा!"

मानूही म्हणाली, "हो ग. रानात गवत कापणारी माणसं किंवा गुराखी आजूबाजूला असतात तेव्हा भीती नसते. लोक गाणं म्हणतात, शिट्या वाजवतात, गुरं हाकतात. त्या सगळ्या आवाजांमुळे श्वापदं घाबरून बाहेर येत नाहीत."

मानूनं ओढणी कंबरेला बांधली. गायींना त्यांच्या नावानं ती हाकारू लागली. "खज्जू, काली, बिंदी, ये गं ये..! ये गं माझी सोनुली कालवड ती..!" शेवटचं नाव उच्चारताना तिचा आवाज कापू लागला, कारण ती कालवड तिची फार लाडकी होती. तिच्या हाकांचा काहीएक परिणाम झाला नाही. शब्द जणू कंठातून निघून वाऱ्यावर विरून जात होते. तासभर वनात वणवण केल्यावर तिनं मनातली भीती एकदाची बोलून दाखवली, "गायी पुन्हा त्याच खड्ड्यात पडल्यात की काय?"

हेमा थरथरत म्हणाली, "आता पुन्हा तिथं जायचं धाडस मला होत नाहीये. आता तर ती वाटही दिसायची नाही. मी नाही येणार तिथं!"

"पण गायी तर शोधायलाच हव्यात. आधीच उशीर झालाय. जरा मन घट्ट कर." मानू तिला धीर देत होती. "बरं, चल, तू पुढे चल," असं म्हणत हेमा तिच्या मागोमाग निघाली.

पुन्हा त्याच जागी जाऊन पाहतात तो शेण दिसलं, गायींनी आत्ताच टाकलेलं. माना आनंदली. "म्हणजे गायी इथंच आहेत. आज दुसऱ्या कुणाच्याच गायी नव्हत्या. त्यामुळे शेण आपल्याच गायींचं हे नक्की. ती बघ खज्जूची घंटा ऐकायला येत्येय."

यांचा आवाज ऐकून गायीही धावत आल्या, घाबरून शेपटी उंचावलेल्या. दोघींभोवती उभ्या राहिल्या. माना मोजू लागली, "एक, दोन... आठ. अग बाई, एक कमी दिसत्येय. ती कालवड कुठाय?" तेवढ्यात तिचा आवाज आला. या लगेच त्या दिशेनं पळाल्या. "होय, तीच तर! आपलीच कालवड. ढवळ्या रंगाची... पण हे काय गेलं तिच्यावरून उडी मारून? वाघ! अरे बाप रे! वाघ आहे तो!"

त्या दोघींचं किंचाळणं ऐकून गायींचा कळप वेगात यांच्यापाशी आला. खज्जू



मोठी असल्यानं शिंग उगारून ती कळपाची म्होरकीण झाली होती. सर्व गायी वाघावर चाल करून गेल्या. मानू आणि हेमानेही दगडांचा मारा सुरू ठेवला. वाघोबा एकदाचे पळाले. त्या कालवडीच्या भोवती गायी नि या दोघी संरक्षणार्थ उभ्या ठाकल्या होत्या. वाघोबानं पुन्हा हल्ला करू नये म्हणून बेंबीच्या देठापासून मानू आरडाओरडा करीत होती. धाय मोकलून रडणारी हेमा आता मुकाट्यानं तिचा हात धरून चालली होती.

ओरडून ओरडून मानाचा घसा दुखायला लागला होता. शरीर घामानं निथळत होतं. मोकळ्या, सुरक्षित वाटणाऱ्या जागी आल्यावरच ती गप्प झाली. प्रत्येक गायीला तिनं कुरवाळलं. गायींच्या पाठीवर अजूनही भीतीचा थरार जाणवत होता. आता आश्रम हाकेच्या टप्प्यात आला होता. हेमा ओरडली, "ताई ताई, वाघ!" मोठ्या मुली त्यांच्यापाशी धावत आल्या. ताईंनी कंदील आणायला सांगितलं. माना अन् हेमा गोशाळेकडं गायींना सोडायला चालल्या होत्या. तिथं या सगळ्याजणी पोहोचल्या. नेहमीच्या जागी आल्यावर थोड्या वेळात गायी शांत झाल्या. खज्जू कालवडीकडं डोळे लावून एकटक बघत होती. ताईंनी कालवडीचं संपूर्ण शरीर चाचपडून पाहिलं. त्यांना एक छोटीशी जखम सापडली. बहुधा वाघाचा पंजा लागला होता. मात्र वाघाच्या जबड्यातून ती सहीसलामत निसटून आली होती आणि याचं श्रेय या शूरवीर मुलींचं होतं, हे ताईंना सारी घटना ऐकताना उमगलं होतं. त्यांनी कौतुकानं दोघींच्या पाठीवरून हात फिरवला. दोघींना अस्मान ठेंगणं तर झालंच, पण भलतंच निर्भय झाल्यासारखं वाटलं.

बाकीच्या मुलींनी मानू अन् हेमावर प्रश्नांचा भडिमार केला. उत्तरं देता देता मध्येच हेमाला आठवलं, "अरे, आपल्या पिशव्या तिथंच राहिल्यात की!"

माना बेफिकिरीच्या सुरात म्हणाली, "हूं! पुन्हा जाऊ आणायला. वीस मिनिटं काय ती लागतील. आणायच्या का?" मनातनं मात्र तिला भीती वाटत होती हे नक्की. तेवढ्यात इतर मुलींनी तयारी दर्शवली. "चला, आम्ही पण येतो." मानू अन् हेमानं सशासारख्या डोळ्यांनी हळूच एकमेकींकडं पाहून घेतलं. ताईंच्या ते लक्षात आलं; पण आता पिशव्या आणण्यात काही धोका नव्हता हेही त्यांना कळत होतं. त्यामुळे त्या म्हणाल्या, "जा की! या घेऊन. शिवाय तुम्ही दोघीच नाही, या मोठ्या मुलीही येतील. कंदील घेऊन जाऊन या खुशाल."

माना थक्कच झाली.





वाघासंबंधी गाजवलेल्या पराक्रमामुळे काही दिवस आश्रमात जिच्या-तिच्या तोंडी मानाचं कौतुक ऐकायला मिळत होतं. पुढं काळानुरूप घटना बदलल्या तसे विषयही बदलत गेले. दर वर्षी शेजारच्या डुमलोटच्या जंगलात जाऊन आश्रमाच्या मुली गवतकापणीचं शिबिर घ्यायच्या. त्या निमित्तानं वेगळ्या भागात रात्रंदिवस एकत्र राहणं, येणाऱ्या समस्यांवर मिळून मार्ग शोधणं, गायींसाठी चाऱ्याची भरपूर बेगमी, अशा एकात एक किती तरी महत्त्वाच्या गोष्टी साध्य व्हायच्या.

यंदाही मानासकट दहाजणी या शिबिराला निघाल्या. त्या जागेच्या मालकाला आधी सूचना पाठवली. या सर्वजणी तिथे पोहोचल्यावर तिथं कामाला असणाऱ्या माणसानं त्यांचं स्वागत केलं. नंतर म्हणाला, "गवतकापणी खुशाल हवी तेवढी करा; पण नेहमीसारखी फार्म हाऊसची जागा राहायला मिळू शकणार नाही. कारण त्यात साठवलेले बटाटे अजून शहरातल्या मंडईत पाठवता आले नाहीत." या गैरसोयीबद्दल त्यानं दिलगिरीही व्यक्त केली.

ताईंनी विचारलं, "त्या समोर झोपड्या दिसताहेत, तिथं नाही का सोय होणार?"

तो माणूस म्हणाला, "त्या तर गुरांसाठी आहेत. तुम्ही कशा राहाल तिथं? शिवाय वस्तीपासून त्या लांब आहेत. अशा निर्जन जागी तुम्ही मुलीमुलींनी राहू नये."

ताई उत्तरल्या, "आमची सोबत आहे की एकमेकींना. राहतो आम्ही तिथेच." त्यांनी पिशवी पुन्हा खांद्यावर घेतली. विचारलं, "तिथपर्यंत जायला सोयीची पायवाट आहे का कुठे?"



"छे छे! वहिवाट नसल्यामुळे तुम्हालाच वाट काढावी लागेल बेताबेतानं."

ते बरोबरच होतं म्हणा. कारण जागोजागी काटेरी झुडुपात कपडे अडकत फाटत होते. काटे, दगड बोचत होते. ठेचकाळायला होत होतं. मानाचाही तोल गेला. "अग आई गऽऽ!"

"काय झालं माना? जळू की काय?"

"नाही नाही. काटा टोचलाय."

"चप्पल नाहीये पायात?"

"आहे तर. त्यातनं आरपार शिरलाय."

मजल दरमजल करीत शेवटी पहिली झोपडी लागली. ताईंनी कंदील पेटवून आत व्यवस्थित पाहून घेतलं. एखादं श्वापद नाही ना दडून बसलं? झोपडीच्या पाऊण अधिक भागात उंचसर चौथरा होता. "बहुधा झोपण्यासाठी सोईस्कर म्हणून तसं केलं असणार." ताई माहिती देत होत्या.

मानूनं सुचवलं, "त्या तिथं चूल पेटवता येईल आपल्याला." ती वळते तर पाय शेणामातीच्या दलदलीत बुडाला. ओढून काढला तर चप्पल तिथंच रुतून राहिली.

एकदाच्या साऱ्याजणी बाडबिस्तरा, शिधासामग्रीची उस्तवार लावून टेकल्या. दोघीतिघी आवाजाच्या दिशेनं पाण्याची सोय बघायला गेल्या. झोपडीत ओल होती. एकीनं खांबाशी अवजड सामान ठेवलं, तर त्या भारानं सरकून खांब कोसळलाच.त्या आधारानं उभारलेली भिंतही जमीनदोस्त झाली. अशा उघड्यावाघड्या झोपडीत रात्र काढायची म्हणजे जिवाला धोकाच. बघू सकाळी. "आजची रात्र कशीबशी काढू", म्हणत ताईंनी ती मोकळी जागा खांब, फांद्या, चटई अशी जुळवाजुळव करीत पुन्हा सांधायचा प्रयत्न केला.

चूल पेटवून, केळीच्या पानावर भाजी-भाकरी घेऊन पोटपूजा पार पाडल्यावर झोपायची तयारी झाली. नवीन जागा, उत्तेजित अवस्था, त्यामुळे झोप डोळां भेटेना. सर्वांना सुरक्षित वाटावं, श्वापदांनी जवळ येऊ नये या मिषानं लाकडं पेटवली. जाळ अंथरुणापर्यंत येऊन भलतंच घडू नये म्हणून मध्ये दगडांची रास केली. कुमाऊँ भागात लहान बाळांना झोपवताना त्यांच्या डोक्याशी बाळाची आई विळा ठेवते, तसा ताईंनी या मुलींच्या डोक्याशी विळा ठेवला.

केव्हा तरी उशिरानं एकेकीचा डोळा लागला. ताई मात्र जाग्या राहिल्या. जबाबदारी स्वस्थ झोपू देत नव्हती. जेमतेम चोविशीच्या वयाच्या ताई, पण इतर मुली चौदा ते सोळा दरम्यानच्या वयातल्या होत्या. त्यामुळे जोखीम वाटत होती.

कुठंतरी 'खुट्ट' वाजलं नि ताईंच्या काळजात धस्स झालं. हा तर कुणी तरी झाडाची फांदी तोडत असल्यासारखा आवाज. पण आहे तरी कोण? 'धबाक!' बाप रे! हा तर

काही तरी आदळल्याचा आवाज. कोण प्राणी असेल तो इथे आला तर? नकळत ताईंनी विळा उचलून त्यावर हाताची पकड घट्ट केली.

मिनिटांमागून मिनिटं नि तासांमागून तास पुढं सरकले. बॅटरीच्या उजेडात घड्याळ पाहिलं. साडेतीन वाजलेले होते. एक-दोन तासात उजाडेलच आता. ताईंच्या मनातली भीती आता ओसरू लागली होती. केव्हा डोळा लागला तेही लक्षात आलं नाही. काही तरी चमत्कारिक घडतंय अशा जाणिवेनं डोळे चक्क उघडले तर अंधारात दोन चकाकणारे डोळे दिसले. ताईंनी त्या दिशेनं विळा भिरकावला. त्या मोठ्यानं किंचाळल्या. जागी झालेल्या मानाला वाटलं, ताईंना बहुतेक भयंकर स्वप्न पडलं असावं. ताई तिला म्हणाल्या, "तुला अजून थोडा वेळ झोपायचं तर झोप माना."

"नको. माझी झोप झालीय. अगदी तरतरीत वाटतंय."

सकाळी प्रातर्विधीसाठी झऱ्यापाशी मुली गेल्या तर किती तरी फांद्या खाली पडलेल्या दिसल्या. मानाला खूप आश्चर्य वाटलं. "या एवढ्या फांद्या कुणी तोडल्या असतील? अस्वलांना आवडतात ती पिवळी फळंही भरपूर खाल्लेली दिसतात. ही काय इथं सालं नि बिया पडल्या आहेत!"

"अस्सं होय? आलं लक्षात. याचीच चाहूल रात्री लागली होती म्हणायची!" असं म्हणत ताई जवळपास कुठं पाऊलखुणा दिसताहेत का त्याचा शोध घेऊ लागल्या.

"ताई, हे बघा," माना म्हणाली, "मोठ्या कुत्र्याची पावलं."

ताईंनी निरखून पाहिलं. "या खुणा बघून तुला काही अंदाज बांधता येतो का? सांग बघू, हा केवढा मोठा कुत्रा असेल?"

"आपल्या शामूपेक्षा तिप्पट मोठा." म्हणता म्हणता मानाला स्वतःचंच हसू आलं. कारण एवढा मोठा कुत्रा असूच शकत नाही. ताई म्हणाल्या, "मानू, ते अस्वल होतं. हिमालयात असतं ते काळं अस्वल."

"काळं अस्वल!" मानाला भीती वाटली. ताईंच्या मागोमाग ती निमूट झाडीत शिरली. तिथं विष्ठा पडली होती, त्यावरूनही रात्रीचा प्राणी कोण याचा नेमका तर्क लावता येत नव्हता. दोघी एकेक बादली पाणी घेऊन झोपडीत परतल्या.

ताईंनी झोपलेल्या मुलींना हाकारलं, "तुमच्यात ज्या कुणी कवयित्री असतील त्यांना नक्कीच कविता सुचेल असा देखावा दिसतोय बघा समोर. आता निघा अंथरुणाबाहेर. या चला."

साऱ्याजणी बाहेर आल्या. सूर्य उगवत होता. उत्तरेकडील हिमाच्छादित पर्वतशिखरं सोनेरी किरणांनी जणू न्हाऊन निघाली होती. त्या किरणांच्या रंगछटा क्षणाक्षणाला बदलत होत्या. हिमालयच जणू वस्त्रं बदलत होता! सूर्याची किरणं घटकेघटकेला जास्तीत जास्त साम्राज्य पादाक्रांत करत विस्तारत होती. धुक्याचा अथांग सागर



आटत आटत मधली मधली खेडी डोळ्यांसमोर ठळक होऊ लागली होती. ताईंना चेष्टा केल्यावाचून राहवलं नाही. "कुणाला काही सुचलंय का? बघू."

मानानं उत्तर दिलं, "कागदावर नसलं तरी मनात मात्र बरंच काही प्रगटलंय."

"धीर धर. योग्य वेळी सगळं छानपणे बाहेरही येईल."

"अरेच्चा! तुम्ही सगळ्या कधी बरं आलात?" खांद्यावर कुऱ्हाड, मळके कपडे अशा अवतारातला एकजण त्यांना विचारत होता.

"काल संध्याकाळी."

"गवतकापणीला आलात ना? अशा मोडक्यातोडक्या झोपडीत कसं राहणार? हे छप्पर कधी कोसळेल डोक्यावर याचाही नेम नाही." त्याच्या सुरात काळजी होती.

ताईंनी खुलासा केला, "बाकीच्या झोपड्यांपेक्षा ही शेजारची त्यातल्या त्यात बरी म्हणायची... पण तिला टाळं आहे."

"हो, ती माझीच झोपडी. पावसाळ्यात गायींसोबत मी इथंच तळ ठोकून होतो. काल रात्रीपासून माझी एक गाय सापडंना. म्हटलं, वाट चुकून इथं तर आली नसंल? म्हणून शोधायला आलो."

ताईंनी त्याला शेजारच्या बऱ्या झोपडीत राहू देण्याबाबत रीतसर परवानगी विचारली. त्यानं ती आनंदाने दिलीच, शिवाय दाराजवळ लोंबकळत असलेली किल्ली दाखवली. म्हणजे आता या तात्पुरत्या निवासाला लुटुपुटीची का होईना, सुरक्षितताही प्राप्त झाली होती. ताईंनी त्याच्या हातावर ठेवायला म्हणून गुळाचा खडा आणायला मुलींना सांगितलं तसा तो म्हणाला, "छे छे! गूळ तर या मुलींसाठीच राहू दे. मात्र एक सांगतो, झोपडीला आग लागणार नाही तेवढं बरीक जपा."

"काळजी करू नका." ताईंनी आश्वासन दिलं.

"आणखीसुद्धा एक आहे. रातचं बाहेर पडू नका. एक काळं अस्वल या बाजूला फिरतं रोज."

"खरं? मग तुम्हीच आम्हाला या खुणा बघून सांगता का?"

"आरं देवा! ही त्याचीच पावलं! म्हंजी रातच्याला तो तुमच्या फक्त दहा हात अंतरावर होता म्हणायचा. देवालाच काळजी! तुम्हाला काहीसुद्धा झालं नाही."

तो गेला तो यांना घोर लावूनच गेला. 'आपण बिनघोर घोरत पडलो तेव्हा अस्वल फिरून गेलं आजूबाजूला आणि आपल्याला पत्ताही नाही. बाप रे!' मग या झोपडीतलं सामान त्या झोपडीत गेलं. जीव भांड्यात पडला.

अपार कष्टाची गवतकापणी, बांधाबांध, साठवणूक नि अवघड दिनक्रम गाणी, गोष्टी, चेष्टा, विनोद, निसर्गसौंदर्याच्या साहाय्यानं पार पडत होता. एके दिवशी आश्रमातला सर्वांचा लाडका कुत्रा शामू धावत येताना दिसला. जणू कुटुंबातलंच

एखादं जवळचं माणूस फार दिवसांनी भेटावं तशा मुली आनंदल्या. गेले पाच दिवस त्या साऱ्याजणी नि मध्येच भेटून गेलेला तो झोपडीचा मालक या पलीकडं वेगळं माणूस त्यांना भेटलं नव्हतं. अगदीच आतल्या बाजूला होतं ना हे जंगल.

शामू एकटाच कसा आला? छे! ती काय, देवी आणि गोमासुद्धा दिसतेय मागोमाग. त्या दोघी आणि या सगळ्या उचंबळून येऊन एकमेकींना भेटल्या. देवी नि गोमा आश्रमातून डाळ-तांदूळ, कणीक, ताज्या भाज्या अन् लगेच खायला पुऱ्या घेऊन आल्या होत्या. पोटभर खात खात आश्रम, गाव नि वर्तमानपत्रातल्या बातम्यासुद्धा सगळ्यांनी ऐकल्या. सायंकाळी त्या दोघी आल्या वाटेनं परतल्या.

शिबिराचा सातवा दिवस. गडगंज भारे घेऊन वाटचाल करायची ती काटेरी झुडपांतून, दगड-धोंड्यांच्या फसव्या अनोळखी वाटेवरून. माना आणि लीलाची मैत्री शिबिराच्या काळात आणखी घट्ट झाली. माना तिला सांगत होती, ''कुमाऊँ भागातल्या बायकांचं जिणं असंच. आपण फक्त आठवडाभर केलं तेच किती कष्टाचं वाटलं. या बापड्या आयुष्य त्यातच घालवतात.''

''तू सांगतेस ते अगदी खरं आहे, माना. बघ, तोल सांभाळ. सावकाश. त्या बाजूला खड्डा आहे. नीट लक्ष दे. या बायकाही कधी कधी अशाच खड्ड्यात पडल्यानं नाहक मरतात.''

''तुला काय माहीत?''

''माहीताय मला. माझ्या गावाकडची एकजण आता लग्नानंतर शहरात राहते. ती माहेरी आली ना, की कश्शाकश्शाला हात लावत नाही बघ. केलंच तर अगदी वरवरचं काही तरी काम करते, नाही तर आपली कादंबरी धरून बसते हातात. त्यामुळे तिच्या हातांवर साधा ओरखडाही दिसत नाही अन् आपले हात-पाय... काय सांगायचं?''

''हाता-पायांचं काय घेऊन बसलीस? आपली तोंडंही कशी झालीत बघ. मलासुद्धा नीटनेटके कपडे घालायला आवडतातच की. पण म्हणून मी काय काम करायला थोडीच नकार देते?'' मानूनं पुस्ती सोडली.

लीलाचं स्वप्नरंजन सुरू होतं. ''आपण तरी काय म्हणून बैलांसारखं जुंपून घ्यायचं या आश्रमात? पुन्हा घरी गेल्यावर तेच करायचं आहे की. चुकणार आहे थोडंच?''

''पण मला मात्र आश्रमात खूप आवडतं.'' मानानं पसंती व्यक्त केली.

''हे काय वेड्यासारखं?'' लीलानं तोडलं.

मानाच्या डोक्यावरचा भारा एका फांदीवर आदळला. काही कळलं नाही. तोल गेला. पडली माना. घरंगळत दरीत कोसळली. आपण जगणार की मरणार? हातात सापडणारं गवत गच्च धरलं तर तेही मुळापासून उपटून येतंय. आपण खाली खालीच जातोय. हे काय चाललंय?



वरच्या बाजूला लीला जिवाच्या आकांतानं ओरडत होती, ''माना पडली... तिला वाचवा! या ना कुणी तरी! माना पडली!''

ताई आणि इतर मुली डोंगराच्या त्या बाजूला होत्या. त्यांच्या कानी एकही हाक पडायची सोयच नव्हती. एका क्षणी माना लीलाच्या नजरेच्या टप्प्यातून निसटली. ती दिसेनाशी झाल्यावर हतबुद्ध झालेल्या लीलानं जमिनीवर लोळणच घेतली.

खाली पडलेल्या मानाच्या कल्पनेबाहेरचा हा अनुभव होता.

जीवन-मरणातलं अंतर झपाट्यानं ओसरत चाललेलं होतं. हे सगळं केवढं भयंकर आहे! ''मायऽऽ, माय गऽऽऽ माये...'' माना निकरानं ओरडत होती.

शेवटी ताईंना एकदाची चाहूल लागली, कुणी तरी ओरडतंय.

मुली म्हणाल्या, ''नाही ताई. कुठं काय?''

''नाही, थांबा. मानू आणि लीला कुठं दिसत नाहीत.'' एव्हाना ताईंच्या काळजात धडधडायला लागलं होतं. तेवढ्यात पुन्हा ''माय... माय गऽऽऽ!'' त्या दिशेनं साऱ्याच धावल्या. काटे रुतत होते. ओरखडे उठत होते, पायाखालून दगडधोंडे निसटत होते, ठेचकाळायला होत होतं; पण आपल्या माणसाला काही झालं की काय ही शंका फेडायला या आतुरल्या होत्या. शेवटी एकदाची लीला दिसली, भुईत तोंड खुपसून लाचारीनं रडत असलेली. विचारलेलं उत्तर द्यायला तिच्या तोंडून शब्द फुटत नव्हता. गडबडीनं तिनं खालच्या दिशेला हातानं खूण केली.

''माना पडली की काय आपली? आई गं! बिच्चारी माना!..'' ताईंनी उच्चारलेले शब्द जणू प्रतिध्वनींनी द्विगुणित-त्रिगुणित होऊन आदळावेत तसं मुलींना झालं. ताईंचा चेहरा पांढराफटक पडला, ओठ दुमडले गेले, डोळे दगडासारखे दिसू लागले. शक्ती एकवटून त्या उठल्या. पुढं जात जात खाली वाकून त्यांनी भीतभीतच साद घातली, ''माना... माना...''

''ताई, मला वाचवा! मला वर ओढा ताई!'' एका झुडपाच्या आधारानं माना टांगणीला लागलेली दिसली. तिनं डोळे घट्ट मिटून घेतले होते. खाली पाहिलं की भोवळ येत होती.

''शांत हो माना. घाबरू नकोस. मी तुला वर ओढते. तू हलू नकोस हं.''

एव्हाना इतर मुलींनीही ताईंच्या अवतीभवती कोंडाळं केलं होतं. ताईंनी त्यांना गप्प केलं. ''शांत राहा ग जरा. दोर द्या इकडे.''

लीलानं गवताच्या भाऱ्याभोवती वेढलेली दोरी भराभरा सोडवली. ताईंनी ती हातात घट्ट धरून तिचं टोक खाली सोडलं. ते टोक एका हातात धरताना दुसऱ्या हाताची झुडपाच्या फांदीवरती पकड तिनं सैल केली नाही. दोरी नीट हातात आल्यावर पटकन तिने दुसरा हातही पुढे करून दोरीच्या भरवशावर स्वतःला सोडलं, तेव्हा

क्षणभर आपण वेगात खाली जातोय की काय असं वाटून ती किंचाळली. "घाबरू नकोस, मानू. तुला काहीही होणार नाही. आम्ही तुला वर घेतोय", असं म्हणत ताई आणि साऱ्या मैत्रिणींनी प्रयत्न सुरू ठेवले. मरण आणि जीवन यातलं अंतर नव्यानं समाधानकारकपणे वाढत चाललं होतं. अधांतरी वर ओढल्या जाणाऱ्या मानाच्या पावलांना शेवटी स्थिर जमिनीचा आधार मिळाला नि सर्वांचे चेहरे आनंदानं उजळून निघाले. साऱ्याजणींनी मानूला मरणाच्या तोंडून ओढून काढलं होतं.

हात-तोंड धुऊन मानाला थोडी हुशारी आल्यावर ताईंनी चौकशी केली, "तुला कुठं कुठं लागलंय माना?"

"फक्त पाठीत दुखतंय नि हात सोलवटलेत."

"तुला आश्रमापर्यंत चालवेल का?"

"हो."

"नसेल तर तसं सांग. आजची रात्र आपण इथंच काढू. सकाळी बघू पुन्हा काय करायचं ते."

"नको. आश्रमातच जाऊ या ताई", म्हणत माना उठून उभी राहिली. इकडं-तिकडं पावलं टाकून तिनं स्वतःचा अंदाज घेतला.

तिला घडीभर विसावा घ्यायला सांगून बाकीच्या पुन्हा कामाला लागल्या. बांधाबांध, आवराआवर करून आश्रमाकडं परत फिरताना मानाच्या मनात आलं, "इतकं सगळं होऊनही आपण सगळ्यांइतक्याच भराभर चालू शकतोय!" तिला खूप बरं वाटलं. अंधारून आल्यानं वाटेतच त्यांना कंदील पेटवावे लागले.

आश्रमात पोहोचल्यावर या सर्व मुलींचं जंगी स्वागत करण्यात आलं. युद्ध जिंकून आलेल्या फौजेसारखा आदर, कौतुक त्यांना मिळालं. अवघड कार्य यशस्वीपणे पार पाडल्याचं समाधान, आनंद अन् आत्मविश्वास शिबिरार्थी मुलींच्या चेहऱ्यांवरून ओसंडून वाहत होता.

लीला आणि मानाची मैत्री आता दृढ झाली होती. पाच महिन्यांचा सहवास नि सुखदुःखात सोबत केल्याची भावना. त्या साधारणपणे नेहमीच एकमेकींना धरून राहत. काही वेळा तर आश्रमाचे नियम धाब्यावर बसवूनही त्यांनी एकमेकींची अडचण सोडवू पाहिली.

लीलाला अभ्यास तर आवडायचाच नाही. अंगमेहनतीची कामंही तिला अजिबात रुचत नसत. चांगलेचुंगले कपडे घालणं, दागिने घालून मिरवणं या तिच्या सर्वाधिक आवडीच्या गोष्टी. दागिने घालणं आश्रमाच्या नियमात बसणारं नव्हतं म्हणून तिला वाईट वाटायचं. याशिवाय तिला प्रचंड आवडणारी गोष्ट म्हणजे गप्पा. जरा संधी मिळाली की ती मानाशी अखंड बडबडत बसायची. केव्हा तरी अभ्यासाची जाणीव झाली की माना अस्वस्थ होऊन जायची.



लग्न आणि शहरातलं राहणीमान या दोन गोष्टी लीलाच्या बोलण्यात सतत असायच्या. मानालाही हळूहळू हे विषय आवडायला लागले. लग्न आणि तरुणांबद्दल चारचौघांसमोर मोकळेपणी बोलता येत नसे म्हणून या दोघी दुसरं कुणी नसेल तेव्हा कायम या विषयांवर भरपूर बोलत बसू लागल्या. आताशा मानाचंही लक्ष अभ्यासातून उडू लागलं. एवढंच नव्हे, तर ताईंनी सांगितलेल्या कामातही अधूनमधून तिच्याकडनं चुकारपणा घडायला सुरुवात झाली. ताईंची बोलणी बसलीच तर, "पुन्हा असं होऊ देणार नाही" असं ती म्हणायची. मात्र पुन्हा तेच व्हायचं.

एके दिवशी मानाकडे गायींची राखण करण्याची जबाबदारी होती. रानात जाताना तिनं वह्या-पुस्तकं सोबत घेतली होतीच. किती तरी दिवसांपासूनचं एक काम ती पुरं करू शकली नव्हती. तीन कवितांचा अनुवाद करायला तिला दिलेला होता आणि काही केल्या तिच्याच्यानं ते होत नव्हतं. लीलासोबत राहून ते शक्यही नव्हतं.

काही झालं तरी हे काम आज पुरं करायचंच, असा तिनं चंग बांधला होता. गायींकडे लक्ष ठेवायला हेमाला सांगावं आणि आपण हे उरकून टाकावं, असा बेत माना आखत असतानाच लीला तिला म्हणाली, "मला यायचंय तुझ्याबरोबर."

"पण परवासुद्धा तूच तर आली होतीस नि तुझ्या गटाच्या कामांचं काय? तुझा अभ्यास तरी झाला आहे का?"

"मला काय ग त्याचं? हेमाला राहू दे. तू चल. मी गायी सोडायला चालल्येय."

"मग आधी ताईंकडे जाऊन परवानगी घे."

"नको. त्यापेक्षा संध्याकाळी त्यांची बोलणी खाल्लेली बरी. आता चल ना बाई. वेळ नको घालवूस इथं." मागं लागत निघालेल्या लीलानं स्वतःची वह्या-पुस्तकंही तिच्या पिशवीत कोंबली.

निघाल्या दोघी. वसंत ऋतूच्या खुणा रानात पानोपानी दिसत होत्या. पायांखालच्या गवतातली पिवळी फुलं दृष्टी वेधून घेत होती. एके जागी दोघी विसावल्या तेव्हा मानानं झटपट वही काढली; पण लीला जणू टपून बसली होती. तिला मानाला काही खास गुपित सांगायचं होतं. ते सांगायच्या कल्पनेनंही ती मोहरून गेली होती. माना मात्र संपूर्ण दुर्लक्ष करत वहीत काही तरी लिहायचा प्रयत्न करायला लागली, तेव्हा लीलानं नाइलाजानं स्वतःची वही काढली. त्यात ती निमूट लिहीत बसली. ती वहीच तिनं आता मानापुढे ठेवली. मानानं ते वाचलं आणि थक्कच झाली. हे तर प्रेमपत्र!

"हा गुलाब कोण?" मानूनं विचारलं.

"पलीकडच्या गावात राहतो. त्याचं खरं नाव नारायण, पण मी त्याला गुलाब

म्हणते कारण, तो मला चमेली म्हणतो."

लीलाचा चेहराही मानाला गुलाबी झालेला दिसला. तिनं विचारलं, "तोही तुला पत्र लिहितो?"

"ही दोन्ही पत्रं त्याचीच तर आहेत." पुढच्याच क्षणी मानाच्या पुढ्यात दोन पत्रं होती. माना वाचू लागली. एक पत्र छोटंसं होतं, दुसरं बरंच मोठं होतं. त्यात लीलाच्या सौंदर्याची स्तुतिवर्णनं होती. लीलानं त्याला पत्र लिहायला परवानगी दिली हे त्याचं मोठं भाग्यच, असंही त्यात लिहिलेलं होतं.

"म्हणजे तूच त्याला पत्र लिहायला परवानगी दिलीस म्हणायची?" मानानं विचारलं.

"अग, मला तर त्याच्याशी बोलायचीच खूप उत्सुकता लागलीय. येईलच एवढ्यात. खरंच माना, तो इथं आला की तू त्याला बघतच राहशील. पावा तर इतका गोड वाजवतो! त्यानंच माझ्यावर मोहिनी घातलीय. त्याचा पावा ऐकून मी भुललेय हे त्याला कसं कळलं कुणास ठाऊक! दुसऱ्याच दिवशी त्यानं ही चिठ्ठी माझ्यासमोर टाकली आणि तो निघून गेला. बोलला काहीच नाही. त्याच्यानंतरच्या दिवशी भेटला तेव्हा मीसुद्धा बोलले नाही. फक्त चिठ्ठी टाकली त्याच्यासारखीच. आज मात्र आम्ही बोलणार आहोत एकमेकांशी."

लीलाचा फुलागत उमललेला चेहरा पाहून मानूला काही अर्थबोधच होत नव्हता, म्हणून तिनं पुन्हा एकदा ते पत्र नीट वाचायला घेतलं. पाहते तर किती घाणेरडं अक्षर हे आणि शुद्धलेखनाची बोंबच! मानाच्या मनात आलं, हा अभ्यासात फारसा चांगला नसावा बहुतेक.

"कसला विचार करतेस माना?"

"लीला, तुझं हे जर कुणाला समजलं तर काय ग होईल? तुझं नाव बदू नाही का व्हायचं? तुला भीती नाही वाटत? आणि ताईंना काय सांगशील?"

"ताईंना काहीच सांगणार नाही. पण आईला तरी कुठं काय सांगू शकणार आहे यातलं?" लीला गोंधळलेल्या मनःस्थितीत सापडली होती.

"हे जे काय आहे ते मला तरी फारसं आवडत नाहीये, लीला!" असं ती बोलत नाही तोच तो तरुण समोरून येताना दिसला. जणू लक्षच नाही असा देखावा करत दोघींनी आपापली पुस्तकं डोळ्यांसमोर धरली. लीलाच्या बोटांत थरथर आली होती. चेहरा आरक्त होत चालला होता; पण मानाच्या चेहऱ्यावर मात्र भयाचं सावट स्पष्ट दिसत होतं.

तो तरुण समोर उभा राहिला. सुरुवात कशी करावी याबद्दल चाचपडत धीर एकवटून त्यानं विचारलं, "लीला, ही तुझी मैत्रीण?"



लीलानं मानेनंच होकार दर्शवला. मानूनं त्याच्याकडे पाहिलं. मध्यम बांध्याचा, सावळसर वर्णाचा. जीन्सची पॅन्ट अन् सुती शर्ट अंगावर. त्याचे काळे, कुरळे केस छान दिसत होते. एका हातात बासरी अन् दुसरा हात पॅन्टच्या खिशात घालून तो उभा होता.

"तुमचंच नाव नारायण का?" मानानं प्रश्न केला.

"बरोबर. तुमचं काय नाव?" प्रतिप्रश्न.

तो डावलून मानाचा पुढचा प्रश्न, "नारायण सिंह की नारायण दत्त?"

"नारायण सिंह."

माना एकाएकी स्तब्ध झाली. तो तरुण खरंच देखणा होता. विशेषतः त्याचे केस आणि डोळे. तो अभ्यासात चांगला नसेल असं त्याच्याकडे बघून तरी अजिबात लक्षात येत नव्हतं. मग त्याच्या पत्रातल्या त्या चुका? विचारात पडलेल्या मानानं आणखी एक प्रश्न विचारला, "तुम्ही शिकता आहात?"

"आता नाही शिकत. हायस्कूलनंतर सोडलं." हे सारं त्यानं अभिमान वाटत असल्यागत सांगितलं.

"फक्त हायस्कूलपर्यंतच? एवढ्या शिक्षणावर चांगलीशी नोकरी मिळणं किती अवघड, नाही का?"

"म्हणजे काय? माझ्या दृष्टीनं म्हणाल तर शिकलो काय, न शिकलो काय, सारखंच. कुठलीही सुंदर मुलगी मला लग्नाला नाही म्हणणार नाही. स्वतःचं घर, घरात खायला-प्यायला तोटा नाही. वाडवडलांची मालमत्ता आहे. गायी-म्हशी आहेत. आणखी काय पाहिजे?" असं म्हणत तो आरामात बसला. उलट त्यानंच आता मानाला सवाल केला, "तुम्ही अजून किती शिकणार आहात?"

"मला भरपूर शिकायचंय." मानू जरी असं म्हणाली तरी लीलानं मध्येच म्हटलं, "मला नाही आता पुढं शिकायचं. झालं तेच बास झालं."

"तुझं म्हणणं बरोबर आहे, लीला. आयुष्यात एक वेळ अशी येतेच, त्या वेळी तुम्हाला लग्नाचा विचार करणं भाग पडतं आणि शिकून-सवरून पुढे काय करायचंय?" नारायण लीलाची बाजू घेत होता.

मानूला नाही ते आवडलं. येऊन-जाऊन पुन्हा तो लग्नाचाच विषय. शिवाय नारायण तिच्याकडं एकसारखा बघत होता. त्याची ती नजर तिला खटकत होती. लीला मात्र या वातावरणात दंग झालेली होती.

न राहवून मानानं टोकलं, "तुम्ही बोर्डाची परीक्षा कसे पास झालात, कुणास ठाऊक! तुमचा भाषा विषय फारच कच्चा दिसतो."

"काय म्हणालीस? माझ्या भाषा विषयाची परीक्षा घेणारी तू कोण? तू स्वतः

अजून नववीतच आहेस ना? तुझ्याहून मी जास्त शिकलोय हे विसरू नकोस! लीला, ही तुझी मैत्रीण? इतकी बिनडोक?''

चिडलेल्या नारायणला शांत करत लीला म्हणाली, ''अरे, ती बिनडोक नाहीये. तुझी चेष्टा करतेय ती.''

नारायण बडबडत होता, ''परीक्षा पास होणं म्हणजे चेष्टा वाटली का? जी मुलं वर्षभर घोकंपट्टी करत होती त्यांच्यापेक्षा जास्त मार्क मिळालेत म्हटलं मला. आता मी कॉपी करून पास झालो ते सोडा; पण त्याच्यासाठीही हुशारी लागते. नंतर मात्र मी शिक्षण सोडलं, कारण माझे वडील माझ्यासाठी ट्रक घेणार आहेत. मग मी ट्रक चालवणार.''

''मग तू इथं यायचा थांबशील, नारायण?'' लीला आसुसून विचारत होती. ''तुला माहीत आहे ना, मला तुझा पावा किती आवडतो ते? कृपा करून इकडं यायचा थांबू नकोस, काही झालं तरी!''

''काही तरीच काय? तुला भेटायचं कसं थांबवीन? मलासुद्धा तुझी ओढ वाटतेच की!''

हे सगळं खूप विचित्र घडतंय असं मानाला वाटत होतं. तेवढ्यात लीलाने तिच्या हातात पत्र ठेवलं. मानूनं ते नारायणाच्या हातात द्यावं असा तिचा विचार दिसला. मानूनं तसं केलं, तर नारायणनं एक कागद मानूच्या हातात ठेवला. त्यावर फुलांचं चित्र होतं. 'चमेली' असं वर लिहिलेलं होतं.

''कुणी बघायच्या आत मी आता सटकतो,'' असं म्हणत निरोप न घेताच तो निघून गेला. त्यानंतर दोघींनी ते पत्र वाचलं. त्यातल्या प्रेमाच्या गोष्टींनी मानूच्या हृदयाला हात घातला; पण त्यातल्या अश्लील गोष्टी वाचून तिला नकोनकोसं झालं. ती म्हणालीही, ''किती ग घाण घाण लिहिलंय हे!''

''त्यात काय, मुलांना हे असलंच आवडतं!'' लीलाला त्याचा पुळका आलेला होता.

''मला नाही बाई हे आवडलं! खरं तर तूसुद्धा ही पत्रं जाळून टाक, लीला. एखाद्याच्या हाती लागली तर काय करशील?'' मानूनं सल्ला दिला.

''मी नाही जाळणार. ही पत्रंच तर माझ्या एकटेपणात मला सोबत करतात.'' व्याकुळलेल्या स्वरात लीला सांगत असल्यानं मानूही गप्प झाली. तिच्या मनातली भीती घालवायला लीला म्हणाली, ''मी जपून ठेवीन गं अगदी. कुणाला काहीच कळायचं नाही.''

बराच वेळ दोघी गप्प बसल्या. मग मानूनं विचारलं, ''तू लग्न करणार आहेस त्याच्याशी?''



''मला खूप हवं असलं तरी ते शक्य नाहीये. जातीची अडचण येणार. तू त्याला विचारलंस ना, नारायण दत्त की नारायण सिंह, म्हणून? मी ब्राह्मण कुळातली. तो खालच्या जातीतला. आई चुकूनही या लग्नाला परवानगी द्यायची नाही.'' थोडा वेळ गप्प राहून लीला पुन्हा म्हणाली, ''तुला तर मी सांगितलंच मानू, मला शहरात राहणाऱ्या मुलाशी लग्न करायचंय म्हणून. तिथं मला काबाडकष्ट न करता सुखात राहता येईल. हा नारायण तर ट्रक ड्रायव्हर व्हायचं म्हणतोय. म्हणजे त्याच्या बायकोनं खेड्यात राहून शेतीवाडी, गायी गुरं बघायची. त्यातनं त्याची शेतीवाडी अन् गायीगुरंही भरपूर आहेत म्हणाला.''

''मग तू त्याला भेटू नकोस.'' मानाला जो मार्ग योग्य वाटत होता तो ती मैत्रिणीला पटवून द्यायचा प्रयत्न करत होती. ''डोंगराळ भागातल्या बायकांना उपसावे लागणारे अपरंपार कष्ट कमी करण्यासाठी आपण उपाययोजना शोधायला हवी, असं त्या दिवशी ताई म्हणत नव्हत्या का? शहराकडं धाव घेणं हा काही एकमेव पर्याय नाही. येऊन जाऊन अशा कितीजणी शहरात सुखात राहू शकतील? मलासुद्धा चांगल्या राहणीची ओढ आहेच; पण शहरातल्या बायकांचं जिणं मात्र मी स्वीकारू शकत नाही. त्या मुलाला तू आता इथून पुढं भेटूच नकोस, लीला!'' शेवटचं वाक्य मानूनं विशेष आग्रहपूर्वक उच्चारलं.

''त्याला भेटणं मी कसं थांबवणार मानू?'' लीलाचं डोळे भरून आले होते.

''तू जे काय करते आहेस ते बरोबर नाहीये, लीला. पुढं कधी तरी पश्चात्तापाची वेळ येण्यापेक्षा आत्ताच जाळून टाक ती पत्रं.'' ती पत्रं जाळून टाकावीत म्हणून मानाचे हात शिवशिवत होते; पण लीलाचे अश्रू बघून ती तसं करू शकली नाही.

अस्वस्थ माना त्या दिवशी इतरांच्या अगोदरच झोपायला गेली. सैरभैर मनात एकामागोमाग एक विचारांची गल्लत होत होती. कसा बघत होता नारायण लीलाकडं! त्यानं पत्रात लिहिलेलं हे अन् ते... छे! का बरं विचार करतोय आपण एवढा या सगळ्याचा?

''माझ्या संदर्भात जर असं कुणी काही लिहितं तर?.. तिला स्वतःच्या मनाचं आश्चर्य वाटू लागलं... किती बदललोय आपण इथं आल्यापासून! पूर्वी तर लग्नाचा नुसता विषय काढला तरी आपल्याला राग यायचा.

नारायणचं प्रेम आपल्यावर जडलं असतं तर आवडलं असतं का आपल्याला? नाही, नारायण नको. त्याचं अक्षर किती घाणेरडं! अन् शुद्धलेखनाचा तर पत्ताच नाही नि किती अश्लील लिहितो तो! नाही बा, आपल्याला नाही हं हे चालायचं! एखाद्या सभ्य, समंजस व्यक्तीवरच आपला जीव जडू शकतो... असे किती विचार मनात आले नि गेले. रात्र सरत होती; पण हिला झोप लागत नव्हती. सकाळी उठायला

उशीर झाला तेव्हा स्वतःचाच राग आला. एरवी लवकर उठणारी माना, तिला कसं हे आवडणार? वर्गातही तिचं लक्ष पूर्वीसारखं लागेना. अभ्यासात ती मागे पडत चालली तशी अकारण चिडचिड वाढू लागली. तिच्या शिक्षिकांनाही याचा उलगडा होत नव्हता. ही मुलगी अभ्यासात, दैनंदिन व्यवहारात मागे पडत चाललीय ती नेमकी कशामुळे? कधी रागावून तर कधी आंजारून-गोंजारून त्यांनी तिला ताळ्यावर आणायचा प्रयत्न केला. दर वेळी ही खात्री द्यायची, "इथून पुढं नाही होणार काही वेड्यासारखं. अभ्यास आणि सर्वच गोष्टी मी मन लावून करीन, विश्वास ठेवा." पण काही केल्या मानाला ते साधेना. हसरी, उत्साही माना एकाएकी उदास नि तापट झाली. देवी तिला पहिल्यापासूनच खूप आवडायची; पण अलीकडे अलीकडे तर मानू कोणा शिक्षिकेलाही भेटत नव्हती नि देवीशीही मनातली दुखणी बोलत नव्हती.

माना आणि लीलाचं जणू एक स्वतंत्र विश्व होतं. कितीदा तरी त्यानंतरही त्या एकमेकींसोबत रानात गेल्या. तिथं त्यांना नारायण भेटला. हे सर्व त्यांनी इतरांपासून लपवून ठेवलं. लीला एव्हाना बिनधास्तच झाली होती. ती आणि नारायण एकेकदा इतके प्रेमालापात गढून जात, की जवळपास माना आहे याचाही त्यांना विसर पडे. परस्परांना ते एकान्तात भेटत असल्याचं कुणाच्याही लक्षात येऊ नये म्हणून ते खूप धडपडत. मानाला नव्हतं ते आवडत. हळूहळू नारायण तिच्या मनातून उतरत चालला होता.

एके दिवशी मानू आणि लीलाला ताईंनी त्यांच्या खोलीत बोलावलं. बुजलेल्या, घाबरलेल्या या दोघी त्यांच्यासमोर उभ्या राहिल्या. ताईंचा चेहरा गंभीर दिसत होता. त्यांच्या पुढ्यात दोन कागद पडलेले दिसले. माना नि लीला सतरंजीवर बसल्यावर ताईंनी बोलायला सुरुवात केली, "या पत्रातलं अक्षर लीलाचं दिसतंय."

"पत्रं? कुठली? लीलानं नारायणला लिहिलेली पत्रं की काय?" मानाच्या मनात विचार चमकून गेला. मात्र तिची खातरजमा होत नव्हती.

ताई पुन्हा म्हणाल्या, "लीलाची वही नि या पत्रातलं अक्षर पडताळून पाहूनच मी हे सांगतेय. हे पत्र लीलानंच लिहिलेलं आहे. खालचं नाव मात्र बदललंय... आणि हे दुसरं पत्र कुणा मुलानं लिहिलंय? हा कोण? नाव सांगतेस का? या पत्रात मानाचा उल्लेख आहे. म्हणजे तो मानालाही ओळखतो असाच याचा अर्थ."

मानाला वाटायला लागलं, आता आपला श्वासोच्छवास थांबणार बहुतेक.

ताई म्हणत होत्या, "लीला मला काहीच सांगणार नाही, कारण तिला एवढं धाडसच व्हायचं नाही... पण माना मात्र नेहमी खरं बोलते. त्यामुळे मानू निर्भयपणे मला घडलेलं सारं काही सविस्तर सांगेल याची मला खात्री वाटते."

मानू तशी गोंधळलीच. लीलाकडे बघते तर ती भुईकडे डोळे लावून बसलेली.



पुन्हा ताईंकडे बघत धीटपणानं त्यांना सर्व सांगून टाकावं असा निर्णय घेऊन मानानं सारं साद्यंत कथन केलं. सांगून टाकल्यावर तिच्या लक्षात आलं, अरे, लीला रडतेय.

"माना, मी तुझी आभारी आहे. लीला, आता तू सांग, त्या मुलाशी तू लग्न करणार आहेस का?" ताई विचारत होत्या.

"माझी आई यासाठी कधीच परवानगी देणार नाही ताई, कारण तो खालच्या जातीतला आहे." लीलाला रडू आवरत नव्हतं.

"पण तुम्ही दोघं सुखात राहू शकाल अशी खात्री वाटत असेल तर मी तुझ्या आईकडे शब्द टाकीन. आपल्या आश्रमात आपण जातपात कुठं मानतो? या सगळ्या निरर्थक गोष्टी आहेत. आपणा सर्वांची खरी एकच जात माणसाची!"

यावर लीला गप्पच राहिली. मानाच म्हणाली, "खरं म्हणजे तोच स्वतः लग्नाला तयार व्हायचा नाही. एकदा तोच सांगत होता, की त्याचे वडील कुठल्यातरी श्रीमंताच्या मुलीशी लग्न लावून द्यायच्या खटपटीत आहेत. मी त्याला सुचवलं, की त्या स्थळाला नकार देऊन त्यानं लीलाबद्दल घरात काय ते सगळ्यांच्या कानावर घालावं... पण त्याच्यात तेवढं धाडस नाहीये, ताई. तो वडिलांना घाबरतो. कुणा गरीब विधवेच्या मुलीशी लग्न करून द्यायला त्याचे वडील होकार तर देणार नाहीतच; उलट त्याला घराबाहेर काढतील अशी त्याला भीती वाटते. मी त्या दिवसापासून लीलाला सारखी सांगते, बाई ग, तू त्याच्याशी काहीएक संबंध ठेवू नकोस म्हणून; पण ती ऐकतच नाही."

"तुझं बरोबर आहे, माना. मुलीला असलं व्यवहारज्ञान असायलाच हवं. स्वतःच्या मनावरही पूर्ण ताबा हवा, नाही तर नेहमी कळसूत्री बाहुलीसारखं ती कोणाकोणाच्या तालावर नाचत राहणार. अशानं ती स्वतःच्या पायांवर कधीच उभी राहू शकणार नाही. मी काय म्हणतेय ते लक्षात येतंय ना तुम्हा दोघींच्या? मुली अशा मुलांच्या हातातलं खेळणं होऊन राहिल्या तर त्यांच्यावर भयंकर संकटं ओढवू शकतात."

"खरंय ताई." मानानं दुजोरा दिला.

"तुला काय वाटतं, लीला?"

"होय. आता..."

"आधी रडायची थांब पाहू. नुसतं दुःख उगाळत बसल्यानं काहीच व्हायचं नाही." ताई ठामपणे सांगत होत्या, "जे झालं त्याच्यापासून आता धडा घ्यायचा. इथून पुढं पश्चात्ताप होईल अशा चुका होऊ द्यायच्या नाहीत, बरं का? माना, तुलासुद्धा व्यावहारिक निर्णय घेऊन तो अमलात आणायला शिकलं पाहिजे. अजून तुला हे जमत नाही. ते जमल्यावरच तुझ्या व्यक्तिमत्त्वाला बळकटी, पक्केपणा येऊ शकेल. आश्रमात आम्ही तुम्हा मुलींना शिकवू पाहतो ते हेच!"

"मला आता थोडं थोडं उमगतंय. ताई, मध्यंतरी मी अभ्यासात आणि इतर किती तरी गोष्टींमध्ये मागं पडले याचं कारण म्हणजे लीलाचं चुकत असूनही मी तिला रोखू शकले नाही. आमचं चुकतंय हे स्पष्टपणे कळत असूनही कळत नसल्यासारखं आम्ही वागलो याची टोचणी मनाला लागली होती."

लीलाही म्हणाली, "त्या मुलाशी मी आता कसलाही, कुठलाही संबंध ठेवणार नाही."

"अगदी बरोबर! आता या पत्राची योग्य ती विल्हेवाट लावून टाका. तुमच्या वर्गशिक्षिका ताईंना ती वहीत सापडली होती." ताईंचा सूर दिलाशाचा होता. "आणि एक लक्षात ठेवा, कधीही कुठलाही निर्णय घेताना मन द्विधा झालं तर मला खुशाल येऊन विचारत जा. विषय कुठलाही असला तरी चालेल. या आता." ताईंनी हसत निरोप दिला; पण चेहऱ्यावरचं गांभीर्य ओसरलेलं नव्हतं.

काळजावरचा धोंडा उतरल्यासारखं होऊन लीलानं विचारलं, "ताई, तुम्ही क्षमा केलीत ना मला?"

"आता ते काय निराळं सांगायला हवं? तुम्हा दोघींना आता योग्य काय ते कळलं असेल आणि यापुढं तुम्ही मूर्खासारखं वागणार नाही अशी अपेक्षा ठेवून तुम्हाला क्षमा केली आहे." ताईंनी उत्तर दिलं; पण जरा कठोरपणेच.

बोर्डाच्या परीक्षेला चारच महिने राहिले होते. ताईंसोबत त्या दिवशी जे बोलणं झालं त्याचा परिणाम मानाच्या मनावर खोलवर झाला होता. ती गांभीर्यानं अभ्यासात गढून गेली. हिवाळ्याच्या सुटीत तिनं घरी जायचंसुद्धा टाळलं. गेल्या वर्षी ती अशीच घरी गेली होती त्या वेळी घरचे सगळे आनंदले होते. माय, आजी नि गावातली वडीलधारी मंडळी त्या वेळी एकीकडं एकमुखानं मानाचं गोडवेही गात होती नि दुसरीकडं माना आता बरीच मोठी झाली म्हणून तिच्या लग्नासाठी उतावळीही झाली होती. सुदैवानं बाबा घरी आले नव्हते, नाही तर या घडामोडींना आणखी गती आली असती.

त्या वेळी बाबांची छावणी बर्फाळ भागात होती. मार्चपर्यंत तिथून हलता येत नसल्यानं त्यांनी पत्रानंच एका स्थळासंबंधी घरी कळवलं होतं. त्या वेळी आजीला ढीग वाटत होतं की मानानं आता आश्रमात न जाता इथेच राहावं; पण स्वतः बाबा तिथं नसल्यानं लग्न ठरवणं वगैरे गोष्टी आड आल्या नाहीत. त्यामुळे मानाची सुटका झाली.

मानाला ते सर्व आठवलं. आजीशी तिचं भांडण झालं होतं. मानानं कितीदा तरी जेवणावर राग काढला. आजीनं तंबी दिली, "परत जायला गाडीभाड्याला पैसे मिळणार नाहीत!" निश्चयाच्या अढळपदी बसलेली माना परत जायच्या आदल्या दिवशी हताशपणे बराच वेळ बसून राहिली. आता पुढं आपल्याला शिकायलाच मिळणार नाही? तिच्या मनात विचारांची वादळं सुरू झाली. रात्री मात्र तिचा निर्णय पक्का झाला होता. पाठिंबा मिळो न मिळो, आपण परत जायचंच. दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे उठून, आन्हिकं उरकून तिनं कपडे आणि इतर वस्तू झोळीत ठेवल्या. धाकट्या भावाला कुरवाळून, मायचा निरोप घेऊन ती एकटीच निघालीसुद्धा. आजीचा तर स्वतःच्या डोळ्यांवरच विश्वास बसेना. माना खूप लांबवर आली तेव्हा गावातला एकजण तिच्यापर्यंत वेगात चालत येऊन पैसे देऊन गेला. मायनंच त्याच्या हाती गाडीभाड्याचे पैसे देऊन सोय केली होती. हे सगळं आठवल्यामुळे तर घरी परत न जायचा तिचा निर्णय आणखी पक्का झाला.



सुट्टीत मानूनं अभ्यास तर मनापासून केलाच केला, शिवाय आश्रमातल्या सर्व उपक्रमांमध्येही ती पुरेपूर सहभागी झाली. सुट्ट्या संपल्यावर मुली आश्रमात परतल्या. लीला मात्र आली नाही. पुढं न शिकण्याच्या तिच्या निर्णयामुळे ताई नि माना दोघींनाही खूप वाईट वाटलं, पण या संबंधात अधिक विचार करण्यात त्यांनी वेळ घालवला नाही. उलट, मानानं तर आता अभ्यासातच पूर्ण डोकं घातलं नि तिला त्याचं फळही मिळालं. ती पहिल्या वर्गात पास झाली. निकाल लागल्याच्या दुसऱ्या दिवशीच बाबा भेटायला आले. कारण ते रजा घेऊन घरी निघाले होते. या भेटीत बाबाही खूप खूष झालेले दिसले. आपली लेक केवळ लिहिण्या-वाचण्यातच पुढे आली असं नव्हे तर तिची शरीरप्रकृतीही पहिल्यापेक्षा खूप सुधारली हे जाणवल्यामुळे ते स्वाभाविकच आनंदले. मोठ्या अभिमानानं बाबा ताईंना म्हणाले, "आमच्या गावात बोर्डाची परीक्षा पास व्हायचा पहिला मान माझ्या पोरीला मिळालाय!"

ताईंनी पुस्ती जोडली, "हे तर काहीच नाही. मानूनं आता तिच्या भावी जीवनाबाबतचा महत्त्वाचा निर्णय घ्यायची वेळ आली आहे. तिच्या या निर्णयात तुम्ही तिच्या पाठीशी असायला हवं. त्यानंतर ती जसजशी घडेल त्यानं तुम्हाला तिच्याबद्दल आणखी जास्त अभिमान वाटेल, असं मला वाटतं."

या संवादाचे अर्थ उलगडणारे कोणते प्रसंग भविष्याचा पोटात दडले आहेत याची बाबांना नीटशी कल्पना त्या वेळी तरी होती की नाही कुणास ठाऊक; पण ते 'हो' म्हणाले. मानाला सोबत घेऊन जाण्यासाठी त्यांनी परवानगी मागितली. मानूला आता घरी जाऊन वर्ष झालं होतं, म्हणून बाबांनी तिला घरी न्यायचा बेत आखला होता.

ताई म्हणाल्या, "न्या हवं तर, पण दहा दिवसांत आणून सोडा. इतर शाळांपेक्षा आमची शिक्षणपद्धती थोडी वेगळी आहे हे तुम्हाला माहीतच आहे. आम्ही जीवनशिक्षणावर जास्त भर देतो आणि त्यांचा आत्मविश्वास वाढवण्याचे निरनिराळ्या प्रकारचे प्रयत्न करत असतो. त्याचाच एक भाग म्हणून दहा दिवसांनंतर या मुलींना

ग्रामीण भागातल्या राहणीमानाचा अभ्यास करायला आम्ही एका खेड्यात पाठवणार आहोत. एक शिक्षिका सोबत जाणार आहे. तेव्हा तिला नेऊन त्या दिवसापर्यंत परत आणता येईल असं बघा."

दुसऱ्या दिवशी माना बाबांबरोबर निघाली. बसचा प्रवास संपल्यावर दोघं पायवाटेला लागली तेव्हा माना बाबांपेक्षा झपाझप दोन पावलं पुढं चालत होती. मध्येच एक बाई दिसली. मानूकडे ती टक लावून पाहत असल्यामुळे मानूला जरा अवघडल्यागत झालं. त्या बाईला चढण पार करायला मुळात त्रास होत होता, तशात तिने उंच टाचांच्या चपलाही घातल्या होत्या. त्या चपलांची आणि तिनं अंगावर घातलेल्या महागड्या साडीची तिला सवय नसावी असं एकंदर हालचालींवरून जाणवत होतं. तिला शहरात राहायला लागून अजून फार काळ लोटला नसणार, असा अंदाज बांधत माना थबकली, कारण बाबा बरेच मागे राहिले होते. ती बाईही थांबली. साडी नीट करू लागली. बाबा जवळ पोहोचले तशी चटकन म्हणाली, "अरे दादा, तुम्ही? मी तर तुमच्याचसाठी एक महत्त्वाचा निरोप घेऊन निघाले होते."

"असं होय? पण तुम्ही आता कुठनं आलात? कारण सहा महिन्यांपूर्वी तुम्ही शहरात राहायला गेलात असं मला समजलं होतं." बाबांनी विचारलं.

"बरोबर आहे. कालच मी माझ्या गावात परतले अन् तिथून आज तुमच्या गावाकडे मुद्दाम निघाले होते. बरं झालं, तुम्ही वाटेतच भेटलात. ही पोरगी कोण? तुमची सर्वांत धाकटी मुलगी, ती हीच ना?" ती बाई मानूकडे निर्देश करत बाबांना प्रश्न विचारत होती.

बाबा उत्तरले, "हो. ही माझी मुलगी माना. आपण चालतच बोलू. अंधार पडायला लागलाय."

"ही कुठं गेली होती?" मानूबद्दल चौकशी.

"शाळेत ही बोर्डाची परीक्षा पास झालीय. तिच्या आश्रमातनं दहा दिवसांची सुटी मागून तिला घरी घेऊन चाललोय."

ती बाई मात्र या माहितीनं विचलित झालेली दिसली. "पोरीला चक्क पोरासारखं वाढवताय, दादा तुम्ही?"

गावात पोहोचेस्तोवर काळोख वाढला होता. मानू आणि बाबांना एकत्र येताना पाहून भेटेल त्याच्या चेहऱ्यावर आनंद दिसत होता; पण त्या अनोळखी बाईमुळे लगेच सर्वांचे चेहरे प्रश्नार्थक होत होते.

घरी येऊन जरा विसावल्यावर ती बाई बाबांना गंभीरपणे सांगू लागली, " नीट लक्ष देऊन ऐका, मी काय म्हणतेय ते. मी मानूसाठी एक चांगलं स्थळ आणलंय."

दुसरी एखादी कुणी असती तर आपल्या लग्नाबाबत बोलणी करताहेत म्हटल्यावर



उठून आत गेली असती; पण मानू मात्र होती तिथंच बसून राहिली याचं त्या बाईला प्रचंड नवल वाटलं. ती पुढं म्हणाली, "या स्थळासारखं स्थळ आजूबाजूच्या कुठल्याही गावात शोधून सापडणार नाही. तुमच्या गावातल्या कुठल्याही मुलीला आजवर मिळालं नसेल एवढं चांगलं स्थळ. पुढाऱ्याचा मुलगा आहे. मोठ्ठं थोरलं स्वतःचं घर, भरपूर शेतीवाडी. त्यांच्या मालकीच्या एक-दोन बसगाड्यासुद्धा आहेत. मुलाच्या वडिलांनी स्वातंत्र्ययुद्धात भाग घेतला होता. बरेच दिवस ते तुरुंगात राहिले होते. त्यामुळे स्वातंत्र्यसैनिक म्हणून सरकारनं त्यांना जमीन बक्षीस दिलेली आहे."

"हो. मी पण त्यांच्याबद्दल खूप ऐकलं आहे. मोठा माणूस आहे. विधानसभेत सदस्य आहे. एवढ्या मोठ्या माणसाच्या घरात मुलगी द्यायचा विचारसुद्धा आम्ही करू शकणार नाही." मानूला बाबांची ही प्रतिक्रिया अगदी आवडली; पण ती बाई मात्र हिरीरीनं आपलं म्हणणं पटवून देत होती. "दादा, ऐका जरा. मुलाच्या वडिलांनी स्वतः माझ्या नवऱ्याला मानूबद्दल विचारलंय. त्यांना मानूबद्दल सगळी माहिती आहे. तिचं शिक्षण, तिचं त्या आश्रमात जाऊन राहणं, हे सगळं त्यांना ठाऊक आहे. त्यांची स्वतःची मुलगी पण मागं त्याच आश्रमात शिकायला होती. त्यामुळे तिथं शिकलेल्या मुली घरच्या नि बाहेरच्या कामातसुद्धा खूप तरबेज होतात, असं ते म्हणतात. माझं ऐका दादा, संधी चालून आलीय ती हातची घालवू नका. अशा लोकांशी सोयरीक व्हायला नशीब लागतं. हे लग्न झालं तर तुमच्या लेकीचीसुद्धा खेड्यातल्या खडतर रहाटगाडग्यातनं सुटकाच होईल. ती आरामात राहील." ती बाई बाबांच्या थोडं जवळ सरकून खासगीच्या सुरात कुजबुजत म्हणाली.

बाबांनी तिला उत्तर देण्याचं टाळून उलट प्रतिप्रश्न केला, "मुलाच्या वडिलांचं नका मला सांगू. प्रत्यक्ष नवरामुलगा काय करतो, किती शिकलाय, कसा आहे, त्याची मला माहिती सांगा. कारण काय आहे, अशी बड्या बापांची चिक्कार पोरं मी पाहिलेली आहेत. एकजात सगळे कामचुकार! शिकायच्या नावानं बोंब आणि दारू पिऊन धिंगाणा घालणारे, बापाच्या नावाचा गैरफायदा घेणारेच दिवटे दिसतात जिकडे-तिकडे. मला ते अजिबात आवडत नाहीत. अशा मुलांचे वडील मग मुद्दामहून सालस, कष्टाळू, प्रामाणिक मुलींची स्थळं शोधतात. सुनेनं ते घर सावरावं अशी अपेक्षा त्यामागे असते. म्हणून डोंगराळ भागातल्या मुली हव्या असतात त्यांना."

"छे छे! हा मुलगा अजिबात तसा नाही. हा तर उलट शिक्षण पूर्ण झाल्यावर आणखी एका परीक्षेला बसायचं म्हणतोय. ती परीक्षा पास झाल्यावर तो कलेक्टर होईल. अख्ख्या हलद्वानी शहरात तो प्रसिद्ध आहे."

माना अगदी लक्षपूर्वक सारं ऐकत होती नि ती बाई मोठमोठाल्या बाता करून तिला प्रभावित करू पाहत होती. कारण इतर मुलींसारखी माना सहजासहजी कुणाही

सोम्यागोम्याशी लग्न करायला तयार होणार नाही हे त्या बाईलाही पुरतं लक्षात आलं होतं.

माना तटकन बोलली, "परीक्षेचा नुसता विचार करून थोडंच काही होणार आहे? भरपूर अभ्यास करून सगळी तयारी केल्याशिवाय कशी परीक्षा पास होता येईल?"

त्या बाईचा स्वतःच्या कानांवर विश्वासच बसेना. स्वतःच्या लग्नाबाबत मोठी माणसं बोलणी करताना मध्ये पडून बोलणारी मुलगी आजर तिनं कधीही कुठंही पाहिलेली नव्हती. हे काय भलतंच? अगोचरपणाचंच लक्षण! पण बाबांना मात्र मानूचा मुद्दा पटला. "बरोबर आहे", असा त्यांनी दुजोरा दिला.

त्या बाईनं आपलं घोडं दामटलं. "याला काय अर्थ आहे? त्याच्या वडिलांचं एवढं नाव आहे. एवढ्या मोठमोठ्या हापिसरसायबांशी त्यांच्या ओळखीपाळखी असताना या मुलाला परीक्षाबिरीक्षा पास व्हायची गरजच नाही मी म्हणते. त्याच्या नोकरीसाठी गरज पडली तर मंत्र्यांचे वशिलेसुद्धा सहज मिळतील."

मानानं ठामपणे सांगितलं, "मला मात्र हे आवडत नाही. प्रामाणिकपणं कष्ट करणाऱ्या माणसाबद्दलच मला आदर वाटतो अन् मुळात मला एवढ्यात लग्नच करायचं नाहीये! अजून शिकायचंय."

"दादा, हलद्वानी शहरात तर मी तुमच्या लेकीचे भरभरून गोडवे गात होते. ती किती समजूतदार आहे, रूपवान आहे, घरकामात केवढी चपळ आहे असं काय काय मी सांगत होते. इथं प्रत्यक्षात येऊन पाहते तर तिच्यात यातला एकसुद्धा गुण नाही! बघा, तिला काय शेतीकाम थोडंच करावं लागणार आहे? जंगलात जायचंही कारण नाही. आरामात बसून घरात स्वयंपाकपाणी नि बाकीचं कामकाज. एवढं केलं की झालं! चैनच म्हणायची! अशी संधी डोंगराळ भागातल्या मुलींच्या वाट्याला वारंवार येत नसते. ती नाकारली तर पुढे पस्तावशील माना." ती बाई जणू सर्व शक्ती, बुद्धी पणाला लावून बोलत होती.

मानानेही दृढपणे निर्धार जाहीर केला, "मला अजून खूप शिकायचंय. कुमाऊँ भागाच्या उन्नतीसाठी काही करता येईल असं बघायचंय. उगीचच एखाद्या मध्यमर्गीय कुटुंबातली सून होऊन राहण्यात मला स्वारस्य नाही!"

माना काय बोलतेय ते अर्थातच त्या बाईच्या डोक्यावरून जात असल्याचं तिनं मानाला सांगितलं. मग म्हणाली "तू आत जाऊन आईला स्वयंपाकात मदत कर."

माना लगेच उठून आत गेली. माय स्वयंपाक करत होती. आजी बाहेरच होती. मानाशी कुणीच काही बोलत नव्हतं. स्वयंपाक होत आल्यावर मायनं बाबांसाठी वाढून द्यायला मानूला सांगितलं. 'धुरामुळे जीव गुदमरतोय' असं माय पुटपुटत होती. त्यावर माना म्हणाली, "बाबा आयुष्यभर बाहेर काम करूनसुद्धा तुझ्यासाठी निर्धूर चुलीची सोय करू शकले नाहीत बघ."

"अशी चूल असते?"

"हो तर! आणि ती सहज करता येते."

"हो का? मग तुझं शिकून झाल्यावर तूच मला अशी चूल तयार करून दे, मानू."

"फक्त तुझ्या एकटीसाठीच कशाला, माय. मी तर आपल्या डोंगराळ भागातल्या सगळ्याच बायकांसाठी अशा चुली तयार करायच्या कामाला लागेन; पण माय, या असल्या स्थळांच्या तावडीतनं तू मला सोडवलंस तरच मला हे करता येईल." हे ऐकून माय नि आजी दोघींनाही हसू फुटलं.

बाबांनी येत्या आठवड्यात मुलाला बघण्यासाठी त्या गावात जायचं ठरवलं. ते येईपर्यंत मानूनं आश्रमात न जाता घरीच थांबावं, असं त्यांनी सुचवताच मानूनं हरकत घेतली. "कसं शक्य आहे? दहा दिवसांत मला परतायलाच हवं आणि बाबा, तुम्हीसुद्धा ताईंना तसंच कबूल केलंय ना?"

"त्यापेक्षाही तू इथं राहणं जास्त महत्त्वाचं आहे." बाबांच्या या उत्तरामुळे मानू गप्प झाली.

दुसऱ्या दिवशी ती बाई तिच्या गावी गेली. बाबा त्या स्थळाच्या गावी गेले. परतले तोवर माना आश्रमात गेली होती. बाबा खूप भडकले. ते स्थळ आणि सबंध कुटुंब बाबांना अतिशय आवडलं होतं. मुलाचे वडील "हे लग्न १० ते १५ जुलैच्या आतच उरकून टाकू," असा आग्रह धरून होते. या दृष्टीने विचार करता कुमाऊँ रीतिरिवाजानुसार विधिपूर्वक लग्नाची जुळवाजुळव करायला वेळ अतिशयच कमी होता. त्यातून मानू आश्रमात निघून गेल्यामुळे तर या सगळ्या बेतावर पाणी पडल्यासारखं झालं होतं. माय नि आजीवर बाबा आग पाखडत होते,"पण तुम्ही दोघींनी तिला जाऊ कसं दिलं?"

"अरे बाबा, तिला आता एकटीला प्रवास करायची भीती नाही वाटत. आठ मैल चालत जाऊन ती बस पकडते. या वेळी तर तिच्याकडे गाडीभाड्याला होतील एवढे पैसेसुद्धा होते. तूच तिला दिले होतेस ना?" आजी सांगत होती.

"हो, पण मी तर तिला बांगड्या अन् रिबिनींसाठी पैसे दिले होते. त्यातनं ती गाडीभाड्यासाठी उरवून बाजूला ठेवील असं मला अजिबात वाटलं नव्हतं."

"बांगड्यांची आवड तिला आता राहिली नाही." मायनं सांगितलं.

बाबांनी मानूला एक पत्र लिहायला घेतलं. हे वाचल्यावर ती असेल तशी निघून येईल, असं त्यांना वाटत होतं.

आश्रमात मैत्रिणींनी, ताईंनी मानाला पाहून आनंद व्यक्त केला तरी तिचा चेहरा मात्र काळवंडलेलाच. मानू खूप उदास असल्याचं ताईंनी सहज हेरलं नि तिला त्याचं कारण विचारलं. मानूनं त्यांना सारं सांगितल्यावर तिला मोकळं मोकळं वाटलं. ताई म्हणाल्या, ''प्रत्येकाच्याच आयुष्यात अशी वळणं येतात, मानू. आपल्या माणसांना हवं असलेलं आपल्याला स्वीकारता येत नसल्याचं आपल्याला वाईट वाटत राहतं. आपली माणसं आपल्याला समजून घेऊ शकत नसली तर आपल्या मनावर त्याचा आघात होतो. अशा परिस्थितीत आयुष्याची दिशा कोणती असावी आणि नेमकं काय काय करायचं याबाबत तुझ्या मनात पुरेशी स्पष्टता असायला हवी. तुला अशा अवस्थेत हळवं होऊन चालणार नाही हे जरी खरं असलं, तरी तुझ्या वागणुकीत कोरडेपणा किंवा रुक्षपणासुद्धा येता कामा नये. अर्थात तात्पुरतं हे सर्व आपण बाजूला ठेवू. कारण उद्या तुला तुझ्या वर्गातल्या मैत्रिणींसोबत दुसऱ्या गावाला निघायचंय. तू परत येशील तोवर मला वाटतं की तुझे बाबा कोणत्या ना कोणत्या प्रकारे तुझ्याशी संपर्क करतील. तसं झालं तर आपण पुन्हा सविस्तर या विषयावर बोलू.'

मानू येण्याआधी या मुलींनी त्या गावात गेल्यावर काय अभ्यासायचं आहे याबाबत ताईंनी मार्गदर्शन केलेलं होतं. तिथं सादर करायच्या नाटक व इतर सांस्कृतिक कार्यक्रमांमध्ये मानूनं कोणत्या जबाबदाऱ्या उचलायच्या आहेत, हेसुद्धा मानू इथं नव्हती तरी ठरवण्यात आलेलं होतं. या सर्व बाबींची माहिती घेताना मानू त्यात अशी काही रंगली, की तिच्यासाठीचं स्थळ, त्यामुळे निर्माण झालेला मनस्ताप या साऱ्यासाऱ्याचा तिला विसर पडला.

या अभ्यासदौऱ्यामुळे ग्रामीण भागातल्या लोकांचे किती तरी गुण तिला नव्यानं उमगले. इतके दिवस आपल्या हे लक्षात कसं आलं नव्हतं, असंही तिला वाटलं. तिथली माणुसकी आता जणू तिची प्रेरणा ठरली. किती तरी नवनवीन विचारांचा उदय तिच्या मनात झाला.

आश्रमात परतल्यावर ताईंनी दोन पत्रं तिला दिली. पहिलं पत्र बाबांनी संतापाच्या भरात लिहिलेलं होतं : 'तुझं बरं-वाईट मला उत्तम कळतं. मी तुझ्यापेक्षा चार पावसाळे जास्त पाहिलेले आहेत. तुझ्या वयाच्या मुलीला समज ती कितीशी असणार? तेव्हा तत्काळ परत ये. लग्नाला 'हो' म्हण. उत्तर-पूर्व सीमेवर गडबड सुरू झाल्यानं मला मोहिमेवर जावं लागेल. परतेन की नाही ते सांगता येत नाही. कमलाचं ओझं डोक्यावरनं गेलं. धाकटा तर मुलगाच. मोठा झाल्यावर त्याचं तो पाहील. तुझी जबाबदारी घेऊन मला मरण पत्करायचं नाही.' वगैरे वगैरे.

बाबांचं दुसरं पत्र अगदीच लहानसं होतं. त्यातल्या मजकुरावरून समजलं की त्यांना अचानक परतावं लागलं. मानूसमोर तिच्या भविष्यातल्या कृतिकार्यक्रमाचा आराखडा स्पष्टपणे रेखाटलेला असला, तरी बाबांना याबद्दल काय नि कसं सांगायचं हा तिच्यापुढे मोठा प्रश्न होता. तिच्या मनात विचारांची आवर्तनं चाललेली होती. अशा तऱ्हेच्या लग्नानंतर मिळणारं सुख मला नकोय. खरं म्हणजे अशा प्रकारे सुख मिळणं हा भ्रमाचा भोपळाच असतो अनेकदा. परुलीच्या बाबतीत हा भोपळा असाच तर फुटला. बाबा बाहेरच्या जगात भरपूर राहिल्यानं त्यांना खूप कळतं हे जरी खरं असलं, तरी मलासुद्धा काही तरी कळतं हे त्यांना का खरं वाटत नाही? मुलगे लहान असले तरी त्यांना खूप समजतं नि मुली केवढयाही मोठ्या झाल्या तरी त्यांना स्वतःचं हित-अहित अजिबात कळत नाही, असं काय म्हणून धरून चालतात ही माणसं? बाबांनी परुलीच्या बाबतीत त्यांची जबाबदारी नीट पार पाडली असं म्हणता येईल का? मी तर आता परुलीलासुद्धा या आश्रमातच घेऊन येईन, म्हणजे तिचं तिला स्वतःच्या पायांवर उभं राहता येईल.

''कसला विचार चाललाय, माना?'' ताईंचा आवाज ऐकून माना क्षणभर दचकलीच.

''काही सुचेनासं झालंय, ताई.'' मानूने त्या दोन्ही पत्रांतला मजकूर आणि तिच्या मनात येऊन गेलेले विचार ताईंना सांगितले.

''तू अगदी योग्य तोच विचार करते आहेस, मानू. मला तुझा अभिमान वाटतो. पण तू तुझ्या बाबांना मात्र असं सांगू नकोस, की त्यांना त्यांची जबाबदारी नीटपणे पार पाडता आली नाही. त्यांना खूप वाईट वाटेल ना.''

''मग लिहायचं तरी काय? मी माझ्या भागातल्या खेड्यांमधल्या माणसांची जीवनोन्नती करणारं काही करू म्हणतेय, ताई. या वेळी परतल्यापासून तर मी ठाम निर्धार केला आहे. समाजपरिवर्तन हे माझं ध्येय आहे. या लग्नामुळे ते पुरं होऊ शकणार नाही.''

''असंच काही नाही, माना. तो मुलगाही जर तुझ्याच विचारांचा असला तर नक्कीच तुझी ध्येयं पुरी करायला तुला त्याचीही मदत मिळू शकेल.'' ताईंनी समजूत घातली खरी; पण न राहवून त्यांनी पुढं त्यांचं मतही व्यक्त केलं, ''तो ज्या प्रकारच्या वातावरणात राहतोय त्यावरून तरी सामाजिक उन्नतीचा विचार कितीसा करत असेल त्याबद्दल सांगणं अवघड आहे. त्याला बहुधा पैसे कमावण्यातच रस असणार; पण तू त्याच्यापुढे तुझ्या अटी ठेव. त्याला जर खरंच तुझ्याशी लग्न करायचं असेल तर तो त्या अटीही नक्की मान्य करील.'' ताईंनी मार्ग सुचवला खरा; पण तो प्रत्यक्षात आणणं सोपं नाही हे त्यांचं त्यांनाही कळत होतं.

मानूनं विचारलं, ''बाबांनी तर लिहिलंय की ताबडतोब निघून ये. आलीस की मला तार कर, म्हणजे दोन-चार दिवसांसाठी मी येऊन लग्नाचं पक्कं करून जाईन. या

सगळ्याला मी काय उत्तर देऊ, ताई?''

ताईंनी थोडा वेळ विचार केला. मग म्हणाल्या, ''इथून नको लिहूस. घरी जा. तिथून पत्र लिही. त्यात तुझ्या अटीसुद्धा लिही. म्हणजे त्यांची आज्ञा पाळल्यासारखंही होईल. तुझं म्हणणंही स्पष्टपणे त्यांना कळेल. प्रेमानं सांगितल्यामुळे ते तुझ्या हिताचा निर्णय घेण्याची शक्यता अधिक वाढते, मानू.''

''अटी तर त्या मुलालाच समक्ष बोलावून घालायला हव्यात. मी उद्याच निघू का?''

''चालेल.'' परवानगी देऊन ताईंनी तिला ही नाजूक समस्या कशी हाताळावी या संदर्भात आणखी काही मौलिक सूचना दिल्या.

मानू परतलेली पाहून आजीला अतिशय आनंद झाला. इकडं यायला निघण्यापूर्वी मानूनं अटींचा उल्लेख करून बाबांना एक पत्र रवाना केलं होतं; पण त्याबाबतचा उल्लेखही आजीसमोर करायचं तिनं कटाक्षानं टाळलं.

दुसऱ्या दिवशी तिचे डोळे उघडले ते रानात निघालेल्या बायकांच्या आवाजांमुळे. ती काही दिवसांपूर्वी अभ्यास शिबिरात ज्या बायकांशी भेटली, बोलली होती; त्यांची तिला आठवण झाली. पक्का रस्ता झाल्यामुळे मोटारी थेट गावापर्यंत येतात. जंगलातल्या झाडतोडीचं काम त्यामुळे वाढलंय. या गोष्टीचा त्या बायकांना किती आनंद झालेला होता! त्यामुळे त्यांच्या पर्यावरणाचं, पर्यायानं त्यांच्या भवितव्याचं काय, किती नि कसं नुकसान होतंय हे त्यांच्या गावीही नव्हतं. उलट रस्त्याची सोय झाल्यामुळे कंत्राटदार वाट्टेल तेव्हा येतात नि हवी तेवढी स्वतःची तुंबडी भरून जातात, हे बायकांना समजावून सांगायला पाहिजे आहे. खरं तर त्यांच्या घरातल्या चुलींना त्यामुळे लाकूड मिळेनासं झालंय. मी या बायकांना संघटित करीन. 'चिपको आंदोलना'द्वारे ही अनियंत्रित बेकायदा लाकूडतोड थांबवण्यासाठी अथक प्रयत्न करीन. जंगलतोड थांबली की मग वृक्षारोपणाच्या साह्यानं पुन्हा सारं जंगल हिरवंगार झालं पाहिजे. याशिवाय एक पाळणाघरसुद्धा सुरू करायला हवं. त्यामुळे दिवसभर काबाडकष्ट करणाऱ्या बायकांच्या मुलांची सोय होईल.

''चहा झालाय!'' मायचा आवाज ऐकून मानू भानावर येत म्हणाली, ''मी चहा सोडलाय माय.''

माय म्हणाली, ''तू आता दिवसेंदिवस तुझ्या बाबांच्याच वळणावर जायला लागलीयस, मानू. एकदा एक ठरवलं की ठरवलं. त्यात पुन्हा बदल नाही तो नाहीच!''

''माय, तू मनापासनं म्हणतेस का ग हे? तुझ्या तोंडून हे ऐकून मला किती बरं वाटलं बघ! निदान तू तरी मला अबला समजत नाहीस. मी दुबळी राहून चालणारच नाही. उलट, पक्कं ठरवून मी आता डोंगराळ भागातल्या महिलांसाठी लवकरात लवकर कामाला लागायला हवं.'' मानाच्या वाक्यावाक्यातून आत्मविश्वास जाणवत होता.



घर स्वच्छ करून मानू गोठा साफ करायला गेली. खताचा ढीग तिनं व्यवस्थित रचला. ''माय, आपणसुद्धा खतासाठी इथं जवळच एक खड्डा खणायला हवा. त्यात खत साठवलं की ते चांगल्या प्रकारे तर कुजतंच, शिवाय माश्यांचाही त्रास कमी होतो.''

''मुली नेहमी कामांबाबतच विचार करतात. मुलग्यांचं तसं नसतं. आता हा धाकटाच बघ. जागा झालेला नाही नि अजून तासभर तरी उठायचा नाही. खायचं, खेळायचं नि झोपायचं, एवढंच त्याला जमतं.'' माय गाऱ्हाणं मांडत होती.

''का? अभ्यास नाही करत?''

''शाळेत होईल तेवढाच. घरात तर चुकूनही त्याच्या हातात वही-पुस्तक दिसायचं नाही. बाबा घरी आले की त्यांच्यासमोर बसून थोडाफार अभ्यास करतो.''

मानू म्हणाली, ''माय, कुठवर चालणार असं?''

''कुणास ठाऊक? तुझे बाबा त्याला नैनितालला शिकायसाठी पाठवणार आहेत. तिथं त्याच्यासाठी दर महिना पाचशे रुपये पाठवावे लागतील. बाबा म्हणत होते, तुझं लग्न झालं की त्याच्या शिक्षणाची नि नोकरीचीही चिंता आपोआपच दूर होईल. तुझ्या सासऱ्यांच्या खूप ओळखी आहेत ना, म्हणून. हा मोठा झाला नि शिकून-सवरून नोकरीला लागला की मलासुद्धा शहर नीट बघता येईल.'' मायच्या डोळ्यांत स्वप्नं उमटली होती.

हे सगळं ऐकून माना भावनेच्या भरात वाहून या लग्नाबाबत पटकन 'हो' म्हणणार, तेवढ्यात ती स्वतःची स्वतःच सावरली. छे छेऽऽ! असं भावनांमध्ये भरकटून कसं चालेल? स्वावलंबी आणि स्वयंसिद्ध जर खऱ्या अर्थानं व्हायचं असेल तर मी माझ्या ठरवलेल्या वाटेनं जाऊनसुद्धा मायचं स्वप्न पूर्ण करू शकेन. हळूच तिनं मायला सांगितलं, ''मी इथे आलेय, पण अजून त्या स्थळासाठी होकार दिलेला नाहीय.''

''का?''

''अग, माझ्या काही अटी आहेत. त्या जर त्यानं मान्य केल्या तरच मी होकार देऊ शकेन, पण त्यासाठी त्याला इकडे बोलवायला हवं. तू त्याला तसा निरोप देऊन बोलावून घे माय, म्हणजे एकदाचा काय तो निर्णय तरी घेता येईल.''

''काय म्हणालीस? त्याच्याशी बोलणार तू? लग्नाआधीच? अनोळखी मुलाशी अशा पद्धतीनं बोलावंसं सुचलं तरी कसं तुला? आणि तोही तुझा होणारा नवरा आहे हे माहीत असताना?''

मायनं आजीला सांगितल्यावर संतापानं तिचं जणू भानच हरपलं. "त्या आश्रमात राहून तर ही वायाच गेली बघ! नेहमीच ही आपल्यासमोर कुठलं ना कुठलं संकट उभं करत असते. पण हिचं हे बोलणं गावातल्या कुणालाही कळू देऊ नकोस बरं, नाही तर आपली छी-थू होईल."

"माझंसुद्धा ऐकून ठेवा! त्या मुलाला जर बोलावणं धाडलं नाही अन् मनाविरुद्ध माझं लग्न त्याच्याशी केलं तर मी गळफास लावून घेईन!" मानूला स्वतःलाही काही वाटलं नव्हतं की ती कधी तरी असं बोलून जाईल म्हणून. ती म्हणाली खरी; पण नंतर तिचा तिलाच आपल्या अशा बोलण्याचा पश्चात्ताप वाटला.

मायनं मध्ये पडून आजी-नातीचं भांडण थोपवलं. गावातले एक शिक्षक हलद्वानीला दुसऱ्या दिवशी गेले, त्यांच्याकरवी निरोप पाठवला.

त्यानंतर एके दिवशी पांढऱ्या रंगाचे नि शहरी पद्धतीचे कपडे घातलेला एकजण त्यांच्याकडे आला. तो मुलाकडचाच कुणी असावा असा अदमास होता, पण शहरी माणसाचं आगतस्वागत कसं करतात याची माहिती माय नि आजीला नव्हती. मानूनंच हात जोडून 'नमस्ते' म्हटलं. चहा करून दिला. त्या पाहुण्याजवळ बसून मोकळेपणी बोलणं सुरू केलं, तेव्हा कुठे माय नि आजीला हायसं वाटलं. चला, घरात शहरी रीतिरिवाज माहीत असलेलं कुणी तरी आहे.

ते गृहस्थ म्हणाले, "मी मुलाचा काका. मुलाचे वडीलच खरं तर येणार होते, पण त्यांना अचानक काम निघालं म्हणून मी आलो. तुला भेटून आनंद वाटला. डोंगराळ भागातल्या मुलीचे सगळे गुण तर तुझ्यात आहेतच, शिवाय शहरातले शिष्टाचारही तुला चांगले माहीत आहेत. तुझ्यासारखी सून मिळणं हे आमच्या दृष्टीने भाग्यच, मुली!'

"आभारी आहे, पण मी अजून तुमच्या पुतण्याला होकार दिलेला नाहीये. मला आधी त्यांच्याशी बोलायचंय. माझ्या काही अटी आहेत." मानू शांतपणे सांगत होती. तिच्या आवाजातही नम्रपणा होता.

"त्याची काय गरज? शहरात जरी तुम्ही मुलं-मुली लग्नाआधी एकमेकांना भेटत असलात तरी खेड्यातले रीतिरिवाज वेगळेच असतात हे तुलाही माहीतच आहे."

"इतर शहरी मुलींसारखं मला अजिबातच ते कसे दिसतात हे बघण्यात रस नाही. मला त्यांच्याशी जे बोलायचं आहे ते माझ्या दृष्टीनं अतिशय महत्त्वाचं आहे. मला माझं आयुष्य जसं समाजसेवेसाठी समर्पित करायचं आहे तसंच त्यांनाही वाटतंय की नाही, ते मला बघायचंय. त्याचप्रमाणे हे लग्न जर झालंच तर वैवाहिक जीवन कशा स्वरूपाचं राहील याची त्यांच्या मनातली कल्पना मला समजून घ्यायची आहे."

"ते सगळं ठीक आहे, बाळ. पण मी आलोय ना? आणि वैवाहिक जीवनाची



फिकीर आतापासून कशाला करतेस? सगळं ठीकच होईल."

"क्षमा करा," मानू ठामपणे म्हणाली, "तुमच्या येण्यामुळे ही कोडी उलगडणार नाहीत. शेवटी, लग्न व्हायचं ते तुमच्या पुतण्याशी, तुमच्याशी नव्हे! तेव्हा कृपा करून तुम्ही तुमच्या पुतण्यालाच पाठवावं अशी मी तुम्हाला विनंती करते आहे."

त्या काकांना जरा धक्का बसल्यासारखं दिसलं; पण लगेच सावरून ते 'ठीक आहे' म्हणाले. मानाला मात्र ते खरोखरच पुतण्याला पाठवतील की नाही याबद्दल शंका वाटत होती. आजीची मात्र खात्री पटली होती की मानूला काही आता ती मंडळी सून म्हणून स्वीकारणार नाहीत. माय पाहुण्यांसाठी स्वयंपाक करत होती. मानू म्हणाली, "माय, शहरातल्या माणसांना पाटावर बसून नाही जेवता येत. आपण त्यांना इथं वर बोलावून घेऊ. या गालिच्यावर बसून त्यांना जेवू देत."

"तू म्हणशील तसं. मला तरी यातलं काही कळत नाही." मायनं मानूवरच सारं सोपवलं.

दुसऱ्या दिवशी परत जाताना पाहुण्यांनी माय नि आजीजवळ मानूचं भरभरून कौतुक केलं. ते गेल्यावर त्यांनी आणलेले मिठाईचे डबे उघडताना माय म्हणाली, "एवढ्या प्रकारची मिठाई? एवढं तर लग्नातसुद्धा दिलं जात नाही."

आजी आनंदली होती. "हो. आता ही मिठाई थोडी थोडी गावात सगळ्यांना द्यायला हवी."

गावात एकच चर्चा सुरू झाली. "काय पण दिवस आलेत! नवरी मुलगी सासऱ्याला म्हणते, नवऱ्या मुलाला पाठवून द्या म्हणून!" गावातल्या रूढी-परंपरांशी हे एक प्रकारचं बंडच होतं. मानाच्या भावाच्या शाळेतही तोच विषय.

मानू गप्प राहिली. तिनं घडलं ते सारं पत्रात लिहून ताईंना कळवलं. एके दिवशी पोस्टमन दोन पत्रं देऊन गेला. बाबांचं पत्र : 'काही अटीबिटी चालायच्या नाहीत. तुझं शिक्षण पुरेसं झालेलं आहेच. मध्यमवर्गीय कुटुंबात आरामात आयुष्य घालवायची संधी मिळायला मोठं भाग्य लागतं. ते तुला मिळतंय. त्याचा उपयोग करून घे.' दुसरं पत्र ताईंचं होतं : 'तुला तुझं ध्येय गाठण्यात यश मिळो. धीर सोडू नकोस. तुझ्या उदाहरणावरून पुढं अनेकजणींना प्रेरणा मिळणार आहे.'

थोड्या दिवसांनी गावातल्या काहीजणांना तो येताना दिसला. देखणा, सभ्य वाटणारा एक तरुण. हा मानाचाच होणारा नवरा असणार. मुलींमध्ये लगोलग बातमी पसरली. प्रत्येकजण त्याला बघायला उतावीळ झालेली, "माना किती नशीबवान म्हणायची! एवढा रूपवान नवरा भेटलाय तिला!"

"एवढा चांगला मुलगा असताना कसल्या अटी नि शर्ती? डोकं फिरलंय मानाचं!"

"याला पाहिलं की मानाला तिच्या अटींचा संपूर्ण विसर पडेल."

एक ना दोन. विविध प्रकारचे शेरे नि मतं. मानूनं मात्र कोणताही संकोच न बाळगता स्वतःचे विचार नि अटी त्याला नम्रपणे सांगितल्या. त्यानंही मोकळेपणानं ते सर्व ऐकून घेतलं. तो मुलगा नि त्याच्यासोबत आलेला त्याचा मित्र जेवून त्याच दिवशी गावी परतले. मानानं या घटनेचा वृत्तान्त बाबांना पत्रानं कळवला नि दुसऱ्या दिवशी सकाळी ती आश्रमाकडे निघाली. तिच्यासमोर समाजसेवेचं फार मोठं कार्य उभं होतं नि वेळ थोडा होता. तिला सर्व शक्ती एकवटून या कामात स्वतःला झोकून द्यायचं होतं.

आश्रमात आता तिच्या जबाबदाऱ्या वाढल्या होत्या. बागकामात इतर मुलींवर देखरेख ठेवायचं काम सोपं नव्हतं. तिनं त्यानंतर अभ्यासात तर कधी कसूर केलीच नाही, पण सर्व उपक्रमांमध्ये जाणीवपूर्वक स्वतःचा सहभाग वाढवला. आश्रमाच्या व्यवस्थापनात तिच्या कामाचा वाटाही आता शिक्षिकांएवढा झाला होता.

अधूनमधून बाबांच्या पत्रातून कळायचं, की तो मुलगा तिच्यासाठी थांबलाय. मग तिच्या मनात यायचं, त्याच्या त्या परीक्षेचं काय झालं? दिला असेल नाद सोडून. त्या मुलानं अद्याप दुसऱ्या कुणा मुलीशी लग्न केलं नाही, एवढंच तिला ठाऊक होतं. एके दिवशी त्याचे वडील काहीजणांसोबत आश्रमात आले. ताईंनी मानाशी त्यांची भेट घडवली; पण त्या मुलाबाबत काहीच बोलणं झालं नाही.

पुढं एकदा ताईंना बरं नव्हतं. त्यामुळे त्यांनी लखनौतल्या एका कार्यक्रमाचं निमंत्रणपत्र दाखवत मानाला 'जाणार का?' म्हणून विचारलं. उत्तर भारतात गांधीजींच्या विचारप्रणालीनुसार काम करणाऱ्या कार्यकर्त्यांचं ते संमेलन होतं. जंगलतोडीबाबतही चर्चा होणार होती नि या विषयात मानाला खूप रस असल्याचं ताईंना माहीत होतंच. मानानं होकार दिला. तिला एकटीलाच जावं लागणार असल्यानं आपल्याला हे जमेल की नाही असा तिला संभ्रम पडलेला होता.

ताईंनी प्रोत्साहन दिलं, "का नाही जमणार? पुढं कधी तरी तुला एकटीनं वाटचाल करायचीच आहे. सुरुवातीला कठीण वाटेल, पण अशक्य काहीच नाहीये त्यात. अनोळखी माणसांच्या बाबतीत मात्र तुला सावध राहायला हवं. शिवाय पैसेही सांभाळून ठेवायची सवय करून घे. मी हलद्वानीच्या एका मैत्रिणीला पत्र लिहीन. त्यांची तुला तिथं खूप मदत होईल. तिथून लखनौची गाडी पकड. तू हे सगळं नीट पार पाडशील याची मला पुरेपूर खात्री आहे."

"मी प्रयत्न करीन." मानाही उत्साहानं म्हणाली.

ठरल्याप्रमाणे ती कामाला लागली. प्रवासात काहीजणांच्या तोंडून कळलं की हलद्वानीतल्या एका पुढाऱ्याच्या मुलाला अपघात झालाय. कोणी तरी म्हणाली, "त्यानं नुकतंच जंगलतोडीचं कंत्राट घेऊन धंद्याला सुरुवात केली होती. एक ट्रकसुद्धा घेतला होता. लाकडांनी भरलेला तो ट्रक नदीत पडला. दारू पिऊन ट्रक चालवल्यावर आणखी दुसरं काय होणार?"



"बड्या बापाचा पोरगा! चांगला इलाज करतील. मोठ्या डॉक्टरला बोलावतील. वाचेलसुद्धा."

ऐकता ऐकता मानाच्या डोक्यात चक्र सुरू झालं. त्यानं तर वचन दिलं होतं. गावकऱ्यांच्या उन्नतीसाठीच तो काम करणार असं आपल्याला म्हणाला होता. केलं मात्र भलतंच. जंगलतोडीचं कंत्राट घेतलं. दारूसुद्धा घेतो. गावाचा विकास कसला करणार? हा तर उलट नायनाट करायला निघालाय. हे सगळं आपल्या जीवनमूल्यांच्या सर्वस्वी विरुद्ध आहे, विपरीत आहे... पण हे सगळं खरं कशावरून म्हणायचं? कदाचित अफवाही असू शकतील.

दुसऱ्या दिवशी संमेलनस्थळी ती जाऊन पोहोचली. तिथं आधी आलेली माणसं समोरच्या कागदांमध्ये गढून गेलेली दिसत होती. तिला आदल्या दिवशी प्रवासात भेटलेली मुलगी तिथं दिसली. मानूही तिच्याजवळ येऊन बसली. हळूहळू सबंध हॉल भरला. काही मुलींनी समोर येऊन स्फूर्तिगीत म्हटलं.

संमेलनाचं उद्‌घाटन एका वयोवृद्ध महिलेच्या हस्ते झालं. या बाईंनी चैनीचं जीवन सहजपणे सोडून स्वतःला स्वातंत्र्ययुद्धात झोकून दिलं होतं. खस्ता खाल्ल्या होत्या. देश स्वतंत्र झाल्यावर त्या एका गावात जाऊन राहिल्या होत्या नि त्यांनी गांधीजींच्या विचारांनी प्रेरित होऊन महिला नि बालकांच्या कल्याणासाठी तिथं विविध प्रकारचं कार्य केलं होतं. खऱ्या अर्थानं ग्रामस्वराज्यप्राप्तीचं काम त्या करत होत्या. त्यांच्या भाषणात आदर्श नि अनुभव यांचा सुरेख मेळ जमून आलेला होता. त्यांचा शब्दन् शब्द मानूला तिच्या जीवनाच्या संदर्भातही मार्गदर्शक वाटत होता.

त्यांचं भाषण संपल्यावर माना त्यांच्या खोलीत गेली. तिथं त्यांचं अंथरूण जमिनीवर घातलेलं होतं. त्यांच्या साधेपणाचा विलक्षण प्रभाव मानूवर पडला. त्यांच्या भाषणामुळे तिच्या मनात संचारलेला उत्साह तिच्या बोलण्यातून व्यक्त होत होता. तिनं तिच्या स्वतःच्या जीवनासंदर्भात त्यांचा सल्ला मागितला. त्या बाईंनाही अशा उत्साही तरुणींना सामाजिक जागृतीच्या कामात गुंतवणं बहुधा आवडत असणार. त्यांनीही तेवढ्याच उमेदीनं ग्रामोद्धारासंबंधी संघटना कशी बांधावी, याबद्दल तिचं उद्‌बोधन करायला सुरुवात केली.

संध्याकाळच्या चर्चेत मानानं मोठ्या उमेदीनं भाग घेतला. "डोंगराळ भागातल्या महिलांना पडणारे कष्ट व ते दूर करण्यासाठीच्या व्यावहारिक पद्धती' हा विषय तिच्या गटाला मिळाला होता. हा प्रश्न खरं म्हणजे मानूच्या घरातच तिची माय, परुली, ताई नि

आजीशी निगडित होता. ज्या गावात ती काही दिवसांपूर्वी अभ्यासासाठी गेली होती, तिथल्या बायकांच्या खडतर आयुष्याचाही विचार तिच्या डोक्यात सुरू होता.

मानाच्या गटात वनांचं रक्षण करणाऱ्या 'चिपको आंदोलना'चे कार्यकर्ते तर होतेच, परंतु धरणं धरणाऱ्या बायकाही होत्या. जंगलकंत्राटदार आणि वनविभागातल्या कर्मचाऱ्यांच्या डावपेचांपासून आपल्या गावाभोवतालचं जंगल राखण्यासाठी या महिलांनी रात्रंदिवस झाडांना वेढून धरणं धरलं होतं. बेकायदा दारुभट्टीवाल्यांची दुकानं उद्‌ध्वस्त करणाऱ्या बायकाही या गटात होत्या. त्यांच्या एकेका अनुभवामुळे मानाला नवनवीन प्रेरणा मिळत होत्या.

मानाची भीड चेपली आणि तिनंही डोंगराळ भागातील महिलांच्या कष्टाबाबतची तिच्या मनातली वेदना मांडली. घरच्या उदाहरणांमुळे तिच्या वक्तव्याला भावनिकतेची डूब होती. सगळ्यात कमी वयाच्या या व्यक्तीचे विचार सर्वांनी लक्षपूर्वक ऐकले. तिनं शेवटी जो निष्कर्ष मांडला त्यानं तर सगळ्यांची मनं जिंकून घेतल्यासारखं झालं. ती म्हणाली, "डोंगराळ भागातल्या महिलांचे कष्ट कमी करण्यासाठी पावलं उचलताना शहरी महिलांचं आयुष्य डोळ्यांसमोर ठेवून चालणार नाही. शहरी महिला भुई आणि निसर्गापासून दूर गेलेल्या असतात. श्रमांना त्या तुच्छ लेखतात. त्यामुळे त्यांच्या व्यक्तिमत्वातलं तेज आणि आत्मविश्वास दिवसेंदिवस खालावत जातो. आपले विकासकार्यक्रम आखताना त्यात शासकीय योजनांचा कल हा महिलांची स्वयंपूर्ण होण्याची शक्ती घालवणारे व्यवसाय व शिक्षण पुरवण्याकडे असतो. याऐवजी गावाच्या विकासासाठी आवश्यक असलेल्या सर्व नैसर्गिक साधनसंपत्तीचं व्यवस्थापन महिलांच्या हाती दिलं गेलं पाहिजे. त्यांचं जीवन समृद्ध करू शकेल असं शिक्षण त्यांना उपलब्ध करून द्यायला हवं. नोकरीवर अवलंबून ठेवू पाहणारं शिक्षण काय उपयोगाचं?"

भाषण संपेस्तोवर मानाचा चेहरा रागानं लाल झाला होता. तिनं घाम टिपत शेवटचं वाक्य म्हटलं.

एका तरुणानं विचार मांडला, "आपण गटागटानं डोंगराळ भागात पदयात्रा काढून समाजजागृतीचं काम करावं. खरं तर यासाठी पुरुषांमध्ये जागृती आणणंही तेवढंच महत्त्वाचं आहे. अशा गटांनी त्या-त्या गावातील नैसर्गिक साधनसंपत्तीची माहिती करून घ्यावी. तिथल्या गरजांबद्दल गावकऱ्यांकडून जाणून घेऊन त्या कशा पद्धतीनं पुरवता येतील, याबद्दल स्वतःच्या अनुमानावर आधारित योजना आखावी. डोंगराळ भागातल्या शेतीला पूरक व्यवसाय म्हणून ग्रामोद्योग जोडला गेला पाहिजे. त्यामुळे तिथली अर्थव्यवस्था स्वयंपूर्ण होईल. या पद्धतीनं ग्रामस्वराज्याचा विचार आपण खेड्यापाड्यांत चांगल्या प्रकारे पोहोचवू शकू. यात ज्यांना भाग घ्यायची इच्छा



असेल, त्यांनी या कागदावर नाव आणि पत्ता लिहून द्यावा."

मानानं नाव दिलं नाही. ताईंशी या संदर्भात चर्चा केल्याशिवाय कसं बरं नाव द्यायचं?

चर्चा संपल्यावर तो तरुण तिच्याजवळ आला नि म्हणाला, "माझं नाव अरुण. तुमच्या विचारांनी मला हलवून सोडलंय. मी स्वतः दुर्गम भागात तीन वर्षं काम केलं आहे, पण तुम्ही आत्ता सांगितलेल्या किती तरी गोष्टी मला कधी सुचल्याही नव्हत्या."

मानूला यापूर्वी कधी स्वतःबद्दलची एवढी स्तुती ऐकायचा अनुभव नव्हता. म्हणून ती गोंधळली. काय बोलावं तेच तिला सुचेना.

"अर्थात तुम्ही काही फक्त इतरांवर छाप पाडण्यासाठी हे सगळं बोललेल्या नसणार. तुम्हाला डोंगराळ भागातल्या महिलांसाठी काम करायची इच्छा मनापासून असणार. हो ना?" अरुणनं विचारलं.

"हो. पण मी परीक्षा संपल्यावरच या कामाला लागणार आहे."

"तुम्ही पदयात्रेसाठी नाव का नाही दिलं? त्यामुळे खरं तर तुमच्या अनुभवात भरच पडणार."

"ताईंची परवानगी घ्यायला हवी."

"पण तुम्हाला सुट्याही असतीलच ना? त्या वेळी यात सहभागी व्हायला परवानगी लागणार नाही बहुतेक."

"तुम्हाला अजून आश्रमाचे नियम माहीत नाहीत." मानू नम्रपणे माहिती पुरवत होती. "फक्त शाळा एवढंच त्याचं स्वरूप नाहीये. ते एक मोठं संयुक्त कुटुंबच आहे आमचं."

"हो का? बरं, मग ताईंची परवानगी मिळाल्यावर तरी कळवाल?" अरुण त्याच्या आग्रहाला धरून होता. मानाला हा संवाद लांबवायचा नव्हता म्हणून तिनं वेळ मारून नेण्यापुरतं 'हो' म्हटलं.

आश्रमात परतल्यावर तिला बरं वाटलं. "लखनऊ काही मला आवडलं नाही. जावं तिथं धूळ आणि धूर. मोकळा श्वास म्हणून घेता येत नव्हता. इथं कशी स्वच्छ, निर्मळ हवा आहे." तिने आवर्जून सांगितलं. संध्याकाळच्या मीलनसभेत तिला सर्वांनी किती तरी प्रश्न विचारले. बैठकीत काय निर्णय झाले त्याबद्दल ताईंना औत्सुक्य होतं. ते सर्व सांगत तिनं अरुणनं आयोजिलेल्या पदयात्रेचीही कल्पना ताईंना दिली.

मानाची परीक्षा झाल्यावर ती ग्रामस्वराज्यासंबंधीची पुस्तकं, लेख जाणीवपूर्वक वाचू लागली. एकीकडं तिची बागकामातली प्रगतीही सुरू होती. अनुभव आणि प्रयोग दोन्ही सुरू होते. दर दिवशी ती अपार कष्ट घेत होती. हिवाळा जवळ येऊ लागला.

लग्नांचा मोसम. लग्नाबाबत घरचे जबरदस्ती तर करणार नाहीत, ना अशी चिंताही तिला सतावू लागली.

तो मुलगा दोन वर्षांपासून आपल्यासाठी लग्नाचा थांबलेला असला तरी आपण त्यात अडकायला नको. एक वचन द्यायचं अन् प्रत्यक्षात भलतंच करायचं, जंगलाचा नायनाट करायचा. असलं वागणाऱ्या मुलाशी आपण नाही लग्न करणार. किंबहुना, ताईंशी बोलून त्या पदयात्रेसाठी नाव पाठवायला हवं... असे विचार मानाच्या मनात चालत असत. ताईंच्या लक्षात आलं होतं की मानू बरेच दिवस गप्पगप्पच असते. खूप दिवसांत मनातलं बोलणंही झालं नव्हतं. म्हणून एके दिवशी त्यांनी तिच्याशी बोलायचं ठरवलं. तोवर अरुणचं पत्रही आलेलं होतं. आश्रमातून एक गट यासाठी पाठवण्याचं आवाहनही त्यात होतं.

ताई म्हणाल्या, "बाकीच्या मुली जमेल तसं दहा-बारा दिवसांपुरत्या सहभागी होतील, कारण इथं त्यांचा अभ्यास बुडेल. सलग तीन महिन्यांच्या या कार्यक्रमात मात्र तूच सहभागी व्हावंस असं मला वाटतं."

मानाला वाटलं, ही पदयात्रा म्हणजे जणू आपल्या भावी आयुष्याचा शुभारंभच! हे एक मिशनच आहे. ती गंभीरपणे यातल्या तिच्या सहभागाचा साधकबाधक विचार करत होती, टिपणं घेत होती. पदयात्रेत दररोजच्या स्वाध्यायासाठी लागणारी पुस्तकं सोबत न चुकता एक डायरीही तिनं त्यांत ठेवली. दररोजच्या घडामोडींची सविस्तर रोजनिशी लिहिणं मानाच्या दृष्टीने फार महत्त्वाचं होतं.

पदयात्रेला निघायची सगळी तयारी सुरू असताना मुली सांगत आल्या, "मानाताई, तुमचे बाबा आलेत."

बाबांना वाकून नमस्कार करणाऱ्या मानूच्या हालचालीत, तिच्या चेहऱ्यावर, डोळ्यांत, बोलण्यात बाबांना काही आगळंवेगळं जाणवत होतं. केवढा आत्मविश्वास आलाय आपल्या मुलीत! किती वेगळी पण समाधानी वाटतेय ही.

बाबांनी अडखळत त्या मुलाबाबत सांगितलं, "तो जंगलतोडीची कंत्राटं घेतो, बेकायदा कामं करतो, दारू पितो. दारू पिणं चूकच, पण जंगलतोडीचं कंत्राट घेणं यात वावगं तसं काही दिसत नाही. पैसेच मिळवायचे तर असं सगळं करावं लागतं.'

बाबांचा पूर्वीचा, 'मला तुझं हित तुझ्यापेक्षा अधिक कळतं' असा सूर आता लोपला होता. मानाकडून एकदाच काय तो होकार-नकार जाणून या विषयाचा तुकडा पाडायच्या मनोवस्थेत ते दिसत होते.

मानूनं ठामपणे निर्णय दिला, "बाबा, दारू आणि जंगलतोड दोन्हीही माझ्या दृष्टीनं सारखेच भयंकर गुन्हे आहेत." त्यातून मानाचं उत्तर बाबांना कळलं. माना आता



स्वतःच्या ठरवलेल्या मार्गानंच पुढं जाणार हे त्यांना कळून चुकलं.

मानूनं त्यांना पदयात्रेबाबत सांगितलं. सामानाची पिशवी पाठीवर टाकून ती बाबांचा आणि सर्वांचा निरोप घेत निघाली. बाबांना नकळतच पाच वर्षांची लहानगी माना आठवली. हट्ट करून मायसोबत पाणचक्कीच्या सफरीला ती गेली होती. तेव्हाचा तो बालहट्ट आताच्या या तरुण मानाच्या स्वभावात दृढ निश्चयाच्या स्वरूपात विकसित झालेला दिसतो आहे. बाबांच्या मनात तिच्यासाठी आशीर्वाद प्रगटले. तिच्या मैत्रिणी, शिक्षिका यांच्यासोबत बाबांनीही तिला हात हलवून निरोप दिला. क्षितिज ओलांडायला निघालेल्या, दूर दूर जाणाऱ्या मानाकडे ते अनिमिष नेत्रांनी पाहत राहिले.

